मनाच्या विकासासाठीं निरनिराळीं मूल्यें सामाजिक जीवनांत निर्माण होतात व त्या त्या मूल्यांच्या मुशींत व्यक्तीचें शरीर व मन ओतलें जातें. संस्कृत उच्चार स्पष्ट करण्यास लहानपणापासून शिकवलें व तसा स्पष्ट शब्दोच्चार ऐकत राहिलें म्हणजे मूल स्पष्ट उच्चार करूं लागतें. लहानपणापासून शारीरिक कष्टांची संवय असली, कुस्ती खेळण्याचें प्रोत्साहन मिळत गेलें, वांडपणाकडे वडील माणसांनीं कानाडोळा केला म्हणजे बळकट शरीराचें, काटक व धाडसी, पण अभ्यासाचा कंटाळा करणारें मूल तयार होतें. गवयाचें पोर सुरावर रडतें म्हणतात त्याचा अर्थच हा कीं ज्या सामाजिक व सांस्कृतिक परिस्थितींत व्यक्ति जन्माला येते व वाढते त्या परिस्थित्यनुरूप तिचा विकास होतो. केरळामध्यें टोपल्या विणणारी एक जात आहे. तिच्याबद्दल बोलतांना एक मजूर अधिकारी म्हणाला कीं, "ह्या जातीचीं माणसें टोपल्या विणतांना पाहिलीं कीं असें वाटतें, त्यांच्या बोटांना डोळे आहेत. इतकीं झरझर व बिनचूक त्यांचीं बोटें काम करतात." धारवाडच्या बोर्स्टल स्कूलमध्यें अल्पवयी गुन्हेगार ठेवतात. ह्यांत पूर्वी सिंध धरून सबंध मुंबई इलाख्याचीं मुलें ठेवीत असत. सिंधकडून पठाण मुलेंही येत. ह्या मुलांत चाबकाचे फटके मिळविण्याची स्पर्धा चाले, व ज्या मुलाला वांडपणाबद्दल फटके मिळाले नाहींत त्याला जीव नकोसा होईल इतका त्याचा इतरांकडून धिक्कार होई ! जो मुलगा जास्ती वेळां शिक्षा भोगील त्याला सर्व मान देत ! हें जें विशिष्ट वळण व्यक्तीला लागे तें तेथील सामाजिक परिस्थितीमुळें असे. समाजाच्या सर्वांगीण दर्शनासाठीं निर-निराळया परिस्थितींतील व्यक्तींचा अभ्यास आवश्यक आहे. पण व्यक्तीचें सांस्कृतिक जीवन समाजाच्या सांस्कृतिक जीवनाचा अभ्यास केल्याशिवाय कळणेंच शक्य नाहीं. समाजाचें जीवन भूतकाळांत लांबवर गेलेलें असतें, निरनिराळया भूप्रदेशभर पसरलेलें असतें व चांगलें, वाईट, हिडीस, सुंदर, उदात्त, नीच, श्रीमंत, गरीब अशा कितीतरी बाजू त्या जीवनाला असतात. हें सर्व एका व्यक्तींत कसें प्रतिबिंबित होणार ? कोणाचेंही व्यक्तिमत्व कितीही विशाल असलें तरी त्यामध्यें संस्कृतीचें विश्वरूपदर्शन होणें अशक्य असतें. ह्या अर्थानेंच संस्कृति समाजाची असते, व्यक्तीची

नसते. संस्कृति व्यक्तीच्या आयुष्याची दिशा ठरवते, तर व्यक्ति संस्कृतीचा प्रवाह थोड्याबहुत प्रमाणांत बदलीत असते. सांस्कृतिक जीवन जगणें ही मानवांची प्रकृति आहे. कपडे घालणें, वैवाहिक जीवन जगणें, चार लोक करतात तें करणें ही विकृति नव्हे, तर "नैसर्गिक" आचरण आहे असेंच म्हटलें पाहिजे. हवा, पाणी, सूर्यप्रकाश ह्या गोष्टी जितक्या सहजतेनें आपल्या आयुष्यांत सोबत करीत असतात तितक्याच सहजतेनें सामाजिक संकेत ऊर्फ संस्कृति आपलें वैयक्तिक जीवन भरून रहाते. सूर्य उगवण्याचें जसें आपणास आश्चर्य वाटत नाहीं तसेंच आपल्या रीतीभातींचें व भाषेचें वाटत नाहीं. उलट सामाजिक जीवन जगण्याची आपली तऱ्हा हीच नैसर्गिक आहे, अनिवार्य आहे, योग्य आहे अशी आपली ठाम समजूत असते. परधर्म नेहमीं भयावह असतो व स्वधर्म हा सर्वश्रेयस्कर वाटतो. आपलें तेंच संवयीनें चांगलें वाटतें. मराठी भाषा किती सोपी, मराठी स्त्रियांचा पोषाक किती सुटसुटीत, मराठ्यांचें खाणेंपिणें कसें योग्य! दाक्षिणात्यांप्रमाणें नुसता सारभातही खात नाहींत व उत्तरेकडील लोकांप्रमाणें दुधातुपांतही बुडलेले नसतात. थोडक्यांत म्हणजे आपल्या चिरपरिचित सामाजिक रहाणीला आदर्श समजून तिच्याबद्दल आपण इतरांच्या रहाणीचें व पद्धतीचें उच्चनीचत्व ठरवतों. गोठ्यांत बांधलेलें गुरूं पुढें ठेवलेलें आंबोण जसें भराभर खातें तशाच तऱ्हेनें आपण आपल्या समाजाचीं मूल्यें आत्मसात् करतों. त्याबद्दल कधीं विचारच करीत नाहीं. असें सांस्कृतिक जीवन जगणारे लोक, मग ते श्रीमंत असोत वा गरीब असोत, मुंबईसारख्या पुढारलेल्या शहरांतले असोत वा सह्याद्रीच्या रानांतले असोत, एक प्रकारचें प्रवाहपतित आयुष्य जगत असतात, परंपरेनें मिळालेलें खात असतात, संस्कृतींत बुडलेले असतात. व्यक्तीचें जीवन समाजाच्या सांस्कृतिक जीवनाचें एक अंग होतें.

कांहीं थोडे लोक असेहि असतात कीं ते पहिल्यानें वर्णन केलेल्या लोकांप्रमाणें संस्कृतीचा उपभोग घेतात पण त्यांचा उपभोग विचारपूर्वक असतो. संस्कृतींत जें वाईट असेल तें टाळण्याची, निदान त्याचे परिणाम शक्यतों कमी करण्याची त्यांची प्रवृत्ति असते व जें चांगलें असेल त्याची माधुरी

ते चवीनें चाखतात, तें मिळविण्याची धडपड करतात, तें जतन करण्याची त्यांची पराकाष्ठा चाललेली असते. हे डोळस, विवेकी लोक संस्कृतीचे संरक्षक व पोषक असतात; आणि अत्यल्प लोक समाजजीवनाचा विचार करतात, वाइटाशीं झगडा देतात, चांगल्याचा उपभोगच घेऊन राहत नाहींत तर नवीं सांस्कृतिक मूल्यें निर्माण करतात. असे लोक संस्कृतीचा प्राण आहेत. ते संस्कृतीला गतिमान ठेवतात, सडूं कुजूं देत नाहींत. ब्रह्माची निर्मोणशक्ति, विष्णूची धारणाशक्ति व शिवाची विध्वंसक शक्ति अशांच्यांत एकत्रित झालेली असते. ते संस्कृतीला उजळा देत रहातात. तरीसुद्धां संस्कृतींत मोठे बदल करण्याची शक्ति एका व्यक्तीची नसून सर्व समाजाची आहे. एका संस्कृतीचा संबंध दुसरीशीं आला म्हणजे वस्तुरूप व मनोमय संस्कृतींची देवघेव होऊन संस्कृति बदलूं लागते. कधीं एक संस्कृति नष्ट होऊन दुसरी तिच्या जागीं येते. संस्कृतीच्या बदलाचा उगम व्यक्तीच्या आचारविचारांत जरी असला तरी व्यक्तीच्या आचारविचारांचें परिवर्तन संस्कृति-संगम वा -संघर्ष ह्यांवर बहुतांशीं अवलंबून असतें. अंतर्गत स्वयंप्रेरित असे बदल फारच कमी प्रमाणांत होतात.

## संस्कृति एक कीं अनेक ?

संस्कृति एक कीं अनेक असा कांहींसा निरर्थक वाद बरेच वेळां केलेला आढळतो. त्याबद्दल थोडक्यांत येथें सांगितलेलें बरें. इतर प्राण्यां-प्रमाणें मानवाच्या आचारांचे मार्ग आखून दिलेले नाहींत हें मागें सांगि-तलेंच. परिस्थिति + तात्कालिक मानवी गरज = मानवी आचार, ह्या समीकरणांतील कोणतेंही पद निरपेक्षतया स्थिर नाहीं व म्हणून उत्तरही कदापि तेंच तें येणें शक्य नाहीं. असें जर आहे तर मानवी आचार व विचार मिळून झालेल्या संस्कृती एक कशा असणार ? ह्याउलट मानव आपले विचार व आपली निर्मिति इतरांना देऊं शकतो व स्वतः इतरांची घेऊं शकतो म्हणून जेव्हां जेव्हां भिन्न संस्कृतीचे लोक एकत्र येतात तेव्हां त्यांच्यांत देवघेव होऊन मुळांतल्या भिन्न संस्कृतींना सारखें रूप येऊं लागतें. परस्पर दळणवळण अव्याहत चालूं असेल अशा परिस्थितींत मोठमोठ्या प्रदेशांत संस्कृति एकरूप होऊं लागते, पण ती सर्वस्वी एक

अजून तरी झाली नाहीं. युरोपियांचें सांस्कृतिक आक्रमण गेलीं दोन तीन शतकें जगावर चाललें आहे पण त्यांच्या संघर्षामुळें कांहीं बाबतींत जरी मोठमोठया भूप्रदेशांतील समाज सारखे वाटले तरी जुनी संस्कृति प्रत्येकाची निराळी असल्यामुळें जुन्या–नव्याची क्रियाप्रतिक्रिया भिन्न भिन्नच झाली. जपानी व चिनी लोकांनीं पाश्चात्यांशीं जो झगडा दिला त्याचें स्वरूप सर्वस्वी भिन्न आहे व तें कां हें त्यांच्या त्यांच्या मूळ संस्कृतीचा ऐतिहासिक अभ्यास केल्याशिवाय कळणार नाहीं. बाराव्या शतकापासून हिंदुस्थानांत जेव्हां मुसलमानांचें आक्रमण झालें तेव्हां पंजाबी, हिंदी, बंगाली, गुजराती व मराठी समाजांची प्रतिक्रिया निरनिराळी झाली ती संस्कृतिवैचित्र्यामुळेंच. एक भाषा व एक धर्म असलेले मूळचे एका संस्कृतीचे लोक वेगळे पडले म्हणजे त्यांच्या समाजजीवनांत किती फरक होतो हें अमेरिका, इंग्लंड व ऑस्ट्रेलिया ह्या तीन देशांतील लोकांच्या रहाणीवरून दिसून येईल. भारतीयांचे दृष्टया युरोपांतील लोक एका संस्कृतीचे आहेत. तसेंच इंग्लंड, अमेरिका व ऑस्ट्रेलिया देशांतील लोक एका संस्कृतीचे आहेत पण त्या त्या देशांतील लोक तसें मानीत नाहींत. पौर्वात्यांशीं वागतांना सर्व पाश्चात्य "आम्ही एक" असे वागतील; पण त्यांच्या वाङ्मयांत व राजच्या व्यवहारांत मात्र एकीची भावना असत नाहीं. मानवेतर प्राण्यांचा विचार करतां सर्व मानव संस्कृति एक असें म्हणतां येईल, पण एरवी नाहीं. तसेंच संस्कृती ऐतिहासिक परंपरेनें कितीहि भिन्न असल्या तरी त्यांच्यांत देवघेवीचे व्यवहार अशक्य असेंही नाहीं. आम्ही म्हणजे कोणीतरी मोठे, प्रकृतिधर्मानें इतरांहून वरचढ म्हणून आमची संस्कृति इतरांहून भिन्न व थोर असा आग्रह कांहीं देशभक्तांचा व धर्मभक्तांचा असतो. उलट "संस्कृतिभिन्नता असें कांहीं नाहींच, जी थोडी भिन्नता आहे तीही एक भाषा सर्वत्र करून नष्ट करावी, भिन्नता आहे ती वरवरची आहे, त्यामार्गे सर्व मानवांची साधारण अशी एकताच आहे," अशा विचारसरणीचे लोकहि सांपडतात. स्वभाषेचा अभिमान, स्वसंस्कृतीचा अभिमान म्हणजे अशा लोकांच्या दृष्टीनें केवळ हट्ट व दुरभिमान होय. इंग्रजी राज्य, सार्वत्रिक इंग्रजीचा उपयोग, ह्यामुळें कांहीं

लोकांना शिक्षण घेऊन परप्रांतांत नोकरी करण्यास सोईचें झालें. बदली झाली तरी सर्वत्र इंग्रजी शाळा असल्यामुळें मुलांच्या शिक्षणाची गैरसोय नसे. कुठल्याही प्रांतांत नोकरी केली तरी त्या प्रांताची भाषा शिकण्याची व तेथील समाजांत मिसळण्याची गरज नसे. असे लोक आज प्रांतीय भाषा व प्रांतीय राष्ट्रवाद ह्यांच्या विरुद्ध आहेत. त्याचप्रमाणें सर्व देशभर व्यापार करणारे व गिरण्या घालणारे भांडवलदार ह्यांनाहि एकछत्री राज्याखालीं मिळणारें संरक्षण हवें आहे. वाटेल त्यानें वाटेल त्या ठिकाणीं कारखाने व दुकानें घालण्याची त्यांना परवानगी हवी आहे. हेहि लोक प्रांतीय भाषांविरुद्ध आहेत. ह्या दोन्ही वर्गांतील बुद्धिमान लोक संस्कृति भिन्न नाहीं, ती एकच आहे; फक्त भारताचीच नाहीं, तर जगाचीही एक आहे, असें अट्टाहासानें सांगतात. संस्कृतीचें एकत्व वा अनेकत्व हीं सापेक्ष आहेत व ज्या दृष्टीनें अभ्यास करावयाचा त्याप्रमाणें कांहीं संस्कृती एकांत घालतां येतात किंवा निरनिराळ्या करतां येतात. अगदीं कांटेतोल-पणें पाहिलें तर कोणतेही दोन मानवसमाज सांस्कृतिक दृष्ट्या सर्वस्वी सारखे नसतात. संस्कृति एक असली किंवा झाली तर मानवसमाजांतील भांडणें व द्वेष कमी होऊन सर्व मानवसमाज एका जगांत गुण्यागोविंदानें नांदतील असा कांहीं लोकांचा दावा आहे. मानवसमाजाच्या इतिहासाकडे नजर टाकल्यास संस्कृतीचें एकत्व, रक्ताचें एकत्व, भाषेचें एकत्व किंवा धर्माचें एकत्व हीं परस्परसख्याचींच पोषक आहेत, वैराचीं नाहींत असें मुळींच दिसून येत नाहीं. अभ्यासकानें जें आहे त्याचा अभ्यास करावा, कांहीं हेतू मनांत योजून त्याप्रमाणें इतिहास बनवूं नये. अशी वृत्ति ठेव-ल्यास मानवी मनाचें कोडें कदाचित् उकलून सहजीवनाची किल्ली सांपडेल, वैचित्र्यांतूनच एकत्व निर्माण होईल. पण तोंपर्यंत संस्कृतीचा अभ्यास करतांना आपली सोय वा समाजविषयक ध्येयें यांनीं वास्तवाला विकृत करण्यानें आपण ध्येयाला व वास्तवाला दोघांनाही मुकूं.

### संस्कृतीची स्थिरता

व्यक्ति व संस्कृति ह्यांचा संबंध काय हें आपण पाहिलें. संस्कृति हा समाजाचा स्थायीभाव आहे तर व्यक्ति हा विकारीभाव आहे. मात्र

अशा परिस्थितींत स्थायी, ध्रुव वगैरे शब्दांनीं व्यक्त होणारें, चिरंतन, न बदलणारें स्वरूप संस्कृतीचें कधींच नसतें व व्यक्तीहि सर्वस्वी विकारी नसते. संस्कृति एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे जाते ती शिक्षणाच्या मार्गानें. कांहीं शिक्षण प्रत्यक्ष असतें, कांहीं अप्रत्यक्ष असतें. वडील माणसें लहान मुलांना चालायला, बोलायला व वागायला शिकवतात. कित्येक गोष्टी न सांगतांही मुलें अनुकरणानें आत्मसात् करतात. एखाद्या घराचें वळण अमक्या तऱ्हेचें आहे असें आपण म्हणतों, त्यावेळीं त्या घरांतील मंडळींच्या वागण्याबोलण्याची पद्धति आपण मनांत आणतों. ही पद्धत मुलांना कांहीं धडे देऊन शिकवलेली नसते. मुलें ती बरीवाईट पद्धत अनुकरणानें न कळत शिकत असतात. ह्या प्रमाणें वंशपरंपरा संस्कृतीचें संक्रमण एका पिढीकडून दुसरीकडे होत असतें तेव्हां संस्कृतींत हळूं हळूं फरक पडतो. पिढीपिढीला तो जाणवत नाहीं, पण शतकांचा इतिहास पहाणाऱ्याला तो कळतो. अशा स्थितींत संस्कृति स्थिर राहिलेली वाटते. अशा तऱ्हेची संस्कृति एकाकी राहिलेल्या कांहीं वन्य जातींची दिसते, पण बहुतेक मनुष्यसमाज असे एकाकी रहात नाहींत. ते स्वतःचें स्थान तरी बदलतात किंवा दुसरीकडचे समाज येऊन त्यांशीं संगम वा संघर्ष करतात. असें झालें म्हणजे आनुवंशिक परंपरा खुंटते. वडील पिढी व तिचें अनुकरण करणारी खालची पिढी ह्यांत एक नवीनच तिसरा भागीदार येतो व तिसऱ्याचे आचारविचार नवी पिढी उचलूं पहाते. संस्कृतीचें संक्रमण विनासायास न होतां पिढयापिढयांत वैमनस्य वाढून अंतर पडतें. बदल हळूं हळूं न होतां एकदम होतो. हीच सामाजिक क्रांति. गेल्या शंभर वर्षांत भारतांत विचारांचें, आचारांचें व वस्तुरूप संस्कृतीचें रूप जें बदललेलें दिसतें तें बऱ्याच अंशीं ह्या क्रांतिमार्गानें बदललेलें आहे. जुनीं मूल्यें नाहींशीं झालीं नाहींत, पण समाजाच्या कांहीं थरांना ही क्रांति चांगलीच जाणवली. संस्कृतींत किती बदल झाला म्हणजे एक संस्कृति जाऊन दुसरी आली असें म्हणावें? संस्कृतींत बदल होत असतांही परंपरा अखंडित आहे असें केव्हां म्हणावें ह्या प्रश्नांचा विचार करणें जरूर आहे.

## भारतीय संस्कृति खंडित कीं अखंडित ?

भारतांत वेदकालीं जी भाषा बोलत ती आज कोणाच्याही बोलण्यांत नाहीं. त्या वेळचे लोक ज्या दैवतांची पूजा करीत त्यांपैकीं वरुण, मरुत्, आदित्य, इंद्र वगैरे आज लुप्तप्राय होऊन त्यांना माहित नसलेल्या राम, कृष्ण, मारुति, शंकर वगैरे देवांची आपण अलीकडल्या काळांत मंदिरें बांधलीं आहेत. कोवळ्या गाई वासरांचें मांस हा त्यांचा अत्यंत आवडता खाद्य पदार्थ आज आपणां सर्वांना निषिद्ध आहे; अशा परिस्थितींत आपण त्यांच्या परंपरेंतील आहों कीं नाहीं ? अगदीं निःसंशय आपण त्याच परंपरेंतील आहों. कां व कसें तें कांहीं उदाहरणांनीं समजेल.

## सस्कृतीच्या एकत्वाच सूत्र

> संस्कृतीची अखंडितता ही तिच्या अंगांगांच्या स्थिर स्थितींत नसून परंपरेच्या अखंडिततेंत आहे व परंपरेची अखंडितता म्हणजे अनुस्मरण व थोड्या अंशानें कां होईना अनुसरण.

हें तत्त्व कांहीं समाजांचा इतिहास ध्यानांत घेतला कीं समजेल. प्रशांत महासागरांत पसरलेल्या अनेक बेटांपैकीं ऑस्ट्रेलियाच्या दक्षिणेस टॅस्मेनिया म्हणून एक मोठें बेट आहे व त्याच महासागरांत ईस्टर म्हणून कांहीं बेटें आहेत. त्यांचा गेल्या शंभर वर्षांचा इतिहास पाहूं. युरोपीय लोकांना ज्या वेळीं टॅस्मेनियाचा प्रथम शोध लागला त्या वेळीं तेथें एक वन्य जात रहात असे. वस्त्रप्रावरणें, अग्निसाधन व घरें बांधणें ह्या लोकांना माहीत नव्हतें. वन्य पशूंची करावी तशी ह्या लोकांची शिकार करून त्यांना युरोपियांनीं नष्टप्राय केलें. कांहीं ५–१० लोक उरले त्यांना मिशनऱ्यांनीं आसरा देऊन खिस्ती बनवलें पण तेही सर्व लवकरच मेले. संस्कृतीची शारीरिक व सामाजिक परंपरा पूर्णतया खंडली. त्या लोकांचे मिशनऱ्यांनीं घेतलेले एक दोन फोटो व कांहीं सांगाडे मात्र आज शिल्लक आहेत. वस्तुमय संस्कृति इतकी निकृष्ट असलेल्या लोकांचें समाजजीवन तरी कसें होतें ह्याची उत्कंठा कितीतरी संशोधकांना आज आहे. पण ती संस्कृति इतकी पूर्णतया मेली आहे कीं तिच्याबद्दल आज जवळ जवळ कांहींच

समजण्यास मार्ग नाहीं. ह्याउलट ईस्टर बेटावरच्या लोकांची संस्कृति बरीच समृद्ध होती. ते घरेंदारें बांधून रहात होते. बागाईत करीत असत. त्यांच्या बेटावर पूर्वीच्या काळीं कोणीतरी दगडांतून घडवलेले प्रचंड पुतळे होते व त्यांची भाषाही लिहिलेली होती. ह्या लोकांची शिकार झाली नाहीं पण त्या सर्वांना ख्रिस्ती करून त्यांच्या धर्मगुरूंना मारून टाकलें. बोलभाषा थोडीबहुत शिल्लक आहे. शेती व घरें तींच आहेत पण ज्यांना परंपरा माहीत होती व ज्यांनीं जुन्या पोथ्यांचें जतन केलें होतें ते मेल्या-मुळें जुनी परंपरा, जुने देव, जुन्या गोष्टी, सर्व नाहींशा झाल्या. बेटावरचे पुतळे कोणी व कां उभारले हें कोणालाही सांगतां येत नाहीं. बर्लिनच्या पुराणवस्तु संग्रहालयांत ईस्टर बेटावरील भाषेंत लिहिलेलीं कांहीं पृष्ठें आहेत म्हणतात, पण तीं कोणासहि वाचतां येत नाहींत. संस्कृतीच्या कांहीं अंगांचा पूर्णतया नाश होऊन परंपरा बव्हंशीं खुटली, कारण पूर्वीचें स्मरणही नाहीं व अनुसरणही नाहीं.

आपला इतिहास ह्याउलट आहे. भाषा सारखी बदलत राहूनही जुन्यांतजुन्या वाङ्मयाचा अर्थ पंधराव्या शतकांत सायणाचार्य लावूं शकत होते. सध्यांच्या भाषांचें मर्म लक्षांत येण्यास ह्या जुन्या भाषांचा अभ्यास आजही करावा लागतो. नुसती भाषाच नव्हे तर संस्कृतीचा आत्मा इतका सारखा आहे कीं जुन्या वाङ्मयाचें रसग्रहण आजही आपण करतों, नव्हे आपल्या नव्या वाङ्मयाचीं मुळें जुन्यांतच सांपडतात. कालिदासाचें काव्य वा नाटक वाचतांना कुठच्यातरी परक्या संस्कृतींतील मूल्यें आपण पारखीत आहोंत असें वाटत नाहीं. उद्योगपर्वांतील कुंती (पितृप्रधान संस्कृतीचा एक बळी) जितक्या तळतळाटानें "पितरं त्वेव गर्हेयं...येनाहं कुन्तीभोजाय धनं धूर्तैरिवार्पिता ॥ (महाभारत, उद्योगपर्व ८८,६१, संशोधित आवृत्ति)[1] असें म्हणते तितक्याच आवेगानें तिची मराठी बहीण म्हणते "काळजाचा घड दिला परायाच्या हातीं." तीच कुटुंबसंस्था, तीच व्यक्तीच्या

१ " (माझ्या दुःखी जीवनाबद्दल मी दुर्योधनाला दोष देत नाहीं) तर माझ्या बापालाच दोष देतें. एखाद्या सौद्यासाठीं धन द्यावें तसें त्यानें मला कुन्तीभोजाला देऊन टाकलें."

हृदयाची ओढाताण आजही आहे. तुकाराम घ्या, ज्ञानेश्वर घ्या, वा नामदेव घ्या. मराठींतील अभंगांचें जशाचें तसें भाषांतर उपनिषदांत सांपडणें फारच सोपें काम आहे. मोठ्या कुळांत मुलगी द्यावी म्हणून स्मृति सांगतात. आजही प्रत्येक आई, सासूसासरा, दीर, जावा, नणंदा असलेल्या घरीं मुलगी पडावी म्हणून धडपडते. इंद्र-वरुणाची पूजा चाले त्याचवेळीं तैमातादि पिशाच्चांची, मलेरिया तापाच्या देवाची, जादूटोण्यानें पूजा चाले. वृक्ष व वनस्पतीचीं दैवतें व त्यांचीं क्षुद्र देवालयें चैत्य ह्या नांवानें महाभारतांत व बुद्धजातकांत सांपडतात, तींच आज वनदेवी, जाखाई, जोखाई, म्हसोबा, वेताळ म्हणून आहेतच. इंद्र गेला पण इंद्रमुख म्हणून वेळूचा स्तंभ उभारून त्यावर गुढी आपण आजही बांधतों. वरुण देवघरांतून गेला, पण श्रावण्यापौर्णिमेचा त्याचा नारळ चुकत नाहीं. यज्ञ व यज्ञीय बोकड गेले, पण रेडा, बकरे, कोंबडीं ह्यांचे बळी दैवतांना नित्य दिले जात आहेतच. नवें रोज येतें आहे, पण जुनें आपण टाकून दिलेलें नाहीं. नवेंजुनें, प्रौढ व प्राथमिक सर्व कांहीं शेजारीं शेजारीं रचून ठेवलेलें आहे. अनेक दैवतवाद आहेत, सगुण एकेश्वरी संप्रदाय आहे, निर्गुण ब्रह्माचें पण तत्वज्ञान आहे. पुनर्जन्मावर अजूनपर्यंत विश्वास आहे. जो प्रकार मनोमय संस्कृतीचा, तोच वस्तुरूप संस्कृतीचा आहे. उत्खननांत दोन हजार वर्षांपूर्वी सांपडलेले पदार्थ आज कोठें ना कोठें वापरांत आहेत. आम्हीं आमच्यांतलें जुनें, अप्रौढ, म्हणून जसें टाकलें नाहीं, तशी आमच्या देशांतील वन्य जमातींची शिकारही केली नाहीं. ते आमच्यापासून फार दूर आहेत असें आम्हाला वाटतच नाहीं. पूर्वजांपासून आम्ही जरी भिन्न असलों तरी जो सामाजिक बदल होत गेला तो स्मरणांत ठेवीत ठेवीत, रामकृष्णादि अलौकिक पुरुषांचें अनुसरण करण्याचें ध्येय उराशीं बाळगीत आतांपर्यंतचा मार्ग आक्रमीत आहोंत. पूर्वजांचा इतिहास, त्यांचें वाङ्मय त्यांचें तत्त्वज्ञान आजही आपलें म्हणून अभ्यासतों व जर कांहीं त्याज्य सांपडलें—व तसें त्याज्य व गर्ह्य पुष्कळच आहे—तरी तें निंदतां निंदतां वा टाकतां टाकतां त्याच्याकडे ममत्वाच्या भावनेनें पाहतों.

हेंच तें अनुस्मरणाचें व परंपरेच्या आणि संस्कृतीच्या अखंडितत्वाचें

तत्व. " ओं क्रतो स्मर कृतं स्मर " हें आपल्या संस्कृतीचें सूत्र म्हणून सांगतां येईल. कर्मांची आठवण ठेव. संचिताचें निराकरण करणें असेल तरीसुद्धां कर्मांची आठवण ठेवली तर तें होईल. हेंच सूत्र समाज-व्यवस्थेतही सांपडतें. जोंपर्यंत पूर्वजांचें स्मरण आहे तोंपर्यंत कुलाची एकता रहाते. जोंपर्यंत मेलेल्यांना पिंड पोंचतो तोंपर्यंत मृत व जिवंत एका समाजाचे घटक रहातात. जोंपर्यंत पूर्वजांचें स्मरण ममत्वानें होतें तोंपर्यंत ते संस्कृतीनें उत्पन्न केलेल्या स्वर्गांत आनंदोपभोगाचे धनी असतात. विस्मरण झालें कीं परंपरा खंडते व ते स्वर्गच्युत होतात. त्यांचें मानाचें स्थान हरपतें. ते विस्मृतीच्या नरकांत खिचपत पडतात. ही कल्पना महाभारतांत अरण्यपर्वांतील एका सुंदर कथेंत सांगितली आहे. इंद्रद्युम्न नांवाचा प्राचीनतम काळांतला स्वर्गांत गेलेला एक राजा पुण्यक्षय झाला म्हणून पृथ्वीवर आला व आपल्याला कोणी स्मरतें कां तें शोधूं लागला. पहिल्यानें तो मार्कंडेय ऋषि दीर्घायु म्हणून त्यांच्याकडे गेला पण त्यांना तो आठवेना म्हणून त्यांच्यापेक्षांही वृद्ध अशा प्राकारकर्ण नांवाच्या घुबडाकडे ते दोघे गेले. त्यालाहि तो आठवेना म्हणून ते एका सरोवरांकाठीं रहात असलेल्या नाडीजंघ नांवाच्या बगळ्याकडे गेले. बगळा म्हणाला, " मला कांहीं कोणी इंद्रद्युम्न नाहीं बावा आठवत, पण ह्याच तळ्यांत एक अतिवृद्ध, हजारों वर्षें जगलेलें अकूपार नांवाचें कांसव रहातें त्याला हांक मारून विचारूंया. " अकूपाराला हांक मारून विचारतां तें क्षणमात्र स्तब्ध राहिलें व नंतर डोळ्यांत अश्रु आणून भरल्या गळ्यानें म्हणालें, " बा, त्या महात्म्या इंद्रद्युम्नाला मी कसा विसरेन ! त्याच्या यज्ञीय अग्निचितीजवळ मी कितीदां बसलों असेन आणि त्यानें दक्षिणा दिलेल्या असंख्य गाईंच्या खुरांनीं व दान करतांना सोडलेल्या पाण्यानें तर हें तळें उत्पन्न झालेलें आहे. " कांसव हें म्हणतो न म्हणतो तोंच स्वर्गांतून देवांचें विमान येऊन राजाला परत स्वर्गांत घेऊन गेलें.

व्यक्तीच्या जीवनक्रमांत व्यक्तिमत्वाच्या विकासाचें जें तत्व तेंच संस्कृतीच्या एकतेचें तत्व. जन्माला आल्यापासून व्यक्ति सारखी वाढत व बदलत असते. चुका, अडमुठेपणा, बावळटपणा सारखा हातून होत असतो.

लहानपणीं व तारुण्यांत हातून जें जें घडत असतें तें तें त्यावेळीं योग्यच वाटतें; पण सिंहावलोकनांत त्या अनुभूती कोत्या, वाटतात. पण मोठ्या माणसाचें वर्तन व विचार आणि व्यक्तिमत्व त्या सर्व पूर्वानुभूतीशीं निगडीत असतें. लहानपणीं अमक्या दिवशीं असा गाढवपणा केला तो मीच; परीक्षा पास होण्यासाठीं मारुतीला खडीसाखर बोलणारा मीच, एका मूर्ख पोरीपायीं जीव द्यावयाला निघणारा मीच, निरनिराळे मनोरथ रचणारा मीच असे शेंकडों मी निर्माण होतात, बिलीन होतात, प्रगल्भित होतात. पण ते सर्व एका मीच्या व्यक्तिमत्वांत सामावलेले असतात. जेव्हां ह्या निरनिराळ्या मींची विसंगति अनिवार होते, तेव्हां व्यक्तीचें एकत्व नष्ट होऊन जेकिल–हाइडसारखी अवस्था होते. व्यक्तिमत्वाच्या अखंडिततेच्याबद्दलही आपल्या वाङ्मयांतून कांहीं कथा सांपडतात. मित्रसह हा सूर्यवंशांतील एक सदाचरणी सत्वशील राजा होता. त्याची कांहीं चूक नसतां त्याचे हातून अपराध घडला म्हणून शापामुळें तो नरभक्षक राक्षस झाला व ज्या गुरूनें आकसानें शाप दिला त्या वसिष्ठाच्या मुलांनाच त्यानें खाऊन टाकलें, अशी एक कथा आहे. व्यक्तिमत्वाच्या एकात्मतेचें सूत्र कशा तऱ्हेनें ताणलें तर खंडतें ह्याचें ही कथा एक उत्कृष्ट उदाहरण आहे. ह्याही पेक्षां सरस उदाहरण म्हणजे भारतांतील अंबेची कथा काशी राजकन्या अंबा शाल्वाधिपतीवर प्रेम करीत होती. ती व तिच्या बहिणी ह्यांचें स्वयंवर होतें, तेव्हां शाल्वाला तिनें माळ घालण्याचें ठरवलें. पण तिच्या दुर्दैवानें भीष्मानें तिचें हरण केलें. इतकेंच नाहीं, तर त्यावेळच्या प्रघाताप्रमाणें तिच्याशीं स्वतः लग्न न करतां आपल्या दुर्बल व क्षयी भावाशीं तिचें लग्न करण्याचा घाट घातला. भीष्माची करुणा भाकून अंबा शाल्वाकडे परत गेली पण त्या नादानानेंहि तिचा अव्हेर केला व भग्नहृदय अंबेनें स्वतःला जाळून घेतलें. “ यौवनाच्या देहलीवर ” प्रणयाचीं स्वप्नें रंगवणारी अंबा मेली व ज्याचें जीवितकार्य केवळ सूड आहे, ज्याला पुरुषत्व वा स्त्रीत्वही नाहीं, जो नुसता सूडाचा अविष्कार, अशा शिखंडीच्या रूपानें ती जन्मास आली. व्यक्तिमत्वाची परंपरा पूर्णपणें खंडली; इतकी कीं नुसतें मनच नाहीं तर शरीरही त्यासाठीं निराळें घ्यावें लागलें. संस्कृतीच्या इतिहासांत अंबेला तोड नाहीं. मित्रसहसदृश उदाहरणें मात्र पुष्कळ आहेत.

भारतीय संस्कृतींत हें अनुस्मरण व अनुसरण —ही ममत्वाची भावना— आजतागायत शिल्लक आहे म्हणून ती संस्कृति एक आहे. ह्या उलट खंडित परंपरेचीं उदाहरणेंहि जगाच्या इतिहासांत पुष्कळ आहेत. नील नदीच्या कांठीं प्राचीन काळीं एक समृद्ध संस्कृति सारखी उत्क्रांत होत होती. ही संस्कृति सतत सहा हजार वर्षें अखंडित टिकली. राज्यकारभारांत उलथापालथी कितीदा झाल्या, हायक्सॉस, ग्रीक, रोमन् वगैरे परकीय लोकांनीं तेथें राज्य केलें पण संस्कृति खंडित झाली नाहीं. पण आठव्या नवव्या शतकांत मुसलमान राज्यकर्त्यांच्या ताब्यांत हा देश गेल्याबरोबर संस्कृतीची परंपरा पूर्णतया तुटली. भूमि तीच, लोक रक्तानें बव्हंशीं पहिल्यासारखेच, पण समाजजीवन व मूल्यें मात्र सर्वस्वी भिन्न अशी स्थिति आज आहे. भाषा पूर्वींची नाहीं–धर्म पूर्वींचा नाहीं–पूर्वींच्या संस्कृतीबद्दल काडीमात्र ममत्व नाहीं, अशी परिस्थिति आज तेथें आहे. मिसरी संस्कृतीचा इतिहास म्हणून एका पुस्तकांत आजतागायतचें वृत्त लिहितां येईल. देश एक, पुस्तक एक, पण कथा एका संस्कृतीची खासच नव्हे.

### भारतीय संस्कृति व महाराष्ट्रीय संस्कृति

भारतीय संस्कृति ह्या दृष्टीनें खंडित नाहीं; मधले कांहीं दुवे जरी झिजले असले तरी परंपरा नष्ट झाली नाहीं. भारतीय संस्कृति ही इतर संस्कृतींच्या संघर्षानें व साहचर्यानें निर्माण झालेली आहे. त्यापैकींच एक प्रादेशिक संस्कृति म्हणजे महाराष्ट्रीय संस्कृति. ह्या संस्कृतीला भारतीय संस्कृतीचें पाठबळ आहे. भारताच्या इतिहासाशिवाय ती कळणारही नाहीं. त्याचप्रमाणें तिचें आयुष्य शेजारच्या प्रादेशिक संस्कृतीशीं निगडीत आहे. पण एकाच घराण्यांतील व्यक्तींना जें व्यक्तिमत्व असतें तें तिलाही आहे आणि तें समजून घेण्याचा आजचा प्रयत्न आहे. प्रादेशिक संस्कृतीच्या अभ्यासकाला लवकरच आढळून येतें कीं, प्रादेशिक मर्यादेबाहेर गेल्याखेरीज स्वतःच्या राष्ट्राच्या संस्कृतीचें स्वरूप नीट कळून येत नाहीं. गंगेच्या खोऱ्यांतील लोकांची कुटुंबसंस्था, कर्नाटकांतील कुटुंबसंस्था, महाभारतांत आढळून येणारी कुटुंबसंस्था ह्यांचें जेव्हां थोडेंतरी आकलन झालें, तेव्हां महाराष्ट्रांतील कुटुंबसंस्थेचें इंगित मला कांहीं अंशानें कळे.

कळलें. महाराष्ट्राच्या माणसांचें शरीरदृष्ट्या वर्गीकरण करतांना गुजराथ, उत्तरप्रदेश, तेलंगण व कर्नाटक वगैरे प्रान्तांतील लोकांचें वर्गीकरण करणें आवश्यक आहे, त्याचप्रमाणें जगांतील निरनिराळ्या मनुष्यवंशांचें ज्ञान होणें अत्यावश्यक आहे. अश्मयुगाचा महाराष्ट्राचा इतिहास जाणावयाचा असेल तर महाराष्ट्राबाहेरच्या चारी दिशांना भटकलें पाहिजे. कधीं कधीं आपल्या स्वतःच्या प्रदेशांत हवें तें सांपडत नाहीं पण बाहेरच्या प्रदेशांतील संशोधनानें घरच्या संशोधनास मदत होते. त्यामुळें एखादी संशोधन-संस्था पुण्यास—महाराष्ट्रांत—असूनही तेथले लोक महाराष्ट्राच्या बाहेर संशोधन करतात म्हणून त्यांच्याविरुद्ध गवगवा करण्यानें त्या माणसांचें किंवा संस्थेचेंच नुकसान होतें असें नाहीं तर संशोधनकार्याचेंही नुकसान होतें. त्यांतूनही भाषा, इतिहास, समाजशास्त्र, प्राचीन संस्कृतीच्या—विशेषतः अश्म-युगाच्या—संशोधनाचें शास्त्र हे विषयच असे आहेत कीं, ते सर्वस्वी प्रादेशिक राहूं शकत नाहींत. आम्ही प्रादेशिक तत्त्वावर देशविभागणी मागतों व आमच्या संस्कृतीचें संशोधन करतों तें आमच्याभोंवतीं तारेचें कुंपण बांधण्यासाठीं नसून, शेजारी—शेजारी म्हणून सुखांत नांदून स्पर्धा व वैरभाव टाळून एकमेकांच्या साहाय्यानें सर्व भारताचें सांस्कृतिक जीवन समृद्ध करण्यासाठींच होय. महाराष्ट्राची संस्कृति अभ्यासणें म्हणजे आत्म-शोधन आहे. परद्वेष नव्हे. भारतीय राष्ट्रसंघाच्या एकत्र कुटुंबांतील संबंध सुलभ व सुखावह करण्यासाठीं प्रादेशिक संस्कृतीप्रमाणें राष्ट्रसीमा आंखून द्याव्यात असा आमचा आग्रह आहे. ह्याउपर हेतुविपर्यास करणारा बुद्धि-पुरःसर तसें करीत असेल तर अशांची समजूत घालणें अशक्य म्हणून तो नाद सोडून देऊन आपलें कार्य आपण करीत राहिलें पाहिजे.

संस्कृति म्हणजे काय—तिचें रूप काय—तिची निर्मिती कशी होते ह्याची कल्पना आपल्याला थोडक्यांत दिली. कुठल्याही संस्कृतीचें स्वरूप काय हें समजून घ्यायचें तर ती कुठच्या भूमींत रुजली, त्या भूमीचें वैशिष्ट्य काय हें समजून घ्यावें लागतें. कारण मनुष्याच्या जीवनाला आधारभूत ही भूतधारिणी पृथ्वी आहे. ती ज्या तऱ्हेचें अन्नवस्त्र देईल त्यावर बऱ्याच अंशानें—निदान प्राथमिक अवस्थेंत तरी—मनुष्याचें दैनंदिन जीवन

अवलंबून असतें. ती भूमि दळणवळणाच्या वाटेवर, प्रवासाला सुखावह आहे की जगाच्या कानाकोपऱ्यांत पडलेली, दुर्गम अशी आहे हेंही पाहणें फार आवश्यक आहे. संस्कृति ही मनुष्याची सामाजिक निर्मिति आहे व निरनिराळ्या मानवसमाजांच्या संघर्षानें व सहजीवनानें तिचा नाश वा विकास होत असतो हें समजलें म्हणजे ज्या भूमीवर संस्कृति रुजते त्या भूमीचें रूप समजणें अत्यावश्यक आहे हें उघडच आहे. त्याचप्रमाणें संस्कृतीला जरी व्यक्ति-निरपेक्ष असें कांहीं स्वतंत्र जीवन असलें तरी संस्कृतीचे निर्माते, उपभोक्ते, संवर्धक माणसेंच असल्यामुळें ज्या संस्कृतीचा अभ्यास करावयाचा ती कोणत्या माणसांनीं पाळली, लालन केली, वाढविली तेंही अभ्यासलें पाहिजे. त्यानंतर त्या संस्कृतीचीं अंगोपांगें—समाजसंस्था, भाषा, वाङ्मय, धर्म काय आहेत तें समजून घेतलें पाहिजे. हीं सर्व अंगप्रत्यंगें कालप्रवाहांत चाललेलीं आहेत असें पाहिलें म्हणजे त्यांचें स्वरूप ऐतिहासिक अभ्यासाशिवाय समजणें शक्य नाहीं हें ध्यानांत येईलच. याप्रमाणें ह्या सर्वांचा सांगोपांग अभ्यास केल्याशिवाय त्याचें यथार्थ विवेचन करतां यावयाचें नाहीं. ह्यावरून आपण माझ्यावर केवढी बिकट जबाबदारी टाकली आहे हें लक्षांत घ्या. महाराष्ट्राच्या संस्कृतीचें स्वरूप संपूर्णतया दाखवणें मला शक्य होईलसें दिसत नाहीं; पण त्या प्रांतांतील एक क्षुद्र प्रवासी म्हणून मला ज्ञात झालेले विभाग मी शक्यतों आपणांस दाखवीन. त्यायोगें माझ्या पुढच्या पिढींतील जिज्ञासूंना मार्गदर्शन होईल व ज्या प्रदेशांत मला शिरतां आलें नाहीं तें त्यांना सुलभ होऊन ते धडाडीनें व आत्मविश्वानें पुढें जातील अशी आशा बाळगून मी भीतभीत पण आपल्या सहानुभूतीवर व चांगुलपणावर विसंबून हा विषय हातीं घेतला आहे.

२

## मराठी लोकांची भूमि

महाराष्ट्र ज्या भारताचा भाग आहे त्या भरत खंडाचें पृथ्वीवरील स्थान विचार करण्यासारखें आहे. युरोप आणि आशिया खंडांच्या पूर्व-पश्चिम पसरलेल्या प्रचंड भू-विभागाचें दक्षिणेला निमुळतें झालेलें भारत हें एक टोक आहे. युरेशिया खंड पृथ्वीच्या उत्तर-गोलार्धात १०° अक्षांशापासून ७०° अक्षांशापर्यंत व १०° पश्चिम रेखांशापासून १८०° रेखांशापर्यंत पसरलें आहे. ह्या आयताला भारत व ब्रह्मदेश हीं दोन निमुळतीं टोकें दक्षिणेकडे फुटलेलीं आहेत. युरेशिया खंडाचा उत्तरेकडचा तीन चतुर्थांश भाग सुमारें सहा लाख वर्षांपासून तो १०००० वर्षांपूर्वीं-पर्यंत बर्फानें आच्छादलेला असा होता. मधून मधून कांहीं सहस्रकें बर्फ कमी होई व मानवसमाज गुहांतून मोठ्या कष्टाचें जिणें जगूं शकत. इतक्या जुन्या काळीं मानवाची निसर्गावरची सत्ता फारच तुटपुंजी होती. म्हणून अशा भौगोलिक परिस्थितींत संस्कृतीचें वर्धन होणें अशक्य होतें. ह्याउलट युरेशिया खंडाचा दक्षिण भाग समशीतोष्ण कटिबंधांत व कांहीं उष्ण कटिबंधांत आहे. युरोपला जोडूनच दक्षिणेला आफ्रिकेचा उत्तर किनारा आहे. भू-भागानें सर्व बाजूनें वेढलेल्या, दळणवळणाला अत्यंत सोईस्कर अशा भूमध्य समुद्राकाठीं प्राचीन काळच्या पाश्चात्य संस्कृतीचा उगम झाला व चीनच्या सुपीक भूमींत युरेशिय आयताच्या ईशान्येस पूर्वेकडील प्राचीन संस्कृती उदयास आल्या.

नील नदीच्या सुपीक मळीच्या जमिनींत व तैग्रिस-युफ्रेतिसच्या

दुआबांत प्रथम मोठ्या प्रमाणावर धान्य पेरून शेती करण्यास सुरवात झाली. शेतीमुळें जीविताला आवश्यक अशा अन्नाचा पुरवठा एकदम मोठ्या प्रमाणावर होऊं लागला. जोंपर्यंत माणूस निवळ शिकार करीत असे तोंपर्यंत त्याचें पोट हातावर असे. आज जें मिळेल तें आज खावयाचें, उद्यां उजाडला कीं परत पोटाची खळगी भरण्यास वणवण हिंडावयाचें, असा प्रत्येकाचा जीवनक्रम होता. कधीं कधीं एका ठिकाणच्या वसाहतीला पुरून उरेल इतकें खाद्य मिळालें तरी तें सुरक्षित ठेवण्याची कला अवगत नसल्यानें तें बहुधा फुकट जात असे. एके ठिकाणीं फार मोठ्या जमावानें रहाणें शक्य नव्हतें किंवा एकाच ठिकाणीं फार दिवस रहाणेंही शक्य नव्हतें. खाणारीं तोंडें फार असलीं व तीं एकाच टापूंत शिकार करीत हिंडत असलीं म्हणजे श्वापदें संपून जाण्याचा किंवा रान सोडून जाण्याचा संभव असतो. महाभारतांतील मृगोपाख्यानांत ही गोष्ट फार स्पष्टपणें सांगितली आहे.... ह्या रानांतलीं हरिणें संपलीं, आतां दुसरीकडे जा असें पांडवांना सांगण्याची पाळी हरिणांवर आली. (श्वापदांनीं रान समृद्ध असेल तर एकादी वसाहत १००–१०० माणसांची सुद्धां असे, असें झेकोस्लोव्हाकिया व पोलंड येथील कांहीं उत्खननावरून दिसतें. पण एकंदरीनें अशीं उदाहरणें फार कमी. दिवसानुदिवस २०–२५ च्या गटांनीं राहून, सारा दिवस पोटाच्या उद्योगांत घालवणारीं माणसें संस्कृतीची मोठी निर्मिति काय करणार ? (संस्कृतीच्या निर्मितिसाठीं पोटाच्या विवंचनेपासून थोडीशी सोडवणूक व मोठ्या संख्येनें एकत्र रहाण्यास अनुकूल अशी परिस्थिति हीं आवश्यक आहेत.) ह्या दोन्ही गोष्टी शेतीनें साध्य करून दिल्या. मिसर व बावेरू देश ह्यांतील शेती हुकमी होती. दुष्काळ अति क्वचितच पडे. मळीच्या जमिनींत खताची आवश्यकता नव्हती. खाणारीं तोंडें थोडीं व पीक भरपूर अशी अवस्था होती. समाजांतील प्रत्येकानें अन्नोत्पादन न करतां इतर कसब करून शेतकऱ्यांना उपयोगी पडून मोबदल्यांत अन्न मिळविणें शक्य झालें. कारागिर, कसबी, लेखक, पुजारी निर्माण झाले. नागरी जीवनास प्रारंभ झाला. ह्या नागरी जीवनांत स्वतःला पुरून उरतील अशा पुष्कळच गोष्टी निर्माण झाल्या व त्यांची

देवाण-घेवाण फक्त एका नगरांतच न होतां देशभर व देशांदेशांतून करण्याची शक्यता उत्पन्न झाली, व ती करणारा धडाडीचा व्यापारीवर्गही पुढें सरसावला.

स्पेन ते जेरूसलेम, मिसर ते बावेरू, बावेरू ते इराण, व इराण ते चीन असें व्यापारी दळणवळण गेलीं चार हजार वर्षें तरी अव्याहत चाललेलें आहे. व्यापाराचे मार्ग म्हणजे मानवी संस्कृतीच्या देवघेवीचे मार्ग होत आणि त्या मार्गांच्या जवळ जवळ मध्यावर भारत आहे. नागर जनतेच्या गरजांना पुरून उरणारा निरनिराळ्या तऱ्हेचा माल दूर दूर वाहून नेणारे, निधड्या छातीचे, पुष्कळ पशू बाळगणारे, सार्थवाह हे निरनिराळ्या संस्कृतींमधला दुवा होते. भूमध्य समुद्राच्या पूर्वेला रहाणारे ' पणी ' समुद्र मार्गानें थेट स्पेन व आयर्लंड पर्यंत व्यापार करीत. हेच धाडसी दर्यावर्दी लोक भूमार्गानें पूर्वेकडे व्यापार करीत. वेदांत गाईना पळवणारे म्हणून ज्यांचा उल्लेख आहे तेच हे पणी असावेत. हे पणी मूळचे कोण ह्याचा नीटसा उलगडा अजून झाला नाहीं. पण ते पहिल्यापासूनच अत्यंत मिश्र असावे व पालेस्ताईन, आर्मेनिया व बावेरू वगैरे सर्व देशांचे लोक त्यांत असावे असें वाटतें. मध्य विभागांत आशियाच्या पठारावर शेळ्या, मेंढ्या, याक ( एक प्रकारचे बैल ) व उंट घेऊन फिरणारे पशुपाल फार प्राचीन कालापासून आहेत. ते व मोंगोलियांतले लोक पूर्वेकडून पश्चिमेकडे माल वाहून नेत. ह्या भटक्या टोळ्या माल वाहून नेण्याचें काम करीत, वाटमारींतही त्या हुषार होत्या व शेकडों मैलांचा प्रवास त्यांच्या खिजगणतींत नव्हता. हिंदुस्थानांत आलेले हूण व शक लोक ह्यांच्यांतलेच असावेत असें वाटतें. पश्चिमेकडचे व्यापारी व उत्तरेकडील थंड प्रदेशांतून दक्षिणेकडे सरकणाऱ्या पशुपाल आर्यांच्या टोळ्या जुन्या संस्कृतिमान जगाच्या सीमेबाहेर होत्या. त्या कधीं व्यापार करीत, कधीं व्यापारी तांड्यांवर धाड घालीत, तर कधीं पशूंना एकाद्या दुष्काळांत वैरण व पिण्याचें पाणी कमी पडलें तर मिसर, असुरदेश वा भारत ह्यांवर हल्ले करून मोठी लूट करीत. कधीं कधीं तर ते कायमचेच ह्या देशांचे रहिवासी होत. अशा तऱ्हेनें संस्कृतीच्या राजमार्गावर वसलेल्या भारतांत सुद्धां फार प्राचीन काळा-

पासून ह्या लोकांची आवकजावक असल्याचे उल्लेख आपल्या जुन्या वाङ्मयांत सर्वत्र सांपडतात.

भारताच्या उत्तरेला मानदंडाप्रमाणें पसरलेल्या हिमालयाच्या बर्फाच्छादित प्रचंड पर्वतराजीमुळें उत्तरेकडून भारतांत लोक यावयाचे थांबले नाहींत. हिमालय पर्वतानें भारताच्या दाराला अडसर बसला नाहीं पण उत्तरेकडच्या वाळवंटाला मात्र दक्षिणेकडे सरकतां आलें नाहीं. हिंदुस्थानांतील पर्वतराजींत हिमालय हा सर्वांत नवा पर्वत आहे.तो जेव्हां नव्हता तेव्हां एक मोठा समुद्र तेथें पसरलेला होता. कित्येक दशलक्ष वर्षांपूर्वी हळूं हळूं तो समुद्र नाहींसा होऊन, भूकंप व ज्वालामुखी यांमुळें त्या जागीं प्रचंड पर्वत निर्माण झाले. युरोपांतील आल्प व हिमालय हे ते पर्वत होत. हिमालयामुळें दक्षिणेकडचे पावसाळी वारे उत्तरेकडे पोचेनासे झाले. पूर्वी दाट जंगलें असलेला प्रदेश पाण्याच्या अभावीं हळूं हळूं कोरडा पडूं लागला. मानवजातीच्या उत्पत्तिकालाच्या सुमारास तो प्रदेश आतांपेक्षां सुपीक व जलपूर्ण होता असें दिसतें; पण गेल्या कांहीं सहस्त्रकांत त्यांतील बराच भाग वाळवंट झाला आहे व कांहींत केवळ गवत व खुरटीं झुडपें उगवतात. त्या पट्ट्याच्या उत्तरेस सैबेरियाचें प्रचंड सूचिपर्णी जंगल पसरलेलें आहे. हा जंगलपट्टा व हिमालयाच्या उत्तरेकडचा प्रदेश यांमध्यें जगांतील प्रमुख भटक्या टोळ्यांचें वास्तव्य होतें व आहे. दक्षिणेकडील शेतकऱ्यांना ह्या टोळ्यांचें कायम भय असे. त्यांच्याच भीतीनें चीनची उत्तर भिंत बांधली गेली. हिमालयाच्या पूर्व पश्चिम पसरलेल्या रांगांच्या दोन टोकांकडून लोक आंत येत होते व बाहेरही जात होते. पश्चिमेकडील टोक इतिहास–पुराणांत प्रसिद्ध आहे. वायव्येकडील प्रदेश डोंगराळ व वैराण आहे. इकडून आर्य आणि द्रविड लोक भारतांत आले. ईशान्येकडील प्रदेशांत मोठमोठ्या नद्या, निबिड अरण्यें, दलदलीचे भूभाग व लहानमोठे पर्वत पसरलेले आहेत. अरण्यांतून हत्ती, गेंडे, रानरेडे, मोठमोठे सर्प व विषारी कीटक राहतात. पण त्यांतूनही वाट काढून मॉन्‌ख्मेर भाषा बोलणारे लोक दक्षिण चीनमधून हिंदुस्थानांत आले. ह्याच मार्गानें आर्यांची संस्कृति ब्रह्मदेश व सयामपर्यंत पोचली. हिमालयामुळें भारताचें बाहेरच्या जगाशीं दळणवळण थांबलें

नाहीं. उलट हिमालयांत उगम पावलेल्या नद्यांमुळें शेतकीवर आधारलेल्या प्राथमिक संस्कृतीचीं बीजें भारतांत रुजलीं. हिमालयाच्या भिंतीच्या आडो-शामुळें उत्तर ध्रुवाकडून सैबेरियाच्या अरण्यावरून वाहणारे थंड वारे भारतांत पोचेनासे झाले आणि वायव्येकडील व उत्तरेकडील वैराण प्रदेशांत हिंडणाऱ्या लोकांना पुनः पुनः विसाव्यासाठीं व वसाहतीसाठीं समृद्ध प्रदेशाचा लाभ झाला. भारताचीं उत्तरेकडील हीं दारें सांस्कृतिक दृष्टया फार महत्वाचीं आहेत. ह्या दोन दारांचें सांस्कृतिक कार्य मात्र फार भिन्न आहे. पश्चिमेकडच्या दारानें आंत आलेले लोक भूमध्य समुद्राभोंवती भरभराटलेल्या संस्कृतीचें लोण घेऊन आले. पशुपालनाची कला व जव, गहूं, जोंधळा, बाजरी, चणा वगैरे धान्यें घेऊन आले. उत्तर हिंदुस्थानच्या भाषांची जी जननी संस्कृत तीही तिकडूनच आली. द्राविड संस्कृति व भाषा ही त्याच मार्गें आली असण्याचा संभव आहे, असें कांहीं मानवशास्त्रज्ञ मानतात. ह्याउलट ईशान्येच्या मार्गानें एकच भाषा हिंदुस्थानांत आली; ती म्हणजे खोंड, संताळ, व कोरकू लोक बोलत असलेली, नष्टप्राय झालेली, मॉन्‌ख्मेर भाषांशीं संलग्न भाषा होय. ह्या भाषेचें सांस्कृतिक कार्य काय ह्याविषयीं तातडीनें अभ्यास होणें जरूर आहे. ह्याबद्दल लिखाण पुष्कळ व अभ्यास कमी अशी आजची परिस्थिति आहे. एवढें मात्र खरें कीं त्या भाषेंतील बरेच शब्द ग्रामवाचक नामांत व इतरत्रही संस्कृत वाङ्मयांत सांपडतात. पूर्वेकडून आलेल्या लोकांचें अत्यंत महत्वाचें कार्य म्हणजे त्यांनीं तांदुळाची लागवड इकडे आणली. महाराष्ट्राच्या भूमीबद्दल विवेचन करतांना उत्तरेकडील ह्या दोन्ही द्वारांचा विचार आपल्याला परत करावाच लागेल.

हिंदुस्थानचा दक्षिणार्ध समुद्रानें वेढलेला आहे. समुद्र हा दळणवळणाचा एक राजमार्ग आहे, पण तो कोणाला ? ज्यांना नौकानयनाची कला अवगत आहे त्यांना. इतरांना समुद्र ही एक अनुल्लंघ्य मर्यादा आहे. कालिदासाच्या वेळीं समुद्रापर्यंत पृथ्वी अंकित होणें म्हणजे यशाची परिसीमा गांठणें समजलें जाई. कारण तो रघुवंशांतील राजांचें वर्णन " आसमुद्रक्षितीशानां " असें करतो. दक्षिण हिंदुस्थानांत पूर्व–पश्चिम किनाऱ्या-

वर जलमार्गानें कोणते मानव संघ आले ह्याचें संशोधन अद्याप झालें नाहीं. पश्चिम किनाऱ्यावर अर्वाचीन काळांत अरबी दर्यावर्दी आले व त्यांनीं वसाहत केली, हें इतिहासप्रसिद्ध आहे. प्राचीन काळीं पश्चिम किनाऱ्याचें दळणवळण युरोपांतील व इराणच्या आखातांतील लोकांशीं होतें हें चेउल, सोपारा, भडोच ह्या नांवाच्या उल्लेखांवरून दिसून येतें. एका ग्रीक नाटकांत कोंकणी, कानडी लोकांचा उल्लेखहि आढळतो. त्याही आधीं इस्त्राइल किंवा मिसर संस्कृतीशीं त्रावणकोरचा संबंध आला होता असें म्हणतात, पण नक्की माहीत नाहीं. आतां पुराव्यानिशीं असें सिद्ध झालें आहे कीं, ख्रिस्त शकापूर्वी ५० व्या वर्षापासून पूर्व पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांत चिनी व रोमन खलाशी व व्यापारी येत होते. कारण त्यांचीं भांडीं, बरण्या, नाणीं सर्व उत्खननांत सांपडलीं आहेत. ह्यांपैकीं कोणीं मोठे मानव संघ येऊन येथें कायमचें घर करून राहिले नसावे असें दिसतें, त्यांच्या तात्पुरत्या वसाहती मात्र असाव्यात.

ह्याही आधींच्या कालांत कोण आले व गेले त्याचा नीट शोध अजून लागला नाहीं; पण अगदीं नुकता नुकता द्रविड लोकांबद्दल एक नवीनच सिद्धांत डॉ. हायमेनडोर्फ ह्या विद्वानांनीं मांडला आहे. ह्यांचें म्हणणें असें कीं, द्रवीड प्राचीन काळीं गंगेच्या खोऱ्यांत पसरले होते, व त्यांना आर्यांनीं रेटीत रेटीत दक्षिणेकडे चेपलें व ते सध्यां तेथें स्थायिक आहेत, हें वस्तुस्थितीला धरून नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांत—महाराष्ट्राच्या दक्षिणेस—गेल्या कांहीं वर्षांच्या उत्खननांत द्राविडांचीं एका विशिष्ट तऱ्हेचीं थडगीं सांपडलीं आहेत. मोठमोठे शिलापट्ट स्वस्तिकाकार एकमेकांशीं जोडून एक पेटी तयार करून त्यांत मृताचे अवशेष ठेवलेले आढळतात. ह्या पेट्यांतूनच सर्वत्र लोखंडाचीं हत्यारेंही सांपडलीं आहेत. अशीं थडगीं एकेका ठिकाणीं २०-२०, २५-२५, पुष्कळदां शंभरानेंहि सांपडलीं आहेत. ह्यांच्या आधींचे दक्षिणेकडचे अवशेष सर्व अश्मयुगीन आहेत. त्यांतून धातूंच्या वस्तु सांपडत नाहींत. अश्मयुगीन लोक उत्क्रांत होत त्यांनीं धातु शोधून काढले म्हणावे तर अश्मयुगीन अवशेष व लोहयुगीन शिलापट्ट-पेटिकेचे अवशेष ह्यांमध्यें उत्क्रमण-दर्शक, संधिदर्शक, कांहीं

तरी अवशेष असावयास हवे होते, ते दिसत नाहीत. शिलापट्ट–पेटिकेचे अवशेष द्रविडभूमि व्यापून आहेत पण द्राविडभूमीबाहेर नाहींत. त्यावरून प्राचीन द्राविडांचींच हीं स्मारकें आहेत असें डॉ. महाशयांचें म्हणणें आहे. अशा तऱ्हेच्या शिलापट्टपेटिका कराची येथें असल्याची एक जुनी नोंद आहे. ब्रौही नांवाची द्राविडसम भाषा बलुचिस्थानांत एका प्रदेशांत बोलतात अशी भाषाशास्त्रज्ञांची दखल आहे आणि शिलापट्ट–पेटिका परत भूमध्य समुद्राभोंवतीं सांपडतात असें उत्खननाचार्यांचें म्हणणें आहे. सारांश, द्रविड भाषा बोलणारे लोक भूमध्य समुद्राजवळील कोणच्या तरी प्रदेशांतून बलुचिस्थानमार्गे सिंधु नदीच्या मुखाशीं येऊन तेथून " अस्थल वर्त्मना " म्हणजे ( खुष्कीचा मार्ग सोडून ) समुद्रमार्गे दाक्षिणेकडे येऊन पोचले अशी तर्कपरंपरा वरील संशोधक लावतात. ह्या सिद्धांताच्या सयुक्ततेची छाननी करण्याचें हें ठिकाण नव्हे. पण वरील सिद्धांत जर खरा असेल तर पश्चिम समुद्र किंवा पूर्व समुद्र हें हिंदुस्थानचें एक अत्यंत महत्त्वाचें सांस्कृतिक दार ठरतें. कारण त्या दारानें भारतीय संस्कृति-निर्मितींतील एक मोठा भागीदार भारतांत आला असें होईल.

नारळाची लागवड मलाया देशांतून दक्षिण हिंदुस्थानांत आली असा भाषाशास्त्रज्ञांचा तर्क आहे. नारळाचीं झाडें लावणारे, त्यावर चढणारे व दारू तयार करणारे मलबारांतील इळवा अथवा थिय्या हे लोक आपण हिंदुस्थानाबाहेरून आलों असें सांगतात. जसे उत्तरेकडे ईशान्येकडून लोक आले तसेंच दाक्षिणेकडे मलायांतून लोक आंत येण्याचा संभव होता, पण त्याबद्दल नक्की पुरावा कांहीं नाहीं. उत्तर–दक्षिण व पूर्व–पश्चिम ह्यां-मधल्या मार्गावर हिंदुस्थान आहे हें निश्चित व हें भौगोलिक स्थान भारताच्या सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीनें अती महत्त्वाचें आहे.

उत्तरेकडून आलेल्या लोकांबद्दल भारताच्या इतिहासांत व पुराणांत कितीतरी उल्लेख आहेत. त्या मानानें पूर्वेकडील लोकांच्याबद्दल उल्लेख नाहींत. ज्यांचा पुराणांत नाग म्हणून उल्लेख येतो ते लोक पूर्वेकडून आलेले होते कीं काय अशी शंका वाटते. दक्षिणेकडे दाक्षिणात्य, विशेषतः

पूर्व किनाऱ्यावरील दाक्षिणात्य, पूर्व समुद्राच्या मार्गानें जावा, सुमात्रा, बोर्निओ वगैरे प्रांतांत गेल्याचे थोडथोडे उल्लेख सांपडतात, पण बाहेरून आंत आलेल्या लोकांचे उल्लेख मुळींच नाहींत. आपल्या संस्कृतीचा इतिहास ह्या संशोधनाच्या अभावीं आतिशय अपुरा व कोता राहिलेला आहे. आर्य आणि द्राविड यांचा उल्लेख आपण वारंवार करतों पण पूर्वे-कडून आलेल्या ह्या तिसऱ्या भागीदाराला विसरून चालणार नाहीं. तो आतिप्राचीन कालांत हिंदुस्थानांत स्थायिक झाला असावा व आपल्या न कळत पूर्वेकडील द्वारानें हळूं हळूं आंत शिरकत राहिला असावा, कारण त्याची भाषा आज महाराष्ट्राच्या मध्यावर जिवंत आहे.

भारतांत महाराष्ट्राचें स्थानही कांहीं दृष्ट्या वैशिष्ट्यपूर्ण आहे. महाराष्ट्राच्या चतुःसीमा साधारणतः पुढील प्रमाणें आहेत. पश्चिमेकडे दमण ते गोवा पश्चिम समुद्र आहे. उत्तरेकडे सातपुडा व विंध्य पर्वताच्या रांगा पसरलेल्या आहेत. आग्नेय टोकाला बस्तर संस्थानची व आहिरी जमीनदारीचीं जंगलें पसरलेलीं आहेत. पश्चिमेला लागून कोठचाच शेजारी नाहीं. उत्तरेकडच्या व पूर्वेकडच्या डोंगरांतून व अरण्यांतून निरानिराळ्या जातींचे रानटी लोक रहातात पण महाराष्ट्रांतील बाकीच्या लोकांशीं त्यांची सांस्कृतिक देवाण-घेवाण फार थोडी आहे. ह्याउलट दक्षिणेकडची महाराष्ट्राची सीमा संस्कृति-संपन्न अशा तेलंगण व कर्नाटक ह्या देशांना लागून आहे. तेलंगण, कर्नाटक व महाराष्ट्र ह्यांना विभागणारी नैसर्गिक सीमा नाहींच असें म्हटलें तरी चालेल. गंगा यमुनेचें सुपीक, सपाट खोरें व त्यांत परिणत झालेली संस्कृति आणि महाराष्ट्राची भूमि ह्यांमध्यें संस्कृत व प्राकृत वाङ्मयाला परिचित अशी विंध्याटवी पसरलेली आहे. विंध्य-सातपुडांच्या दाट रानांनीं भरलेल्या, श्वापदांनीं व्यापलेल्या रांगांमधून निषादादि वन्य लोकांची वस्ती होती व दाक्षिणोत्तर जाणाऱ्या व्यापाऱ्यांच्या तांड्यांवर धाड घालून वाटमारी करणें हा त्यांचा नित्याचा उद्योग होता असें संस्कृत, अर्धमागधी व पाली वाङ्मय स्पष्ट सांगतें. विंध्याच्या उत्त-रेच्या भारतांतून दक्षिणेकडे जाण्याचे कांहीं मार्ग प्राचीन कालापासून आतांपर्यंत अस्तित्वांत आहेत व त्यांतील बरेच महाराष्ट्रांतून जातात.

पहिला मार्ग बंगाल्यांतून समुद्र किनाऱ्यानें ओरिसांतून जगन्नाथपुरी, कोणार्क, चिलका सरोवर ह्या वाटेनें गोदावरीच्या मुखाजवळ येऊन पोचतो. ( हल्लींचा मद्रास ते कलकत्ता लोहमार्ग ह्याच वाटेनें नेलेला आहे. ) हा मार्ग महाराष्ट्राच्या दृष्टीनें महत्वाचा नाहीं. पण बंगाल्यांतून पुरी पर्यंत येऊन पुढें समुद्रकिनाऱ्यानें न जातां पश्चिमेकडे वळलें म्हणजे महाराष्ट्रांत पोचतां येते.

दुसरा मार्ग छत्तिसगडच्या पठारावरून वैनगंगा व वर्धा ह्यांच्या दोआबांत पोचतो. मगध ( बिहार ), बंग ( बंगाल ) व कलिंग ( ओरिसा ) ह्या तीनही देशांतून ह्या मार्गें महाराष्ट्रांत शिरतां येतें किंवा पूर्व महाराष्ट्रांतून उत्तरेकडे जातां येतें. ह्याच मार्गानें संताळ, मुंड अथवा हो, कोरकु वगैरे मॉन्‌ख्मेर गटांतील भाषा बोलणारे लोक हिंदुस्थानांतच नव्हे तर थेट महाराष्ट्रांत येऊन राहिले आहेत. ह्याच मार्गें कदाचित अगस्ति दक्षिण–पथाला आला असावा व वाटेंत वैदर्भी लोपामुद्रेला त्यानें परिणिलें असावें. हाच मार्ग पुढें वर्धा नदीवरून दक्षिणेला तेलंगणांत गेलेला आहे. उलट दिशेनें ह्याच मार्गानें नागपूरकर भोसल्यांच्या फौजा कटक, पुरी येथे गेल्या.

तिसरा मार्ग उत्तरेकडून दक्षिणेकडे जातांना भेडाघाट येथें नर्मदा ओलांडतो. जबलपूरहून प्रयाग व जबलपूरहून बऱ्हाणपूर असा हा मार्ग आहे.

महाभारतांत नलोपाख्यानांत नळ राजानें दमयंतीला एका ठिकाणाहून फुटणारे पांच मार्ग दाखविले आहेत.

> एते गच्छंति बहवः पन्थानो दक्षिणापथम्
> अवंतीमृक्षवन्तं च समतिक्रम्य पर्वतम् ॥
> एष विन्ध्यो महाशैलः पयोष्णीच समुद्रगा
> आश्रमाश्च महर्षीणाममी पुष्पफलान्विताः ॥
> एष पन्था विदर्भाणामयं गच्छाति कोसलान्
> अतः परं च देशोऽयं दक्षिणे दक्षिणापथः ॥

ह्या वर्णनावरून असें वाटते कीं नळ राजा तापीच्या उत्तरेला कोठेंतरी पर्वतावर उभा राहून माळवा, दक्षिणकोसल ( मध्य प्रदेश ), वऱ्हाड व तापी नदी दमयंतीला दाखवीत होता. त्याचप्रमाणें विदर्भाच्या रस्त्यापलीकडे लांबवर बोट करून "हा लांब दिसतो तो रस्ता दक्षिणापथाला जातो" असें सांगत होता. विदर्भाच्या दक्षिणेकडील देशांचें नांव तो घेत नाही. हें वर्णन नर्मदा खोऱ्यांतील नसून तेथून पश्चिमेकडे बऱ्हाणपूर जवळील गाविलगड किंवा त्याच्याच जवळपासच्या दुसऱ्या एकाद्या पर्वतावरून दिसणाऱ्या प्रदेशाबद्दल केलेलें वाटतें.

तेथेंच जवळपास चौथा मार्ग आहे. हा मार्ग तापीवरून आहे व तो बऱ्हाणपूरचा. येथें सातपुड्यांत मोठी खिंड आहे व हल्लींचा मुंबई–दिल्ली हा लोहमार्ग ह्या खिंडींतून जातो. ह्या खिंडीच्या पूर्वेकडे गाविलगड ( चिखलदऱ्याचें पठार ) व पश्चिमेकडे आशीरगड असे दोन प्रचंड किल्ले आहेत. ह्या मार्गानें कित्येक लोकसंघ उत्तरेकडून दक्षिणेकडे आले. उत्तर महाराष्ट्रांत वसति केलेल्या गुजर, पवार, अहिर इत्यादि जमाती ह्याच मार्गें आल्या असाव्या असें वाटतें. ह्याच मार्गें इतिहास कालांत मुसलमानांनीं दक्षिणेकडे स्वाऱ्या केल्या व ह्याच मार्गानें मराठे दिल्लीवर स्वारी करून गेले. हल्लींच्या लोहमार्गाच्या किंचित् पूर्वेला वाशिम, वेरुळ व अजिंठ्याच्या लेण्यांनीं सूचित केलेला जुना राजमार्ग मराठवाड्यांतून व खानदेशांतून येऊन बऱ्हाणपूरला मिळतो.

पांचवा मार्ग परत समुद्राच्या किनाऱ्या किनाऱ्यानें येतो. उत्तर गुजरात, लाटदेश ( दक्षिण गुजरात ), ह्यांतून उत्तर कोंकणांत येऊन हा मार्ग घाटावरून पूर्वेकडे देशावर येऊन पोचतो व त्याचाच एक फाटा थेट समुद्राच्या किनाऱ्या किनाऱ्यानें दक्षिणेकडे जातो. उत्तरेकडे ह्या मार्गाला दोन फांटे फुटतात, एक पश्चिमेकडे वळून कच्छच्या रणांतून थेट सिंधू नदीच्या तीराशीं जातो ह्या मार्गाचा उल्लेख जुन्या गुर्जर वाङ्मयांत पुष्कळदां येतो. काठेवाडचे म्हणजेच सोरठाचे राजे मरुदेश ओलांडून सिंधच्या पश्चिम सीमेवर जात असत. तसेंच सिंधच्या राजांनीं काठेवाडवर आक्रमण केल्याचेही उल्लेख आहेत.

# उत्तरेकडून महाराष्ट्रांत आलेले निरनिराळे मार्ग

हिंदुस्थानांत देवीचीं जीं कांहीं प्रसिद्ध स्थानें आहेत त्यांत हिंगुळजा मातेचें स्थान आहे. तिलाच काठेवाडांत व गुजरातेंत हिंगलाज माता म्हणतात व तिचें देऊळ सिंधमध्यें जवळ जवळ बलुचिस्तानच्या हद्दीवर आहे. ह्याच हिंगलाज मातेचें एक ठिकाण कोंकणांत चौल येथें आहे.

दुसरा फाटा राजस्थानांतून थेट पंजाबांत जातो व तेथुन खैबर खिंडी-पर्यंत पोंचतां येतें. मध्य आशियाच्या पठारावरील भटक्या टोळ्या, कास्पियन समुद्राकांठचे आर्य, व्यापारी पणी, आर्मेनिया, तुर्कस्थान, इराक वगैरेकडील व्यापारी व शक आणि क्षत्रप ह्या आक्रमक जमाती ह्याच मार्गानें हिंदुस्थानांत येऊन थेट महाराष्ट्रापर्यंत येऊन भिडल्या.

ह्याच वाटेनें गुजरातच्या कित्येक जमाती दक्षिणेकडे आल्या. नाशिक व नगर जिल्ह्यांत पसरलेले भावसार लोक, मुंबईतील खत्री, मराठ-वाड्यांतील ब्रह्मक्षत्री, कर्नाटकांतील पटवेगार ऊर्फ ब्रह्मक्षत्रिय ह्या जमाती वरील मार्गानें महाराष्ट्रांत व दक्षिणेंत आल्या असाव्यात. ह्याच मार्गानें येथून रजपूताना, काठेवाड व गुजरात येथील जमातींनीं मुंबईत आपला जम आजच्या काळांतही बसवलेला आहे. अर्थात् ह्या पांची मार्गांनीं केवळ उत्तरेकडचेच लोक दक्षिणेकडे आले असें नव्हे तर दक्षिणेकडचे लोकही उत्तर प्रदेशांत गेले असले पाहिजेत. वन्य जमातींपैकीं दक्षिणे-कडून गेलेल्या लोकांच्यांतील कोलाम व गोंड असावेत असें वाटतें. इतर कोणते लोक दक्षिणेकडून उत्तरेंत गेले त्याबद्दलचा उल्लेख आपल्या इतिहासांत नाहीं. फक्त दक्षिणेंतील राजांनीं उत्तरेकडे केलेल्या स्वाऱ्यांचीं वर्णनें मात्र आढळतात. त्यांत ह्या पांचही मार्गांचा उपयोग केलेला दिसतो. वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध वाकाटकांचें घराणें मूळचें द्राविड असावें असा कांहीं संशोधकांचा दावा आहे. दक्षिणेकडील चालुक्य, तसेंच राष्ट्र-कूट हीं घराणीं गुजरातेंत आपल्या शाखा टिकवून होत्या हें प्रसिद्धच आहे.

ह्याप्रमाणें अतिप्राचीन कालापासून महाराष्ट्राच्या प्रदेशांत उत्तर हिंदु-स्थानांतील व दक्षिण हिंदुस्थानांतील लोक शिरत होते. एवढेंच नाहीं तर ह्याच मार्गे येऊन शकादि हिंदुस्थानच्या बाहेरचे लोकही महाराष्ट्रांत पोचून स्थायिक झाले.

गोदावरीचें खोरें हें महाराष्ट्राच्या संस्कृतीचें एक जन्मस्थान आहे व त्याच खोऱ्यांत उत्तरेकडील लोक व दक्षिणात्य ह्यांच्या चाललेल्या झगड्याचें सुंदर चित्रण रामायणांत पहावयास मिळतें. गोदावरीच्या दक्षिणेला कृष्णा व तुंगभद्रा ह्या नद्यांच्या खोऱ्यांतून प्राचीन मनुष्यवस्तीचे अवशेष भरपूर सांपडतात. विशेषतः ५ ते १० हजार वर्षांपूर्वीचीं घासून गुळगुळीत केलेली दगडाचीं हत्यारें सर्वत्र दिसतात. गोदावरीच्या खोऱ्यांत मनुष्याच्या प्राचीनतम वस्तीचे अवशेष अजूनपर्यंत मिळाले नव्हते. पण गेल्या फेब्रुवारी–मार्चमध्यें ( १९५१ ) तसे अवशेष मिळाले. पुण्यांतील डेक्कन कॉलेजची मंडळी पुणें विद्यापीठातर्फे नाशिकला गोदावरीतीरीं उत्खनन करीत होती. त्याचवेळीं नाशिकपासून कांहीं मैलांवर गोदावरीच्या उगमापासून ७।८ मैलांवर नदीला मातकामाचा मोठा बंधारा घालण्याचें काम सुरू होतें. कांहीं ठिकाणी बंधाऱ्याच्या भिंतीचा पाया घेण्यास तीस फूट खोलीपर्यंत खणती झाली होती. अशा खणतीच्या जागीं पहाणी केल्यास नदीचा गेल्या कित्येक सहस्रकांचा इतिहास कळतो म्हणून आम्ही ती जागा पहावयास गेलों, तों तेथें अश्मयुगीन हत्यारें मिळालीं. इंजिनीयर लोकांनीं बांध घालावयाच्या जागेचा नकाशा करून दर १०० फूटावर एक ह्याप्रमाणें खोल भोकें घेतलीं होतीं, व थेट कठीण कातळ लागेपर्यंत भोकें पाडून वरपासून खालपर्यंत जमिनीची रचना कशी आहे ह्याचे आलेख घेतले होते. त्यावरून असें दिसतें कीं सुमारें लाख वर्षांपूर्वी गोदावरी काळ्या ट्रॅप कातळावरून वहात होती व तिचें पात्र कांहीं ठिकाणीं हल्लीपेक्षां ६०।७० फूट खोल होतें. हळूं हळूं नदीनें आणलेल्या गोट्यांमुळें व मातीमुळें पात्र होरून जाऊं लागलें व नदी आतांपेक्षां ३० फूट खालीं वाहूं लागली. येथपासून मनुष्यवसतीचे अवशेष स्पष्ट सांपडूं लागतात. अजूनही बंधाऱ्याचें काम चाललें आहे व नुसतीं दगडाचीं हत्यारेंच नव्हेत तर प्रत्यक्ष मनुष्याचीं हाडें सांपडावी अशी इच्छा व आशा आहे. गोदावरी व वर्धा आणि वैनगंगा ह्यांचा संगम ज्या प्रदेशांत होतो त्या प्रदेशांत आजही निबिड अरण्य आहे. पूर्वीच्यां काळीं तशाच तऱ्हेचें निबिड अरण्य गोदावरीच्या काठीं थेट नाशिकपर्यंत पसरलेलें असलें पाहिजे. दक्षिणेकडचा

प्रदेश ह्या मानानें कमी झाडीचा व प्राचीन मानवांना राहण्यास व शेती करण्यास जास्त सोईचा होता. उत्तरेकडून संस्कृत भाषा बोलणारे लोक लहान लहान गट करून गोदावरीच्या कांठीं राहूं लागले होते. गोदावरीचा हा मुलुख त्यावेळचा दक्षिणेकडचा राजा जो रावण त्याच्या सीमाप्रांतांतील मुलूख असावा तेथें त्यांचीही वसति विशेष दाट नसावी. बहुतकरून येथें उत्तरेकडच्या वसाहतवाल्यांनीं दाक्षिणात्यांना जिंकून आपलें वर्चस्व स्थापलें. अशा तऱ्हेनें महाराष्ट्राच्या भौगोलिक परिस्थितीमुळें महाराष्ट्रांत उत्तरेकडील व दक्षिणेकडील संस्कृतीचा संघर्ष व संगम झालेला दिसतो.

नुसता भाषेनें व संस्कृतीनेंच महाराष्ट्र एक आहे असें नव्हे तर भूस्तर शास्त्राचे दृष्टीनेंही तो एकसंध आहे ही एक आश्चर्यकारक घटना आहे.

भूस्तर शास्त्रांत ज्याला ट्रॅप असें इंग्रजी नांव आहे, अशा दगडांचा प्रदेश तो महाराष्ट्र अशी महाराष्ट्राची व्याख्या फारशी चूक होणार नाहीं. भारताचे भूस्तरशास्त्रदृष्ट्या कांहीं मोठे विभाग पाडलेले आहेत. भूपृष्ठावरील दगडाची जात व काल ह्यांवरून हे विभाग केलेले आहेत, ते खालीलप्रमाणें आहेत—

( १ ) हिमालय पर्वत.
( २ ) गंगेचें खोरें.
( ३ ) पश्चिम पंजाब, अरवली, विंध्य व राजमहल डोंगर असा दुसऱ्या विभागाभोवतालचा डोंगराळ पट्टा.
( ४ ) दक्षिणचा कातळ ( डेक्कन ट्रॅप ).
( ५ ) हैदराबाद, कर्नाटक वगैरे प्रांतांतून आढळून येणारा प्राचीन दगडांचा विभाग. हा पांचवा विभाग रामेश्वरपर्यंत पसरलेला आहे.

हे पांच विभाग म्हणजे अति मोठे विभाग आहेत. प्रत्येकांत बारीक बारीक विभाग पुष्कळ आहेत पण त्यांचा विचार करण्याचें आपणास येथें कारण नाहीं. दक्षिणचा ट्रॅप ज्या विभागाला म्हणतात तो महाराष्ट्राच्या ईशान्य भागाखेरीज सर्व महाराष्ट्रांत आहे व महाराष्ट्राबाहेर कांहीं थोड्या प्रमाणांत गुजरात, काठेवाड व सिंध येथपर्यंत पोंचला आहे.

फार प्राचीन काळीं म्हणजे सुमारें ७ कोटी वर्षांपूर्वी सध्यां जेथें महाराष्ट्र आहे तो प्रदेश सध्यापेक्षां २-३ हजार फूट सखल होता. एकाएकीं ह्या प्रदेशाला मोठमोठ्या भेगा पाडून त्यांतून ज्वालामुखींतून वहातात तशा तापलेल्या अश्म रसाच्या नद्या वाहूं लागल्या. सपाट भूमीवर त्या हजारों मैल लांब व रुंद अशा पसरल्या. कांहीं काळ जमिनीला भेगा पडून अश्म रस वहाण्याची क्रिया जोरांत चाले, मध्येंच ही क्रिया थंडावे. अश्मरस थंड होऊन घट्ट होई. त्याच्यावर पावसाचें पाणी पडे, वरचा थर भिजे व त्याची माती होई. परत कांहीं सहस्रकांनीं जमिनीला भेगा पडत व नव्यानें पृथ्वींतील आग उफाळून वर निघे आणि जुन्या थरावर नवीं पुटें बसत. अशा प्रमाणें होत होत जुन्या पृष्ठभागावर दहा हजार फुटांपर्यंत थर चढत गेले. जुना पृष्ठभाग पार नाहीसा झाला व एक नवीन काळ्या कातळाचा पृष्ठभाग तयार झाला. हाच महाराष्ट्रांतील काळा कातळ किंवा ट्रॅप. जमिनीच्या भेगांतून रस वर येऊन जमिनीवर सपाट पसरे. तो थिजे तों दुसरे थर वर येत अशा तऱ्हेनें थराथरानें वाढत गेलेला हा भूभाग व डोंगर मोठमोठ्या पायऱ्यांनीं वर गेलेले दिसतात म्हणून त्यांना ट्रॅप असें नांव पडलें आहे. एका थराची उंची साधारणपणें १० ते १५ फूट असते. कधीं कधीं ५० फुटांपर्यंतही असूं शकते. कातळाच्या थरांमध्यें कमी घन व ढिसूळ असे हिरवट पिवळट किंवा राखी रंगाचे थर असतात, हे अश्मरस थंड होत असतांना वरच्या बाजूला निर्माण होतात. लाव्हाची राख, अश्मरसावरची साय, वगैरे ह्यांत असतात. खंडाळ्याचा रेल्वेचा घाट किंवा महाबळेश्वरचा घाट, नाशिकला जातांना लागणारा हणमंत नाईकाचा घाट किंवा दगड कापून रस्ता नेला असेल अशा दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं दगडाची ही रचना स्पष्ट दिसते. ह्याहीपेक्षां अति चटकन् ही थराथरांची रचना पहावयाची असल्यास महाबळेश्वरला साबित्रीच्या उगमाजवळ उभें राहून सावित्रीनें कापलेल्या प्रचंड कड्याकडे नजर टाकली म्हणजे काळा भोर कातळ, मधें किंचित मऊ थर व त्यावर उगवलेलीं झुडपें व गवत, परत काळा थर असे विभाग अगदीं स्पष्ट दिसतात. त्याचप्रमाणें हे ट्रॅपचे डोंगर माथ्यावर सपाट,

चौकोनी असतात व स्वभावतःच त्यांना बांधीव किल्लयाचा आकार येतो. किल्लयाची तटबंदीच जणूं अशा १५–२० फूट उंचीच्या काळ्या कातळाची कड वरील माती धुपून जाऊन उघडी पडते. पांचगणीला अशा कातळावर शाळेचें खेळावयाचें मैदान बऱ्याच जणांनीं पाहिलें असेल. त्याच प्रमाणें कमळगड, पांडवगड हे किल्लेही कित्येकांनीं पाहिले असतीलच. डोंगरांची स्वाभाविक रचनाच मुळीं किल्लयासारखी असते. वरती सपाट मैदान असल्यामुळें शिबंदीला रहाण्यासाठीं ऐसपैस बांधकाम करतां येतें. कातळाच्या भेगांतून पाणी झिरपून झरे होतात. ते बांधून काढून गोड्या पाण्याचा पुरवठा होतो. असे किल्ले जेथें जेथें डोंगराचें लहानसें टोक आलें आहे तेथें सर्व महाराष्ट्रभर बांधलेले आहेत व ज्यांना किल्ला नांव देतां येत नाहीं असे लहान लहान दुर्ग किती आहेत त्याला पत्ता नाहीं. ह्या ट्रॅप दगडावरच पूर्व व उत्तर महाराष्ट्रांतील काळी भोर चिकणमाती पसरलेली आहे. प्रत्येक भूविभागाचें वैशिष्टयपूर्ण असें स्वरूप असतें. गंगेचें पिवळसर पांढुरक्या माती-मिश्रित बाळूचें सपाट खोरें, रजपुतान्याचे वेडेवांकडे झिजलेले व वाळूंत अर्धवट बुडलेले डोंगर व भोंवतालचा वृक्षहीन बैराण प्रदेश हीं जितकीं वैशिष्टयपूर्ण तितकेंच व्यक्तिमत्व महाराष्ट्रांतील सृष्टीचें आहे. पायऱ्या पायऱ्यांनीं जणुं चढत जाणारे, वरती चौकोनी सपाट काळ्या कातळाचे डोंगर, ते झालरीप्रमाणें कांतून त्यांच्या खोल दऱ्यांतून वहाणाऱ्या उल्हास सारख्या नद्या, भेगा पडलेल्या काळ्याभोर शेतजमिनी व लांबवर दिसणारे डोंगर हें महाराष्ट्राचें नैसर्गिक स्वरूप त्याला ट्रॅपमुळें मिळालें आहे व माणसानें त्या ट्रॅपच्या प्रत्येक टोकावर किल्ले उभे करून, शंकराचीं देवळें बांधून व लेणीं खोदून त्याला संस्कारित केलें आहे. ट्रॅपच्या काळ्या दगडाला मराठ्यांच्या लढाऊ व स्वातंत्र्यप्रिय वृत्तीनें किल्लयांचें रूप दिलें. भोळ्या दिगंबर शंकराची व इतर वन्य देवतांचीं स्थानें स्थापून आपल्या हृदयांतील भोळ्या वन्य वृत्तीचा आविष्कार केला. आणि दगडांच्या उभ्या भिंतींत लेणीं खोदून आपल्या चिकाटीची, असामान्य कलात्मकतेची व कणखर सौंदर्यदृष्टीची जगाला ओळख पटविली.

महाराष्ट्राच्या पठारावरील काळ्याभोर जमिनींत पावसाळी, मुख्यतः हिंवाळी शेती होते. पाऊस बेताचा पडतो म्हणून मुख्य पीक बाजरी-जोंधळ्याचें व गहूं-हरभऱ्याचें. कोंकणांत पाऊस खूप पण जमीन निकस म्हणून त्रावणकोर, बंगाल व गंगा खोरें ह्यांप्रमाणें वर्षाचे तीनही ऋतूंना पुरेल इतकें काम शेतांत नाहीं. महाराष्ट्रांतील माणसें शेती व लढाई अशीं दोन्ही कामें संभाळून शेतकरी-क्षत्रिय असा असामान्य लौकिक मिळवून आहेत.

सातपुडा व सह्याद्री ह्यांच्या डोंगराळ भागांत आजही वन्य व अर्धवट वन्य जाती आहेत. त्यांचा मराठी लोकांशीं नित्याचा संबंध आहे. डोंगरांच्या व डोंगरी लोकांच्या सान्निध्यानें मराठ्यांचा रांगडेपणा आज-तागायत कायम आहे.

वर्धेच्या खोऱ्याशीं पोचलें कीं महाराष्ट्राचें रूप थोडें पालटतें. तरीही नागपूरच्या लहानशा बरडीवरचा किल्ला महाराष्ट्रांतील लोकांच्या गड बांधण्याच्या हौशीची साक्ष देतोच. वर्धेचें खोरें व वैनगंगेचें खोरें हीं लहानमोठ्या तलावांनीं भरलेलीं आहेत. जसजसें पूर्वेकडे जावें तसतशी ह्या मनुष्यनिर्मित तळ्यांची संख्या वाढते व वैनगंगेच्या खोऱ्यांतील गांवांतून व रानांतून हीं तळीं म्हणजे तेथल्या सृष्टीचें वैशिष्ट्य होऊन बसतें. सर्व तलावांतून शिंगाडे होतात व ते काढून विकणारे लोक ढीवर ऊर्फ कोळी ह्या नांवानें ओळखले जातात. सर्व तळीं मातीचा बांध घालून केलेलीं आहेत व तीं होण्यास लागणारी विशिष्ट भूरचनाही ह्या प्रदेशांत दिसते. हा भूप्रदेश ट्रॅप वरच्या काळ्याशार मातीच्या थराप्रमाणें सपाट नसून उंच-सखल आहे. सखल भागांत पावसाचें पाणी सांठतें व ज्या एका बाजूनें प्रवाह वाहील तेथें मातीचा रुंद बांध घालून तलाव करतात व त्याला एका बाजूनें तोंड ठेवलें कीं त्यांतून वहाणाऱ्या पाण्यावर खालच्या बाजूला भातशेती करतात व ऊंस लावतात. ह्या बाजूला पाऊस चांगला म्हणजे ४०-४५ इंचापर्यंत पडतो; त्यानें तळीं भरलेलीं रहातात पण बांध फुटेल इतका मोठा पूर सहसा येत नाहीं. पाण्यानें भरलेलीं तळीं, त्याकाठीं लांबून दिसणारी हिरवळ, शेजारचीं भातशेतें व पळसाच्या तांबड्याभडक फुलांनीं भरलेलीं रानें असा

महाराष्ट्राच्या पूर्वसीमेवरचा देखावा एकदां पाहिला कीं विसरणें शक्य नाहीं असा आहे.

खुद्द महाराष्ट्राची अंतर्गत रचनाही विचार करण्यासारखी आहे. भौगोलिकदृष्ट्या महाराष्ट्राचे तीन मुख्य विभाग पडतात.

सगळ्यांत पश्चिमेकडचा विभाग म्हणजे कोंकणपट्टी. पश्चिम समुद्र व सह्याद्रि ह्यांमध्यें असलेली ही अरुंद पट्टी उत्तरेला दमण व दक्षिणेला वेंगुर्ल्यापर्यंत पसरली आहे. वेंगुर्ल्यापासून मंगळूरपर्यंतच्या भागालाही कोंकण म्हणतात. उत्तर कोंकणांत मराठी लोक रहातात. दक्षिण कोंकणांत कोंकणी बोलणारे सारस्वत व कानडी आणि तुळू बोलणारे लोक रहातात. भाषेच्या दृष्टीनें उत्तर कोंकण एकसंघ आहे. भाषेबद्दल विवेचन पुढें येईलच. कोंकणालाच पूर्वी अपरांत असें नांव आढळतें. अपरांताच्या सीमा ठरवणें कठीण आहे. भृगुकच्छ ते गोकर्ण एवढा प्रदेश अपरांतांत येत असे. ह्या अपरांताचेच पुढें लाट व कोंकण असे दोन भाग पडले. पैकीं लाट प्रदेश म्हणजे हल्लींचा दक्षिण गुजरात होय. दक्षिण गुजरात व उत्तर कोंकण ह्यामध्यें भौगोलिक, वांशिक व वाक्प्रचारदृष्ट्या पुष्कळच साम्य आहे. महाराष्ट्राची संस्कृति नीट समजण्यासाठीं लाट प्रदेशांतील संस्कृतीचा अभ्यास होणें फार जरूर आहे.

कोंकण उत्तरेकडून लाट, गुजरातशीं जोडलेलें आहे व कोंकणचा गुजरातशीं बराच संबंध असावा असें वाटतें. पण वेगानें वहाणाऱ्या लहान लहान नद्या व त्यांच्या खाड्या आणि समुद्रापर्यंत पसरलेले सह्याद्रीचे फाटे ह्यांमुळें कोंकणांत दळणवळण सोयीचें नाहीं. घाट माथ्यावर कितीतरी पायरस्ते व गाडीरस्ते कोंकणांतून गेलेले आहेत. ह्यांतील कांहीं डोंगरी रस्ते ऊर्फ घाट फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहेत. जुन्नर जवळचा नाणेघाट अति प्राचीन आहे. चेऊल व कल्याण ह्या बंदरांना महाराष्ट्राची जुनी राजधानी जी पैठण हिला जोडणारा राजमार्ग ह्या घाटांतूनच गेलेला आहे. दुसरा मार्ग बुद्ध लेण्यांनीं दर्शविलेला म्हणजे उल्हास नदीवरील कोंडाणें येथील लेणीं, (राजमाचीवरील विहार), व तेथून घाटावर मावळांत इंद्रायणीच्या (शिलालेखांत हिला इंद्रा म्हटलेलें आहे) खोऱ्यांत येणारा मार्ग. ह्या मार्गावर पुढें भाजें, बेडसें, शेलारवाडी,

शिरवळ व कऱ्हाड बाई ( लोहारें ) येथें लेणीं आहेत. तिसरा मार्ग कर्नाटक महाराष्ट्राच्या हद्दीवरून कोंकणांत पोचणारा आहे. ह्यामार्गे कोंकणांतलि कदंब, घाटावरील चालुक्य व पल्लव राजांशीं संबंध ठेवीत होते. याप्रमाणें कोंकण व घाट यांत जरी जुन्या काळापासून संबंध होता तरी दळणवळण कष्टाचें होतें./घाटावरच्या मुली कोंकणांत भाताच्या मुलखांत जावयास तयार नसत व म्हणून महाराष्ट्राचीच, पण भौगोलिक परिस्थितीमुळें जरा वेगळीच, अशी एक उपसंस्कृति कोंकणांत आढळते. कोंकणी मराठी बोली, कोंकणी पोषाख, कोंकणी घरें, कोंकणी शेती व कोंकणी खेडीं ह्या सर्वांत ही महाराष्ट्रांतर्गत विशिष्ट संस्कृति दिसते व त्याचें कारण मुख्यत्वें भौगोलिक परिस्थितीच आहे.

घाट चढून आलें म्हणजे महाराष्ट्राचें प्रचंड पठार लागते. ह्या महाराष्ट्राचें वर्णन करावयाचें म्हणजे त्यांतील नद्यांच्या व डोंगरांच्याच अनुषंगानें करावें लागेल. नाशिक जिल्ह्याच्या उत्तर सीमेपर्यंत सह्याद्रीच्या मुख्य रांगा दक्षिणोत्तर पसरलेल्या आहेत. अधून मधून बरेचसे फांटे पूर्व महाराष्ट्रांत गेले आहेत. त्या पूर्व—पश्चिम फाट्यांतूनच निरनिराळ्या नद्यांची खोरीं लागतात पण कोठेंही ह्या पूर्व—पश्चिम रांगा अति लांबवर सलग पसरलेल्या नाहींत. ह्या उलट नाशिकच्या उत्तरेस सह्याद्रीचे पूर्वेकडे जाणारे फांटे फार लांबवर म्हणजे थेट यवतमाळ चांद्यापर्यंत पसरले आहेत. ह्यालाच बालाघाट म्हणतात. औरंगाबाद येथें महाराष्ट्राचे कोंपर येतें. तेथून पूर्वेला महाराष्ट्राचा एक भाग पसरला आहे व दक्षिणेला दुसरा भाग पसरला आहे. ह्या दृष्टीनें देवगिरीचा किल्ला महाराष्ट्राच्या केंद्रस्थानीं आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. बालाघाटानें महाराष्ट्राचे दोन नैसर्गिक भाग पडले आहेत. पश्चिम सह्याद्रि व बालाघाट ह्यांमधला दक्षिणेकडला त्रिकोण हें उचलून धरलेलें एक उंच पठार आहे. उत्तरेला तापी व पूर्णा ह्यांच्या खोऱ्यांत जावयाचें तें उतरून जावें लागतें. दक्षिणेकडे नद्या पूर्ववाहिनी आहेत तर उत्तरेकडे पश्चिमवाहिनी आहेत. दक्षिणेकडे नाशिक ते नांदेड हा भाग गोदावरीच्या खोऱ्यांत येतो. नाशिक नगरकडच्या प्रदेशाला सेऊण देश व पूर्वेकडे


महाराष्ट्र
राजकीय व नैसर्गिक विभाग
न र्म दा न दी
निमर
खांडवा
बेतूल
छिंदवाडा
ता पी न दी
पश्चिम खानदेश
धुळे
जळगाव
पूर्व खानदेश
अमरावती
नागपूर
भंडारा
अकोला
वर्धा
वार्धा नदी
बुलढाणा
यवतमाळ
चान्दा
नाशीक
औरंगाबाद
गोदावरी नदी
अहमदनगर
परभणी
नांदेड
ठाणे
मुंबई
भीर
भीमा नदी
कुलाबा
पुणे
उस्मानाबाद
बिदर
सातारा
सोलापूर
रत्नागिरी
कोल्हापूर
बेळगांव
गोवा
कारवार

अस्सक अथवा अश्मक अशीं जुनीं नावें आढळतात. बालाघाट संपला कीं वर्धा-वैनगंगा ह्या पूर्व महाराष्ट्रांतील नद्या गोदावरीला येऊन मिळतात व त्या दृष्टीनें नागपूर ते भंडारा हा पट्टा गोदावरी खोऱ्यांतीलच म्हटला पाहिजे. ह्याला पूर्व-विदर्भ म्हणावें.

पुणें, सातारा, कोल्हापूर, मिरज व सांगली आणि सोलापूर हा विभाग गोदावरीच्या दक्षिणेस कृष्णेच्या खोऱ्यांत मोडतो. तापी-पूर्णा व गोदावरी ह्यांमध्यें जशी डोंगरांची मोठी रांग आहे व खोऱ्यांतील उंचीचा फरक आहे तसा फरक गोदा व कृष्णा ह्यांच्या खोऱ्यांत नाहीं. दोन्ही नद्या एकाच दिशेनें एकाच पठारावरून वहात जातात. नाशिक व पुणें ह्यांच्या दरम्यान नगर जिल्ह्यांतलें एक मोठें पठार येतें, त्यामुळें पुण्याच्या नद्या भीमेला मिळतात व नाशिक, नगरच्या गोदेला मिळतात. दोन खोऱ्यांतील फरक हा कीं, गोदा महाराष्ट्राची मध्य रेषा व संस्कृतीचा गाभा आहे, तर कृष्णा संस्कृति–सीमेवरची नदी आहे. गोदेचे खोरें फार प्राचीन काळापासून शेतीखालीं असल्यामुळें थेट त्रिंबकेश्वरापासून नांदेडपर्यंत नागरसंस्कृतीच्या खुणा दिसतात. खुद्द कृष्णा व तिच्या उपनद्या ह्यांच्या उगमाजवळच्या प्रदेशांत आजही दाट जंगलें आहेत व आजही बेरड, मांग गारुडी, फांसे-पारधी, घंटीचोर वगैरे अर्धवट रानटी व अर्धवट गुन्हेगार जातींपासून उभ्या पिकाचें रक्षण करतां करतां येथील शेतकऱ्यांच्या नाकीं नव येतात. गोदा-काठीं मराठी संस्कृति भरभराटली तर कृष्णा व तिच्या उपनद्या व दऱ्या-खोरीं ह्यांनीं तिला आक्रमकांपासून राखिलें. दक्षिण महाराष्ट्राच्या ह्या प्रदेशाला कुंतल देश असें जुनें नांव आहे., गोदावरी व कृष्णा ह्यांच्या खोऱ्यांना सर्वसाधारण, 'देश' असें नांव आहे. व तो 'कोंकण' शब्दाला विरोधार्थी उपयोगितात.

अजंठ्याचा घाट उतरला कीं तापी-पूर्णेचें खोरें लागतें. दक्षिणेच्या अंगाला सह्याद्रि व उत्तरेला सातपुडा अशा दोन समांतर पर्वत रांगांमध्यें ह्या नद्यांचें अरुन्द खोरें आहे. पूर्णेचें खोरें तो विदर्भ किंवा वऱ्हाड आणि तापीचें खोरें तो खानदेश व वऱ्हाडचा कांहीं भाग होतो. ह्या दोनही खोऱ्यांतली जमीन काळीभोर व अत्यंत सुपीक अशी आहे.

सह्याद्रि व सातपुड्याच्या रांगांतून वन्य जाती आजही भरपूर प्रमाणांत राहतात. उत्तरदक्षिण जोडणारा मोठा मार्ग ह्याच खोऱ्यांत बऱ्हाणपुरास तापी ओलांडून उतरतो, म्हणून उत्तरेकडचे लोक ह्या दोन्ही भागांत स्थायिक होऊन राहिलेले आहेत. बऱ्याच गांवचे पाटील रजपूत, लेवा, गुजर, पोवार वगैरे आहेत. भाषाही देशावरच्या भाषेपेक्षां पुष्कळ निराळी वाटते व तेथील देशभाषांना खानदेशी व वऱ्हाडी असे मराठीचे पोटभेद मानतात.

उमरावतीच्या पूर्वेला सखल टेकड्या ओलांडल्या कीं मनुष्य पूर्व महाराष्ट्रांत जाऊन पोचतो. वर्धा नदीच्या तीराशीं ट्रॅपचा खडक संपतो व ट्रॅप आणि पुराण खडक ह्यांच्या संधिप्रदेशांत महाराष्ट्रांतील सर्व खाणी सांपडतात. येथें वर्धा व वैनगंगा नद्या उत्तरेकडून दक्षिणेकडे जाऊन एकत्र होऊन गोदावरीला मिळतात. ह्या मुलखांत ईशान्येकडून येणारा उत्तरेकडचा मार्ग महाराष्ट्रांत येऊन पोचतो. येथेंही वसती मिश्र स्वरूपाची आहे. गोंड, गोवारी, हळबी, कोलाम वगैरे वन्य जाती, कोहाळी, पोवार ह्यांसारख्या उत्तरेकडील जाती, तेलंगणांतील जाती आणि मराठी कुणबी येथें एकत्र होऊन त्यांचें मराठीकरण होत आहे. हा प्रदेश महाराष्ट्राची सांस्कृतिक सरहद्द आहे. ह्याला आज स्वतंत्र असें नांव नाहीं, पण तो पूर्वीपासून विदर्भांतच मोडतो.

कोंकणपट्टी, गोदा व कृष्णा ह्यांचें खोरें, तापी व पूर्णेचें खोरें आणि वर्धा–वैनगंगेचें खोरें असे महाराष्ट्राचे चार स्वाभाविक विभाग आहेत व त्या प्रत्येकांत मराठी संस्कृतीचें स्वरूप थोडथोड्या फरकानें पहावयास सांपडतें.



# ३

# मराठी लोकांचा पिंड

## वंश व संस्कृति ह्यांचा संबंध

संस्कृति व वंश ह्यांचा कांहीं संबंध आहे का ह्या प्रश्नाला ' आहे ' व ' नाहीं ' अशीं दोन्ही उत्तरें द्यावीं लागतील. कशीं तीं पाहूं. संस्कृति मनुष्यानें निर्मिली आहे, व ती एका पिढीकडून दुसरीकडे संक्रान्त होते एवढेंच नाहीं तर निरनिराळे समाज संस्कृतीची देवघेव सारखी करीत असतात. जी विशिष्ट संस्कृति निर्माण होत असते तिचें स्वरूप निर्मात्यांच्या विशिष्ट आनुवंशिक गुणांवरच अवलंबून असतें का ? त्याचप्रमाणें सांस्कृतिक वैशिष्ट्यें त्या त्या समाजाचे विशिष्ट गुणधर्म दर्शवितात का ? हें समजलें म्हणजे वंश व संस्कृति ह्यांचा संबंध कळेल.

आनुवंशिक गुण कोणते ह्याचें संशोधन मनुष्य व मनुष्येतर प्राणी ह्यांचे बाबतींत पुष्कळ झालें आहे. पण त्या संशोधनानें प्रस्थापित केलेल्या गोष्टींतून आपल्या प्रश्नाला उत्तर मिळत नाहीं. बरेचसे शरीरगुण व कांहीं मानसिक गुण बऱ्याच अंशीं आनुवंशिक आहेत असें दिसून आलें आहे. आनुवंशिकत्व म्हणजे बीजजन्यत्व. आई व बाप ह्यांच्या बीजपेशींच्या संयोगानें नव्या जीवाची उत्पत्ति होते. त्या बीजपेशींत जे गुण असतील ते मुलाच्या अंगांत उतरणें म्हणजे आनुवंशिकत्व. कांहीं अंशीं हें आनुवंशिकत्व परिस्थितीवर अवलंबून असतें, पण तें बऱ्याच प्रमाणांत परिस्थिति-निरपेक्ष आहे असें संशोधनांत दिसून आलें. उदाहरणार्थ, काळ्या आईबापाचें मूल जरी उत्तरयुरोपांत

जन्माला आलें तरी त्याचे डोळे निळे, केस सोनेरी व रंग गुलाबी होणार नाहीं, कारण त्याचे आकारवर्णादि गुण बीजजन्य आहेत. "ढवळया शेजारीं बांधला पोवळा, वाण नाहीं पण गुण लागला" ह्या नेहेमीच्या म्हणींत हेंच सत्य सांगितलें आहे. ढवळा म्हणजे पांढरा बैल जरा द्वाड होता, त्याच्या शेजारीं पोंवळा म्हणजे तांबूस रंगाचा बैल बांधला. संगतीमुळें बैलांचा वाण ( वर्ण, रंग ) कांहीं बदलला नाहीं पण एकाचे द्वाड गुण मात्र दुसऱ्यानें उचलले. सांस्कृतिक निर्मिति व मूल्यें हीं दुसऱ्या वर्गांतील असतात. संगतीनें व साहचर्यानें तीं एकाचीं दुसऱ्याला उचलतां येतात पण शरीराची ठेवणमात्र बीजजन्य म्हणून बऱ्याच अंशीं आनुवंशिक असते. शरीराचा वर्ण, उंची, धडाचें पायांच्या लांबीशीं प्रमाण, डोळयाचा, नाकाचा, हातापायांचा आकार, डोक्याचा आकार हीं सर्व आनुवंशिक आहेत. त्याचप्रमाणें हातापायांना नेहेमीपेक्षां जास्त किंवा कमी बोटें असणें, रातांधळेपणा, वर्णांधळेपणा, रक्त न सांखळल्यामुळें जखमेंतून तें वहात रहाणें, वगैरे शारीरिक व्यंगेंही आनुवंशिक असतात. तसेंच गळा गोड असणें, कानाला स्वरांतील फरक समजणें, गणितांत डोकें चालणें, हे गुणही आनुवंशिक असावेत असें संशोधनावरून दिसतें. कांहीं तऱ्हेचीं वेडेंहीं आनुवंशिक असतात. बुद्धीची जडतासुद्धां आनुवंशिक असावी असें दिसतें. त्याचप्रमाणें हुशारीही थोड्याबहुत प्रमाणांत आनुवंशिक आहे. शरीराचे व रक्ताचे गुण पिढयानपिढया स्पष्ट दिसून येतात व तपासतां येऊन त्यांचें आनुवंशिकत्व किंवा परिस्थिति-सापेक्षत्व सिद्ध करणें सोपें असतें. पण हुशारी, कलात्मता, कल्पकता वगैरे गुणांचें मोजमाप करणें कठीण आहे, म्हणून त्यांचें आनुवंशिकत्वहि सिद्ध करणें कठीण. अंगीं गुण असूनही परिस्थितीमुळें त्यांचा विकास झाला नाहीं किंवा ते प्रकट करावयाची संधि मिळाली नाहीं, हें आपल्याला प्रत्यहीं दिसत असतें. अशा परिस्थितींत निरनिराळया मानवसमाजांच्या बुद्धीची परीक्षा करणें नुसतें कठीणच नव्हे तर अशक्य आहे. "कांहीं मानव समाज आजवर रानटी परिस्थितींत राहिले आहेत त्याअर्थी ते स्वभावतःच जडबुद्धि आहेत. व त्यांना संस्कृतीची निर्मिति कधींच करतां येणार नाहीं, त्यांनीं

कायमचेंच बुद्धिवान् मानववंशांच्या आधीन रहावें" असें पुष्कळ समाज-शास्त्रज्ञांचें व मानवशास्त्रज्ञांचें मत आहे.* समाजांच्या बुद्धीची परीक्षा दोन तीन तऱ्हेनें करतां येईल. कदाचित कांहीं समाजांतील माणसांचीं डोकीं इतकीं लहान असतील कीं, मेंदूच्या लघुत्वामुळें तीं माणसें जडबुद्धीचीं रहात असतील. मेंदूचें लघुत्व हें व्यंग सर्व मानव समाजांत, अगदीं उच्चतम संस्कृति असलेल्या मानव समाजांत सुद्धां, दिसतें. पण सबंध समाजच्या समाज त्या रोगानें पछाडलेला अजून कोणास आढळून आलेला नाहीं. अगदीं रानटी जातींत निरोगी मेंदूच्या वजनाचें व आकाराचें जें लहानांत लहान प्रमाण आढळतें तें अगदीं पुढारलेल्या लोकांतील हुषार माणसांतसुद्धां आढळून येतें. कांहीं वन्य जातींत डोकीं सर्वसाधारणपणें लहान आढळतात. पण त्यामुळें बुद्धि कमी व्हावी एवढीं तीं लहान नसतात. पुढारलेल्या समाजांतूनहि डोक्याच्या आकारांत पुष्कळच फरक दिसतो. उदाहरणार्थः—तीन चार हजार वर्षांपूर्वी पुढारलेल्या जगाच्या अग्रभागीं असलेल्या इजिप्तच्या लोकांचीं डोकीं आकारानें बरींच लहान असलेलीं आढळलीं आहेत. आशियाच्या पठारावरील भटक्या मोंगल लोकांचीं डोकीं साधारणपणें पुढारलेल्या विलायती लोकांपेक्षां मोठीं आहेत. डोक्याच्या लहानमोठेपणावर संस्कृतीचा मागासलेपणा किंवा पुढारलेपणा सिद्ध होत नाहीं.

मानवसमाजाचा इतिहास पाहिला तर असें दिसून येईल कीं, सर्व मानवसमाज कांहीं विशिष्ट अवस्थांतून गेले आहेत. अति प्राचीनतम कालीं दगडाचीं ओबडधोबड हत्यारें करून, गुहांतून लोक रहात असत. त्यानंतर लोक दगडाचींच पण सुबक, घासून गुळगुळीत केलेलीं हत्यारें वापरूं लागले. नंतर हळूहळू रोपें लावण्यास सुरवात झाली. ह्या पायऱ्या सर्व

* गोबिनो, चेंबरलेन, ग्युंथर वगैरेंनीं हें मत प्रतिपादिलें आहे. गेल्या महायुद्धाचे आधीं ( १९३९ ) ह्या मताचा जर्मनींत फार प्रसार व प्रचार झाला. जर्मन वंशाचे (?) लोक हे इतरांवर राज्य करण्याच्या लायकीचे, इतर कमी दर्जाचे असें हें मत आहे.

मानवसमाजांत दिसून येतात. कोणी हुषार म्हणून त्यांनीं अश्मयुगाच्या ऐवजीं लोहयुगापासून आयुष्याला सुरवात केली असें झालें नाहीं. जे लोक अश्मयुगांत होते त्यांचेच वंशज हळूहळू पुढारले. लोकसंख्येंतलि वाढ व परस्पर दळणवळण ह्यांमुळें संस्कृतींत वाढ झाली. अश्मयुगीन युरोपांत " निआंडरटाल " जातीच्या मानवाचें डोकें आतांच्या कोणत्याही मानव-समाजांच्या सरासरीपेक्षां मोठें होतें. पण त्याच्या दुर्दैवानें तो आदिमानव असल्यामुळें संस्कृतीचा संसार त्याला सुरवातीपासूनच मांडावा लागला. त्यानें सुरवात केली म्हणूनच आजचे दिवस आम्हांला दिसतात. आमच्या हुशारीनें नव्हे. त्याचप्रमाणें भूमध्यसमुद्राभोंवतींच्या राष्ट्रांत व हिंदुस्थान व चीन ह्या देशांत जोराचें दळणवळण वाढलें. एकमेकांचे शोध एकमेकांना कळले. शेतीमुळें जास्त अन्न उत्पन्न होऊन, अन्नोत्पादन न करतां उप-जीविका करणारे कारागीर, धर्मोपदेश व व्यापारी लोक ह्यांचे वर्ग निर्माण होऊन संस्कृतींत वाढ झाली. जे मानवसमाज ह्या प्रदेशांपासून लांब राहिले ते संस्कृतीला मुकले व रानटी अवस्थेंतच राहिले असें म्हणणें सयुक्तिक, कीं ते मानसिकदृष्टया जडबुद्धीचे म्हणून जागच्या जागीं राहिले हें म्हणणें सयुक्तिक ?

मानव संस्कृतीच्या इतिहासाची कालगणनाही मोठी सूचक आहे. सुमारें ७।८ लाख वर्षांपूर्वीं ज्याला शारीरिकदृष्टया पूर्णतया मानव म्हणावें असे प्राणी पृथ्वीवर आले. तेथपासून तों तहत २०,००० वर्षांपूर्वींपर्यंत मानव अश्मयुगांतच होता. नंतर हळूहळू तांबें व पितळ ह्यांचा शोध त्याला लागला व तो पशुपालन व शेतीही शिकला. इ. स. पूर्वी ६,००० वर्षे इजिप्त, बाबेरु वगैरे देशांत शेती होती. नंतर ती चीन, हिंदुस्थान इकडे पसरली. ह्या लोकांनीं शहरें वसविलीं, लिपी शोधून पुस्तकें व शिलालेख लिहिले, प्रचंड देवळें बांधिलीं, खगोल व भूमिति वगैरे शास्त्रांचा पाया रचला. ह्यावेळीं युरोपांतील लोक वन्य स्थितींतच होते. हळूहळू ख्रिस्ती धर्म व दाक्षिणात्य संस्कृति ह्यांचा युरोपांत प्रसार झाला. नऊ ते पंध-राव्या शतकापर्यंत मुसलमान लोकांनीं स्पेनमध्यें व इस्तंबूल येथें राज्यें स्थापिलीं व कला व शास्त्रें ह्यांत ते युरोपीयांपेक्षां वरचढ होते. १५ व्या

शतकापुढें जुन्या ग्रीक ज्ञानाचा फैलाव युरोपांत होऊन युरोपीय झपाट्यानें पुढें सरकले. त्यांतही जपाननें युरोपची विद्या व शस्त्रसंभार ह्यांना आत्मसात् करून युरोपवर मात करण्याची वेळ आणली होती. म्हणजे आज ज्यांना आपण पुढारलेले म्हणतों ते अत्यल्प काळापूर्वी रानटी होते हें ध्यानांत आलें म्हणजे भविष्याचे सांस्कृतिक पुढारी कोण होतील किंवा कोण राहतील ह्याची ग्वाही देणें धाष्टर्याचें नाहीं का ? आजच्या रानटी समाजाची पूर्णतया शिकार झाली नाहीं, तर ते मुळीं वर येणारच नाहींत असें आजपर्यंतच्या इतिहासावरून तरी सांगण्यास कांहींच पुरावे नाहींत. पुढारलेल्यांचे कला व शास्त्र आज मानवसमाजांतील सर्व लोक, निग्रो, अमेरिकी, मोंगोल, पॅसिफिक बेटावरील लोक, एका पिढींत आत्मसात करतात. निग्रोच्या मेंदूची कांहीं अशी रचना नव्हे कीं त्याला रसायन, जीवशास्त्र वगैरे कळणार नाहीं. मानवसमाजांत बुद्धीच्या दृष्टीनें जड व कुशाग्र असे आनुवंशिक फरक नाहींत व पुढारलेल्या जाती पुढारल्या त्याचें कारण त्या बुद्धीनें श्रेष्ठ व बाकीच्या मतिमंद असें म्हणण्यास आनुवंशिक शास्त्र व इतिहास ह्यांमध्यें कांहींही पुरावा नाहीं हें निश्चित. आणि त्या दृष्टीनें वंश व संस्कृति ह्यांचा संबंध नाहीं.

संस्कृति व संस्कृतीचीं निरनिराळीं अंगें ह्यांत जें भिन्नत्व दिसतें त्याचें कारण निर्मात्यांची मानसिक भिन्नता हें देतां येईल का ? वर पाहिल्यानें केलेलें विवेचन बुद्धीच्या कमी-अधिकपणाबद्दल होतें. आतां भिन्नतेबद्दल आहे. बुद्धीचें परिमाण सारखें असेल, पण गुण सारखे नसतील. "व्यक्ति तितक्या प्रकृति", "अभिरुचि कोणा शृंगाराची कोणा वीररसाची", वगैरे लोकप्रिय वाक्संप्रदाय असें दर्शवितात कीं, माणसामाणसांत वैचित्र्य असतें. एकाच समाजांत भिन्न भिन्न प्रकृतीचीं माणसें असतात. व्यक्ति भिन्न असल्या म्हणून सबंध समाजचे समाज गुणांनीं भिन्न भिन्न होऊं शकतात का असा प्रश्न आहे. ह्याच प्रश्नाशीं निगडित दुसरा प्रश्न म्हणजे समाजांचें स्वभावभिन्नत्व हें त्यांच्या संस्कृतिभिन्नत्वानें सूचित होतें का ? लोकांचें मत वर असें दिसतें कीं भिन्न समाजांच्या प्रकृति भिन्न असतात व त्यामुळें ह्यांची निर्मितीही भिन्न असते. हिंदू लोक इहलौकिक गोष्टींपेक्षां पारलौ-

किक गोष्टींकडे जास्त लक्ष देतात असा फार जुना प्रवाद आहे. आपले पुढारीही वेळींअवेळीं अध्यात्म (spiritualism) ह्या नांवाखालीं आपल्यांतील ह्या गुणाचा उल्लेख करीत असतात. त्याच अनुषंगानें युरोपीय सर्वस्वी अर्थवादी आहेत असाही दावा ह्या पुढाऱ्यांचा असतो. रूथ बेनेडिक्ट ह्या अमेरिकी विदुषीनें निरनिराळ्या संस्कृतींना विशेष व्यक्तिमत्व असतें व कांहीं गुण प्रकर्षानें कांहीं कांहीं समाजांत असतात असें दाखवून दिलें आहे. संस्कृति म्हणजे द्रव्यमय व मनोमय निर्मिति असें मागें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें संस्कृति म्हणजे शरीराला व मनाला लावलेलें विशिष्ट वळण हेंहीं दर्शविलें आहे. असें जर खरें, तर समाज प्रकृतीनें भिन्न भिन्न आहेत हें म्हणणें रास्त दिसतें. पण त्यांत एकच गोम आहे. प्रकृतीचा आविष्कार हा मानवी मनाचा आविष्कार खरा, पण एकतर संस्कृतीनें घालून दिलेलें वळण ही कांहीं प्रकृति नव्हे व दुसरें म्हणजे त्या वळणाचा अर्थ निरनिराळा लावतां येणें शक्य असल्यामुळें संस्कृतीचें खरें मूल्यमापन दुरापास्त होतें. उदाहरणार्थः—नखशिखांत शरीर कपड्यानें आच्छादणारे किंवा तें जवळ जवळ उघडें ठेवणारे असे दोन्ही प्रकारचे समाज आढळतात. कपडे घालणाऱ्या लोकांची मूळ प्रकृति नाजुक होती म्हणून ते कपडे घालतात असें थोडेंच आहे ? मानवी प्रकृतीबद्दलच बोलावयाचें झालें तर भर उन्हाळ्यांत कापडांत गुंडाळून घेणें किंवा कडाक्याच्या थंडींतही शरीर उघडें ठेवणें मानवांना शक्य आहे, एवढेंच त्यावरून दिसतें. दुसरें मूल्यमापन म्हणजे शरीर आच्छादणारे लोक विनयशील वृत्तीचे आहेत व न आच्छादणारे निर्लज्ज आहेत असें म्हणतां येईल. विनय दाखविण्याच्या तऱ्हा निरनिराळ्या समाजांत निरनिराळ्या आहेत व पुष्कळदां ज्या समाजांत शरीर उघडें ठेवण्याचा प्रघात आहे तेथें वेश्या आपलें शरीर झांकून घेतात ही चाल लक्षांत घेतली म्हणजे समाजाच्या व्यवहाराचें मूल्यमापन किती अवघड आहे तें कळेल. म्हणूनच पौर्वात्य बहुपत्निक आहेत, कारण प्रकृत्या ते विषयलोलुप आहेत व पाश्चात्य एकपत्निक आहेत कारण ते विषयासक्त नाहींत, हें विधान किती आचरटपणाचें आहे तें सांगणें नको. मनुष्यसमाजांत कांहीं चालीरिती रूढ होतात व त्यांचा व्यक्तीच्या मनावर परिणाम होतो, एवढेंच नव्हे तर सामाजिक मूल्यें ठरल्यामुळें सबंध समाजाची

प्रवृत्ति विशेष प्रकारची बनत जाते. पण त्याचा अर्थ त्या समाजांतील व्यक्ति प्रकृतीनेंच—आनुवंशिक गुणानेंच—निराळ्या आहेत असें नव्हे. संस्कृति किंवा पारंपरिक जीवन व्यक्तीचा स्वभाव बनविते. व्यक्तीच्या स्वभावभिन्नत्वामुळें संस्कृतिभिन्नत्व निर्माण होत नाहीं. हिंदूंचें रक्त हा शब्दप्रयोग आपण ऐकतों. तेंच हिंदूंचें रक्त हिंदी–ख्रिस्ती व हिंदी मुसलमानांच्या देहांतही आहे. पण वागणुकींत व सामाजिक मूल्यांत जो फरक पडतो तो रक्ताच्या गुणानें नसून संस्कृतीच्या गुणानें होय. वंश एक असूनही निरनिराळे वंश–विभाग निरनिराळ्या संस्कृतींत वाढले तर त्या त्या संस्कृतीचे गुण दाखवितील. मनुष्याच्या व्यवहाराला व आत्मीयत्वाच्या जाणिवेला एका वंशापेक्षां सांस्कृतिक साहचर्यच जास्त उपयोगी पडतें. रवींद्रनाथ टागोरांच्या ‘ गोरा ’ कादंबरींत हें दाखविलें आहे. ‘गोरा’चा ब्राम्हण्याचा अभिमान साहचर्यानें उत्पन्न झालेला होता. वंशानें नव्हे. कारण, त्याचे आईबाप हिंदु नसून आयरिश होते. ‘ रक्तानें हिंदू ’ हा वाक्प्रचार अर्थहीन आहे. मनुष्य अंगांतील आनुवंशिक गुणांमुळें हिंदू, मुसलमान वा ख्रिस्ती होत नसून ज्या समाजांत तो वाढतो व ज्या कुटुंबांत जन्मतो त्यांच्या संगतीनें व शिकवणीनें तसा होतो.

जन्मजात जातविभागणी ज्या हिंदुसमाजांत आहे त्यांतील लोकांना हें तत्व पुन्हां पुन्हां सांगितलें पाहिजे. कारण त्यांचें सर्व साहित्य संस्कारांच्या आनुवंशिकत्वाच्या कल्पनेनें भारलेलें आहे.

> शूरोऽसि कृतविद्योऽसि दर्शनीयोऽसि पुत्रक ।
> यस्मिन् कुले त्वमुत्पन्नः गजस्तत्र न हन्यते ॥

हें सुभाषित कित्येकदां उल्लेखलेलें आढळतें. तुलना हा शास्त्राचा गाभा आहे. पण ती कांहींतरी मूलभूत साम्यावर उभारली असली पाहिजे. मूलभूत तुल्यता नाहीं त्या गोष्टी एकत्र आणण्यानें चमत्कृति निर्माण होऊन क्षणभर कौतुक वाटतें. पण त्यानें सामाजिक घटनांवर प्रकाश कसा पडणार ? दुर्दैवानें राजकारणी पुरुष अशा तुलना, उपमा, उत्प्रेक्षा, व दृष्टांताच्या रूपानें मांडून लोकांच्या डोळ्यांत धूळ फेंकतात. सिंह व कोल्हा हे कांहीं एका जातीचे नव्हेत. त्यांची शरीररचना अगदीं निरानिराळी.

सिंह जें करतो तें कोल्हयाला करणें अशक्य असणारच. तेथें विद्या शिकून काय फायदा ? कांहीं झालें तरी एक दुसऱ्याचा जन्मजात जीवनक्रम अनुसरूं शकणार नाहीं. त्या दोघांनाही सर्कशींत नेलें व नीट शिक्षण दिलें तर दोघेही हत्तीच्या पाठीवर बसून रंगणांत मजेनें रपेट करूं शकतील. ही ‘ शिकविलेली ’ विद्या दोघांनाही तुल्य क्रिया करावयास लावील, एकाच अर्थानें ‘ संस्कृत ’ करील. पण त्यामुळें दोघांच्या आनुवंशिक ‘ शारीर ’ व ‘ मानस ’ गुणांत फरक पडणार नाहीं. पण हा दृष्टांत एकाच जीवजातींत जन्मलेल्या मानवांना लावणें म्हणजे जाणूनबुजून मानवांवर अन्याय करणें आहे. मनुष्य कोठच्याही टोळींतला असला—कोठच्याही जमातींतला असला, तरी पुरेशा साहचर्यानें, विशेषतः अगदीं बाळपणापासूनच्या साहचर्यानें, कुठलीही मानवसंस्कृति आत्मसात् करील. ब्राह्मणाचें पोर मनुष्यभक्षक जमातींत वाढलें तर ती जमात ज्या रुचीनें नरमांस खाईल त्याच रुचीनें तेंही खाईल ! त्याचें ब्राह्मणी ‘ मन ’ ह्या खाद्यापासून तिळमात्रही माघार घेणार नाहीं. व त्याचें ‘ रक्त ’ ही उसळणार नाहीं. त्याचप्रमाणें सत्यकामासारखे तथाकथित ब्राह्मण, ब्राह्मणाच्या बरोबरीनें वेदपठण करून, आचारांची शुद्धता राखतील. संस्कृतीची परंपरा ही शारीरपरंपरेपेक्षां अगदीं निराळी आहे, हें ध्यानांत ठेविलें तर सामाजिक प्रश्न सोडविण्यास लागणारी बुद्धीची शुद्धता तरी निर्माण होईल.

### वंश व संस्कृति ह्यांचा संबंध ऐतिहासिक

जर संस्कृतीचा आणि वंशाचा संबंध यदृच्छेनें निर्माण झालेला आहे तर मग वंशशोधनाचें कार्य तरी काय आपल्याला ? “ दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषं ” ह्या उक्तीप्रमाणें कुळ कांहींही असलें तरी संस्कृति आम्हीं निर्माण केलेली आहे व आपल्याला संस्कृतीचा अभ्यास करावयाचा आहे, वंशाचा नव्हे. मग मराठी लोकांच्या पिंडाची उठाठेव कां ? असें वाटणें साहजिकच आहे. पण जरी हा शोध संस्कृतीच्या अभ्यासासाठीं अत्यावश्यक नाहीं तरी पुष्कळच उपयोगी आहे.

संस्कृतीचा अभ्यास हा एक ऐतिहासिक अभ्यास आहे. सध्यां आपल्या पुढें अभ्यासासाठीं म्हणून जी संस्कृति घेतली आहे ती गेल्या कित्येक

शतकांत हळूहळू आजचें रूप धारण करीत होती. तिची निर्मिती निर-निराळ्या मानवसमाजांच्या संगमानें, कांहीं विशेष भौगोलिक परिस्थितींत झालेली आहे. मराठी भाषा, मराठी पोषाख, मराठी कुटुंब, मराठी लोकांची शेती वगैरे जीं कांहीं संस्कृतीचीं अंगें आहेत, तीं काहीं एका स्वतंत्र, इतरांशीं संबंध न आलेल्या मनुष्यांच्या गटानें बनविलेलीं नाहींत. निरनिराळ्या समाजांच्या एकत्र येण्यानें, परस्पर व्यवहारानें व संघर्षानें तीं बनलेलीं आहेत. संस्कृतीचीं निरनिराळीं अंगें घेऊन येणारे मानवसमाज निरनिराळ्या भूप्रदेशावर रहाणारे व निरनिराळ्या वंशाचे असतात. ते एकत्र आले म्हणजे संस्कृतीची देवघेव रक्तमिश्रणानें किंवा रक्तमिश्रणा-शिवाय होऊं शकते. ह्यापैकीं कोणत्या पद्धतीनें निरनिराळीं अंगें प्रस्था-पित झालीं, हें पहाणें अत्यावश्यक आहे. नाहींतर संस्कृतीबद्दल फार मोठे गैरसमज राहून जातात. संस्कृतीचा व वंशाचा संबंध हा असा आहे. कांहीं तऱ्हेची संस्कृति कांहीं भूप्रदेशावर कांहीं विशिष्ट मानव शाखेंत उत्पन्न होते व तिचा इतरत्र प्रसार होतो. हा प्रसार कसा झाला ? ती मानवशाखाच भ्रमण करून दिग्विजयास निघाली व तिनें आपल्या संस्कृ-तीचीं कांहीं अंगें इतरांना दिलीं, कीं ती स्थिर राहून व्यापारी दळणवळ-णाच्या द्वारें तिची द्रव्यरूप व मनोमय संस्कृति इतरत्र पोहोंचली हा प्रश्न ऐतिहासिक अभ्यासकाचे दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. कांहीं विशिष्ट मानव वंश व त्यांचे विशिष्ट आनुवंशिक गुण ह्यांमुळें एक विशिष्ट संस्कृति निर्माण होते, अशा तऱ्हेचा कार्यकारण संबंध संस्कृति व वंश ह्यांचा नसून तो ऐतिहासिक साहचर्याच्या स्वरूपाचा आहे व त्याच्या अभ्यासा-मुळें मानवी समाजांचें व संस्कृतीचें भ्रमण कसें झालें ह्या गोष्टींवर प्रकाश पडण्याचा संभव असल्यामुळें आपल्याला मानववंशाबद्दल विचार करणें आहे.

संस्कृति माणसांनीं बनविलेली असते. ती बदलते ती पुष्कळ वेळां मानवसमाजांच्या संगमामुळें वा संघर्षामुळें. ती जगभर प्रवास करते तोही ( निदान यंत्रयुगाच्या आधीं ) माणसांच्या दोन पायांच्या सहाय्यानेंच. मराठी लोक उत्तरेच्या संस्कृतोद्भव भाषांपैकीं एक भाषा बोलतात, ह्याचें

कारण ते उत्तरेकडून आले हें आहे का ? तसें असेल तर वंशानें वा पिंडानें ते उत्तरेकडच्या लोकांसारखे असतील. उत्तरेच्या थोड्या लोकांनीं येऊन दक्षिणेकडच्या लोकांना ही भाषा दिली असेल तर पिंडानें ते द्राविडांच्या-सारखे असणार. म्हणजे जसे आम्ही काळे लोक गोऱ्या जेत्यांची इंग्रजी भाषा आज बोलतों त्याप्रमाणें मराठी भाषा त्या वेळच्या जेत्यांची भाषा म्हणून महाराष्ट्रांत आली असें होईल. किंवा रक्तमिश्रण आणि साहचर्य या दोन्हींमुळें ही भाषा आमची झाली असेल. जी गोष्ट भाषेची तीच संस्कृतीच्या इतर अंगांची. हीं अंगें महाराष्ट्रांत कशीं आलीं हें समजण्या-साठीं कदाचित् वंशशास्त्राचा आपल्याला उपयोग होईल. महाराष्ट्रांत कोणते मनुष्यवंश आहेत, ते इतरत्र कोठें आहेत व त्यांचें सांस्कृतिक कार्य काय, ह्या प्रश्नांचें यथार्थ उत्तर देतां आलें तर महाराष्ट्रीय संस्कृतीचें स्वरूप समजण्यास मदत होईल. अमका वंश चांगला, अमका वाईट; अमका श्रेष्ठ, अमका कनिष्ठ; ह्या भावनेनें नव्हे पण निरनिराळे वंश निर-निराळ्या भूमींत वाढलेले आहेत व कांहीं विशिष्ट संस्कृतीशीं त्यांचें ऐतिहासिक काळांत साहचर्य झालें आहे म्हणून आमच्या संस्कृतीचीं निरनिराळीं अंगें कदाचित् ह्या वंशशोधनानें जास्त नीट पारखतां येतील ह्या समजुतीनें वंशशोधन करणें जरूर आहे.

## जीवशास्त्रांतील वर्गीकरण

जगांतील सर्व माणसें दिसावयाला सारखीं नसतात. एवढेंच काय तर कोणतेही दोन जीव सर्वस्वीं एकासारखे एक कधींच नसतात, असा जीव-शास्त्राचा सिद्धांत म्हणून सांगतां येईल. पितृसादृश्य आनुवंशिकत्वामुळें प्राप्त होतें. पितृविसादृश्य प्रत्येक जीवाच्या वेगळेपणाच्या नियमानें प्राप्त होतें. जीवसृष्टि सारखी बदलत आहे. जीवांची हळूहळू उत्क्रान्ति होत आहे. ह्याचा अर्थ, एका तऱ्हेच्या जीवजातींतून नव्या तऱ्हेच्या जीव-जाती जन्मतात, भरभराटतात व विलयतात. व्यक्ति काय, जाती काय, ध्रुव असें कांहींच नसतें. पण जाति व्यक्तीपेक्षां जास्त टिकतात. जातिधर्म चिवट असतात, व्यक्तिधर्म चल असतात. उदाहरणार्थः--सरपटणाऱ्या प्राण्यांपासून पक्षी व स्तनंधय प्राणी ह्यांची उत्पत्ति झाली असें मानतात.

ह्याचा अर्थ असा नव्हे कीं सरपटणारे प्राणी ह्या सबंध जीवविभागच्या विभाग एके दिवशीं दोन गटांत विभागून पार बदलून गेला व एका विभागाच्या प्राण्यांचे पक्षी झाले व दुसऱ्यांतील प्राण्यांचे स्तनंधय प्राणी झाले. ह्या उलट खरा प्रकार असा आहे कीं, सरपटणाऱ्या प्राण्यांतील कांहीं व्यक्ति बदलत होत्या. ह्या बदलणाऱ्या कुळांत एकदम पक्ष्यासदृश्य व्यक्ति जन्मास आल्या व पक्ष्याच्या जीवजातीला आरंभ झाला. तशीच क्रिया स्तनंधय प्राण्यांच्या उत्पत्तिकालीं झाली असली पाहिजे. सरपटणाऱ्या जीवजातींपैकीं कित्येक विभाग पूर्णतया नष्ट झाले, पण कित्येक आजतागायत जिवंत आहेत. जातीचें ध्रुवत्व व व्यक्तीची गुण बदलण्याची शक्ति ह्या दोन दिसावयाला विरुद्ध पण परस्परपूरक गुणांमुळें जीवनसृष्टीचा विकास होत असतो. व्यक्ति बदलते ती पूर्णतया कधींच बदलत नाहीं. बहुतेक गुणांत ती पितृसाधर्म्य दाखविते व कांहीं गुण बदलतात. ज्या गुणांत साधर्म्य असतें तेंही संपूर्ण नसून थोड्याबहुत प्रमाणांत असतें. ह्यामुळेंच प्रत्येक व्यक्ति आपल्या गुणसमुच्चयामुळें अद्वितीय असते. पण एकेक गुण घेतला किंवा कांहीं गुणांचा गट घेतला तर ती दुसऱ्या व्यक्तींना समान असते व म्हणूनच तुलना करणें, गट पाडणें, विभागणें, एका नांवाखालीं बऱ्याच वस्तु अगर व्यक्ति आणणें या शास्त्रीय क्रिया करणें शक्य असतें. माणसें जगांतील इतर कोणत्याही प्राण्यांपेक्षां निराळीं पडतात. माणसांमाणसांमधले कितीही भेद असले तरी त्यांच्यांत एवढें साधर्म्य आहे कीं, त्यांची सर्वांची मिळून एक जीवजाति होते. त्याचप्रमाणें जातीचे असे गुणधर्म ( उदाहरणार्थ : विशिष्ट शरीर-रचना ) सोडले तर इतर गुणधर्मांत माणसामाणसांत फरक आढळतो व त्या फरकावरून माणसांचे गट करून त्यांना पोटजाति किंवा मानववंश असें नांव देतात.

## वर्गीकरणाचीं तत्त्वें

वस्तूंची विभागणी करतांना ती अशा गुणधर्मावरून करावी कीं, तो गुण एका गटांतील सर्व व्यक्तींना अथवा वस्तूंना निरपवाद असावा. व दुसऱ्या अथवा विरुद्ध गटांतील कोणत्याहि व्यक्तीला अथवा वस्तूंना असूं नये, असें तर्कशास्त्राचें म्हणणें आहे. सृष्टिकर्त्या विधात्यानें सृष्टींत निर-

निराळ्या जातींच्या वस्तू निर्माण केल्या व त्यांना निरनिराळे न बदलणारे गुणधर्म दिले असें मानलें तर वरील आग्रह युक्त आहे. पण आपण जर, सृष्टींत स्थित्यंतर हळूहळू होत असतें, निरनिराळ्या वस्तूंचा विभिन्नपणा सनातन नसून कालप्रवाहांत होणाऱ्या बदलामुळें झाला आहे असें मानलें तर तर्कशास्त्राचा वरील नियम जीवनसृष्टींतच काय पण निर्जीव वस्तूंनाही लागू पडणार नाहीं. दर वेळीं विभागणी करतांना एका विभागाचे कांहीं गुणधर्म व दुसऱ्याचे कांहीं गुणधर्म असलेल्या वस्तू आढळतातच. व त्यांना कोणत्या विभागांत बसवावें असा वाद माजतो. वस्तूंची विभागणी करतांना आपण आपल्या सोयीनें त्यांचे गट पाडतों. वस्तुतः एकापासून सर्वस्वीं भिन्न असे गट नाहींतच असें लक्षांत आलें म्हणजे विभागणें ही एक आपली मनाची क्रिया आहे, नैसर्गिक विभागणी अशी कांहीं घटना नाहीं असें समजतें. ज्यांना आपण मूलभूत विभागणी म्हणतों त्यांतही अशा संदेहकारक तृतीय–प्रकृति वस्तू नेहमीं आढळतात. सजीव व निर्जीव असे सृष्टींतील दोन विभाग कसे तर्कशुद्ध व बिनतोड वाटतात, पण ते तसे नाहींत. असे कित्येक वस्तुप्रकार ( उदाहरणार्थः व्हायरस ) आहेत कीं, त्यांच्या सजीवत्वाविषयीं वाद माजून राहिला आहे. एकपेशिक प्राणी व बहुपेशिक प्राणी असे प्राण्यांचे दोन प्रकार आहेत. त्यांपैकीं कांहीं प्रकार असे आहेत कीं त्यांना एकपेशिक प्राण्यांच्या एकत्र वसाहती म्हणाव्या कीं एक बहुपेशिक प्राणी म्हणावा याबद्दल संदेह वाटतो. खगादि व सर्पादि प्राण्यांपासून स्तनंधय प्राणी निराळे म्हणून गट करण्यांत येतो; पण पक्षी व साप ह्याप्रमाणें अंडीं घालणारे स्तनंधय प्राणीहि ( उदाहरणार्थ : प्लॅटिपस ) आहेत. कोठचेंही वर्गीकरणाचें कार्य घेतलें तरी आपल्याला ह्याच प्रकार दिसून येईल बहुतेक गुणधर्म परिमाणात्मक असतात—थोडें कमी, थोडें जास्ती असें त्यांच्याबद्दल बोलतां येतें. व म्हणून एका गुणांत तरी सर्वस्वीं विभिन्न असे गट करतां येत नाहींत. मग अनेक गुणांचा समुच्चय घेऊन त्यावरून जर विभागणी केली तर ती किती कठीण व त्याला किती अपवाद असतील हें पहावयासच नको.

## प्राण्यांचें वर्गीकरण

ज्या गुणांवरून वर्गीकरण करावयाचें ते होतांहोईतों मोजतां येतील ज्यांचा दृक्प्रत्यय येईल असे शरीरगुण असावे, म्हणजे विभागणीच्या खरेखोटेपणाबद्दल प्रत्येकाला आपली खात्री करून घेतां येईल. जे गुण मोजतां येत नाहींत, किंवा दृष्टीनें दिसत नाहींत ते वर्गीकरणाला उपयोगी पडत नाहींत असें नाहीं. वर्गीकरण हें ज्ञानलाभाचें एक साधन आहे व ज्या तऱ्हेचें ज्ञान हवें असेल त्या तऱ्हेचें वर्गीकरण करावें लागतें. अमक्या तऱ्हेचेंच केलें पाहिजे असें नाहीं. तरीही प्रत्येक शास्त्रांत वर्गीकरणाच्या कांहीं पद्धति सर्वमान्य झालेल्या आहेत. हें सर्वमान्यत्व अनुभवानें, त्या पद्धति उपयोगी वाटल्या म्हणून, मिळालेलें आहे व आपणही त्याच वापराव्या हें बरें. जीवशास्त्रांत निरनिराळ्या प्राण्यांचें वर्गीकरण शरीररचना व कार्य ह्यांवरून करतात. मोठमोठ्या प्राणीविभागांत शरीररचना निरनिराळी असते. उदाहरणार्थ : मत्स्यादि वर्ग व खगादि वर्ग किंवा स्तनंधय वर्ग ह्यांच्या शरीररचनेंत पुष्कळच फरक असतो. स्तनंधय वर्गांतहि अन्न कुरतडून खाणारे प्राणी, खूर असलेले तृणभक्षक प्राणी, नख्या असलेले मांसभक्षक प्राणी, किंवा मर्कटादि प्राणी असे उपवर्ग शरीररचनेच्या फरकावर करतां येतात. त्या उपवर्गांचेंही वर्गीकरण करावयास लागलें तर शरीररचनेंतील फरक लहान लहान होतात. मर्कटादि प्राण्यांत अमेरिकी मर्कटें, आशिआई मर्कटें, असे भेद थोड्याशाच रचनांतरावरून केलेले आहेत. वानरसदृश उपवर्गांत अपुच्छ वानरें व मानवसदृश प्राणी असे पोटभेद पाडतात. ह्यांची तर शरीररचना इतकी सारखी असते कीं, अतिप्राचीन सांगाड्यांच्या बाबतींत नर कीं वानर हा वाद रहातो. आपण तर मानवजातीचेंच वर्गीकरण करूं पहात आहों. म्हणजे ज्या लक्षणांवरून आपण पोटभेद पाडणार तीं शरीरलक्षणें मुळांतच फार मोठा भेद नसलेलीं अशीं असणार. सर्वच मानवांना साधारण अशी शरीररचना सर्व पोटविभागांतील सर्व व्यक्तींत असणार. फार तर अवयवांच्या गुणांच्या परिमाणांत कांहीं फेरबदल सांपडणार व त्यांवर आपण हें वर्गीकरण करणार. इतके सूक्ष्म भेद जेथें वर्गीकरणासाठीं योजलेले असतात तेथें ते बऱ्याच अंशीं

ध्रुव व आनुवंशिक असे योजलेले असतात. हे भेद सर्व दृश्य व मोजतां येतील असे असल्यामुळें मूलभूत शरीररचनेचे जरी हे भेद नसले, तरी सर्वांना त्याची प्रचीति येईल इतके ते स्थूल असतात व दुसरें म्हणजे ते स्थिर असतात. " स्थिर " ह्याचा अर्थ आनुवंशिक, म्हणून परिस्थिती-प्रमाणें न बदलणारे असा होतो. जातिधर्मांचा आविष्कार व्यक्तींत होतो व प्रत्येक व्यक्ति दुसऱ्यापासून भिन्न असते हें मागें सांगितलेलें तत्त्व लक्षांत घेतलें म्हणजे ' आनुवंशिक ', ' स्थिर ', 'न बदलणारे' वगैरे सर्व शब्द सापेक्ष आहेत हें सांगावयास नकोच.

जीवनशास्त्राच्या नियमांना अनुसरून ज्या न्यायानें आपण सर्व जीवांचें वर्गीकरण करतांना अपुच्छ वानरें व माणसें एका वर्गांत घालतों, त्याच-प्रमाणें पुढच्या सूक्ष्मतर वर्गीकरणासाठींहि जीवशास्त्रांतील पद्धतीचाच अवलंब करतों. बैल, मेंढया, घोडे, हत्ती वगैरे प्राण्यांचे पोटभेद करून त्यांना जशीं नांवें देतों तशीच माणसांचे पोटभेद करण्याची पद्धत आहे. बैलांची उंची, बांधा, शिंगें, तोंडाचा आकार, रंग, ह्यावरून धनगरी, खिलार, गीर, विलायती बैल असे भेद होतात. त्याचप्रमाणें उंची, रंग, कानाचा आकार इत्यादींवरून आफ्रिकी हत्ती, व भारती हत्ती असे पोट-भेद होतात, तीच वर्गीकरणाची पद्धति वापरून माणसांचें वर्गीकरण करतात. साधारणपणें वर्गीकरणासाठीं खालील गुणधर्म व शरीरप्रमाणें परीक्षणार्थ घेतात. मनुष्याचा रंग, उंची, अवयवांचें प्रमाण, केंसांची आकृति, डोक्याची आकृति व परिमाण, चेहऱ्याचा आकार, नाकाचा आकार, आणि डोळ्यांचा रंग व आकार हे गुण मानवशास्त्रज्ञ मोजतात अथवा तपासतात. इतके सर्व गुण न घेतां एकाच गुणावरून वर्ग पाडावे म्हणजे वर्गीकरण समजण्यास सोपें पडेल अशी कल्पना असल्यामुळें कित्येक शास्त्रज्ञ केंसांचा आकार किंवा डोक्याचा आकार आणि तोंडाचा आकार असा एकाद दुसराच गुण घेऊन त्याच्या भेदावरून सर्व मानवजातींचें वर्गीकरण करतात. हॅडनचें* केंसांच्या आकारावरून केलेलें वर्गीकरण प्रसिद्ध आहे. पण तोही वरीलपैकीं इतरही गुण विचारांत घेतो.

---

*A.C. Hadden ह्यांचें Races of man हें पुस्तक पहावें.

## शरीराचें प्रमाण

शरीराच्या निरनिराळ्या अवयवांचें प्रमाण काय असतें ह्यावर बराच अभ्यास झालेला आहे. छातीच्या हाडाच्या वरच्या भागापासून ते ढुंगणाच्या हाडाच्या खालच्या बाजूपर्यंत किंवा पुढच्या सांध्यापर्यंतच्या भागाला धड म्हणतात. धडाच्या लांबीचें पायांच्या लांबीशीं प्रमाण निरनिराळें असतें. त्याचप्रमाणें खांद्यापासून हाताच्या मधल्या बोटापर्यंत सबंध हाताची लांबी व धडाची लांबी ह्यांचेंही प्रमाण निरानिराळें असतें.

सबंध भुजा व सबंध पाय ह्यांतही वरची कोपरापर्यंतची भुजा व



नीग्रो



अमेरिकी आदिवासी
( मोंगल वंशीय )

आकृति १ : पायाचें व धडाचें प्रमाण

खालची भुजा, आणि गुडघ्यापर्यंतचा मांड्यांचा भाग व खालचा तंगड्यांचा भाग ह्यांचेंही परस्पर प्रमाण भिन्न असूं शकतें. फार खोलांत न शिरतां धडाची लांबी व सबंध पायांची लांबी ह्यांच्या प्रमाणावरून मानवांचे तीन वर्ग कल्पिलेले आहेत. १. पहिल्या गटांत धड लांब व त्या मानानें पाय आंखूड असे लोक येतात. २. दुसऱ्या गटांत धड आंखूड व पाय खूपच लांब असे लोक येतात. ३. तिसऱ्या गटांत धड मध्यम व पाय लांबसर असे लोक येतात. पहिल्या गटांतील लोक मोंगल वंशीयांत, दुसऱ्यांतील निग्रो वंशीयांत व तिसऱ्यांतील युरोप वंशीयांत सांपडतात. हें प्रमाण सांगाड्यावर मोजणें कांहीं दृष्टया सोपें असतें. जिवंत माणसांवर मोजणें कठीण व वस्त्र नेसावयाच्या पद्धतीमुळें जरा अवघडच पडतें. अगदीं शास्त्रशुद्ध मापें उघडया शरीरावर घेतां येतात. फार शास्त्रशुद्ध नाहीं पण एकंदर कल्पना यावयाला उपयोगी अशीं मापें घेण्याची पद्धत म्हणजे माणसाची उभी उंची व ढुंगण टेंकून बसलेला असतांनाची उंची मोजणें हा होय. ह्या पद्धतीनेंही निरनिराळया प्रमाणांचे लोक शोधून काढतां येतात. निरनिराळया कारणांमुळें हें माप घेणें मला शक्य झालें नाहीं व पुढच्या विवेचनांत तें विचारांत घेतलेलें नाहीं. हें प्रमाण बऱ्याच अंशीं आनुवंशिक आहे. ( आकृति १ ).

## वर्ण

प्रत्येकाच्या डोळयांत भरणारा दुसरा मानवी गुण म्हणजे वर्ण होय. हा गुण बऱ्याच स्तनंधय प्राण्यांत आढळतो. व त्यांच्यावर केलेल्या संशोधनामुळें वर्ण पितरांकडून अनुवंशिकत्वानें मुलांच्यांत कसा संक्रान्त होतो ह्याचें बरेंच ज्ञान झालें आहे. हा गुण अनुवंशिकही आहे पण परिस्थितीप्रमाणें त्यांत इतका बदल होतो कीं, जन्मतः एकाच वर्णाचीं माणसें निरनिराळीं दिसूं लागतात. पण वर्णांत बदल होण्यालाही मर्यादा असते. व हा गुण मानवांचें वर्गीकरण करण्यास थोडासा उपयोगी पडतो. वर्ण म्हटला म्हणजे आपल्याला कातडीचाच वर्ण मुख्यत्वेंकरून वाटतो पण वर्ण केसांत व डोळयांतहि आढळतो, व डोळे, केस व कातडी ह्या तिन्हींचा वर्ण परीक्षावा लागतो. मनुष्याच्या कातडींत वर्णजनक पेशी

असतात व कातडीच्या आवरणाखालीं गरज लागेल त्याप्रमाणें काळा किंवा पिंगट रंग सांठविणें हें त्यांचें काम असतें. सूर्यप्रकाशांत जे अति-नीलकिरण असतात ते सारखे कातडीवर पडतात. कातडीखालीं रंग नसल्यास ते किरण कातडीखालून वहाणाऱ्या बारक्या बारक्या रक्तनलिकां-वर पडणें शक्य आहे व रक्तनलिकांचें आवरण त्यामुळें भाजून निघून त्या सुजतात व फुटतात.त्याचप्रमाणें डोळ्याच्या मागच्या बाजूला असलेल्या रक्तवाहिन्या व पडदा ह्यांचें प्रकाशाबरोबर येणाऱ्या अतिनीलकिरणांपासून संरक्षण व्हावें म्हणून बुबुळाजवळ असलेल्या रंगपेशी रंग तयार करतात व आपलीं बुबुळ काळीं वा पिंगीं दिसतात. त्याचप्रमाणें केंसांतही रंगकण असतात. रंगकणांच्या दाटपणावर म्हणजे कमी अधिकपणावर कातडीचा, डोळ्यांचा व केंसांचा रंग अवलंबून असतो. तीनही ठिकाणचा रंग साधा-रणपणें सारख्या प्रमाणांत गडद किंवा फिक्का आढळतो. पण मिश्र संततींत हें साहचर्य राहात नाहीं. अंगांत रंगपेशी मुळींच नसणें हा एक रोग आहे. असे लोक अतिशय गोरे, अंगावरील केस पांढरे व बुबुळ तांबूस निळसर असे असतात. ह्यांना सूर्यप्रकाशांत डोळे उघडून पहातां येत नाहीं म्हणून त्यांचे डोळे किलकिलेच असतात व त्यांना उन्हाचा फार त्रास होतो. हा रोग जगांतील सर्व वंशांतील माणसांत आढळतो. भारतांतही अशा तऱ्हेचे वर्णहीन लोक आढळतात. अगदीं गोरे म्हणजे वर्णहीन नीग्रो, रेड इंडियन वगैरे लोक असल्याचेहि दाखले आहेत. रंगहीनतेची ह्याच्या अलीकडची पायरी म्हणजे युरोपीय वंशांतले उत्तरेकडचे लोक होय. ह्यांचे केस पांढुरके तांबूस किंवा सोनेरी, कातडी गुलाबी, गोरी व डोळे निळे असतात. युरोपीय वंशांत अंग गोरें असून काळ्या अथवा पिंग्या डोळ्यांचे व केसांचे लोकही आढळतात, त्याचप्रमाणें निमगोरे व काळे लोकही आढळतात. निग्रो वंशीय लोकांत कातडी, केस व डोळे काळे असतात. मोंगोल वंशाचे लोकांत वर्ण निग्रोइतका काळा नसतो पण उत्तर युरोपीयांइतका गोराही नसतो. तरी त्यांत गोऱ्यापासून साधारण काळ्या वर्णापर्यंत सर्व छटा सांपडतात. ह्या वंशांतील लोकांचें एक वैशिष्ट्य म्हणजे कातडींतील वर्णपेशींमुळें आलेल्या वर्णाखेरीज एक पिवळी झांक कातडीच्या रंगांत मारते. ती कांहींत कमी असते व कांहींत जास्त असते. पण सगळ्या

मोंगोल वंशीयांत थोड्याबहुत प्रमाणांत सांपडतेच. ह्या वंशांतील लोकांचे केस व डोळे दाट पिंगट व काळे असतात. फिन्लंड, हंगेरी व एस्किमोंचा प्रदेश ह्या ठिकाणच्या मोंगल-युरोपीय मिश्रसंततींत गुलाबी कातडी, निळे डोळे व सोनेरी केसही आढळतात.

हिंदुस्थानांतील बहुतेक लोक निमगोरे ते काळे ह्या सदरांत मोडतात. उत्तर युरोपीयांइतकें गोरेपण कोणाचें नसतें, तसेंच नीग्रोइतकें काळेपणही, कांहीं जंगली जाती वगळल्यास, कोणाचें नसतें. कांहीं लोकांच्या केसांत सोनेरी झांक मारते, काहींचे डोळे निळे किंवा घारे असतात व त्या जमाती वंशदृष्ट्या मिश्र आहेत असें समजावें.

उंचीवरून मानवांचें वर्गीकरण करणें सोपें आहे पण उंची हा गुण सबंध मानवजात मुख्य मुख्य उपवंशांत विभागण्यांत फारसा उपयोगी नाहीं. नीग्रो वंशीय, युरोपीय वंशीय व मोंगोलवंशीय ह्या तिन्ही मुख्य वंशांत अति उंच व ठेंगू माणसांचेही गट सांपडतात. जगांतील सर्व जातींचें वर्गीकरण खालील प्रमाणें केलेलें आढळतें.

| | |
|---|---|
| जळमाणसें... | उंची ४ फूट १० इंचापर्यंत. |
| ठेंगणीं माणसें... | ,, ४ फूट १० इंच ते ५ फूट २ इंच |
| मध्यम उंच.... | ,, ५ फूट २ इंच ते ५ फूट ६ इंच |
| उंच... | ,, ५ फूट ६ इंच ते ५ फूट ८ इंच |
| अति उंच... | ,, ५ फूट ८ इंचांच्या वर. |

हीं सर्व उंचीचीं प्रमाणें पुरुषांचीं आहेत. स्त्रियांचीं मापें साधारणपणें दोन दोन इंचांनीं कमी समजावीं. साधारणपणें वंशपरीक्षेसाठीं आतांपर्यंत पुरुषांचींच मापें जास्त प्रमाणांत घेतलेलीं आहेत व ह्या मापांवरून बांधलेले अंदाज त्या त्या वंशांतील स्त्रियांनाही लागू पडतात. पण एकंदरीनें स्त्रियांचा बांधा गोलसर व पुरुषांच्या मानानें ठेंगणा असतो. डोकें पुरुषांपेक्षां लहान असतें. नाक पुरुषांच्या इतकें वरवरीत नसतें. जबडा पुरुषांच्या इतका मोठा नसतो. एकंदर सर्वच अवयव पुरुषांचे मानानें कमी वाढलेले असतात व शरीरांत चरबी जास्त व हाडें लहान ह्यामुळें गोलाई

आलेली असते. ह्या प्रकरणांतील वर्णन पुरुषांनाच लागूं आहे असें समजावें.

अत्यंत ठेंगणीं माणसें किंवा जळमाणसें सध्यां जगांत फक्त दोनच ठिकाणीं सांपडतात. मध्य आफ्रिकेच्या घनदाट अरण्यांत रहाणाऱ्या नेग्रिलो हें नांव दिलेल्या निरानिराळ्या जमाती व अंदमान बेटावर रहाणारे नेग्रिटो. हीं नांवें युरोपीयांनीं दिलेलीं आहेत. त्यांचीं स्वतःचीं अशीं नांवें निराळीं आहेतच. ठेंगणीं माणसें हिंदुस्थानांतील जंगलांतून, ऑस्ट्रेलियांत, आग्नेय आशियांत व पॅसिफिक महासागरांतील बेटांवर आढळतात. हिंदुस्थानांत जंगलाबाहेरील नागर प्रदेशांतही पुष्कळ ठेंगणीं माणसें दिसतात, त्यांचें कारण वंशमिश्रण हें असण्याचा संभव दिसतो. मध्यम उंचीचीं माणसें जगांत सर्वत्र आहेत. हिंदुस्थानांतील बहुतेक मानववंश मध्यम उंचीचेच आहेत. दक्षिण युरोप, मध्य युरोप, जवळ जवळ सगळी आफ्रिका व आशिया येथें मध्यम उंचीचीं माणसें आढळतात. उंच जाती म्हणून सूडानचे नीग्रो, उत्तर युरोपचे लोक, चीनमधील कांहीं जाती, अमेरिकेंतील कांहीं रेड इंडियन, आपल्याकडील पंजाबी, जाट वगैरे जातींचा उल्लेख करतां येईल. अति उंच जाती म्हणून नील नदीच्या कांठचे कांहीं लोक, स्कॉटलंडमधील हायलंडर व दक्षिण अमेरिकेच्या दक्षिण टोंकास रहाणारे पॅटॅगोनियाचे लोक हे लक्षांत येतात. उंची हा गुण जरी आनुवंशिक असला तरी भोंवतालची परिस्थिति व पोषण ह्यांवर बऱ्याच अंशीं अवलंबून आहे. बालपण हें वाढावयाचें वय आहे. प्रौढत्व आलें म्हणजे वाढ खुंटते. दमट, उष्ण हवेंत सर्वच जीवांना लवकर प्रौढत्व येतें व वाढ खुंटते. ह्या उलट कोरडी, थंड व मोकळी हवा आणि पुरेसें अन्न मिळाल्यास वाढीस मदत होते. अर्थात् ह्या नियमालाही अपवाद आहेत व त्यांचीं कारणेंहीं अनेक आहेत. पण आज इतक्या खोलांत शिरण्याचें आपल्याला कारण नाहीं. शरीराची व निरनिराळ्या अवयवांची आकृति व परिमाण ह्यांचा व भौगोलिक परिस्थिति ह्यांचा कांहींतरी संबंध आहे खास. पण तो नक्की कशा तऱ्हेचा आहे, हें मात्र अजून नीट ओळखतां किंवा शोधून काढतां आलें नाहीं. रंग सूर्यकिरणांवर अवलंबून आहे व काळ्या कातड्याचे लोक

साधारणपणें विषुववृत्तावरील उष्ण व दमट हवेंत असतात व गोऱ्या कातडीचे लोक उत्तरेला थंड हवेंत असतात, हें सांगितल्याबरोबर पटतें. पण ऑस्ट्रेलियांत व त्यांतूनही टॅसमेनियांत तर हवा कोरडी व थंड असूनही काळ्या कातडीचेच लोक मूळ रहात होते हें कसें हा प्रश्न रहातो. म्हणून सध्यांतरी वर्णिलेले गुण बऱ्याच अंशीं आनुवंशिक आहेत असें धरून चालणें सयुक्तिक आहे.

केसांचा रंग

केसांना जसा रंग, त्याचप्रमाणें विशिष्ट आकारही असतो. कांहीं केस जाड व लांबसडक असतात. ते डोक्यावरून दोऱ्याप्रमाणें लांब लोंबतात. कांहींत थोडयाबहुत प्रमाणांत वक्रता असते. म्हणजे केसांचा दोनतीन इंचांचा तुकडा कागदावर ठेवला तर तो परिघाचा भाग कल्पून एक चक्र काढणें शक्य असतें. ह्या चक्राच्या लहानमोठेपणावर केसांची वक्रता अवलंबून असते. चक्र मोठें असेल तर केसांत नुसत्याच लाटा ऊर्फ लहरी दिसतात. वक्रता खूप असेल तर केसांच्या मळसूत्राकार गुंडाळ्या होतात. केसांची लांबी व जाडी बऱ्याच प्रमाणांत वक्रतेवर अवलंबून असते. जे केस सडक सरळ असतात ते जाडही असतात व खूप लांबही वाढतात.



आकृति २ : केसांचे आडवे छेद व रंगकणांची घनता

कुरळे केस मऊ, पातळ व आखूड असतात. ह्या तीन तऱ्हेच्या केसांचा आडवा छेदही निरानिराळा असतो. सरळ केस छेदांत गोल किंवा कोपरे झिजलेल्या चौरसासारखे असतात. अतिशय कुरळे केस छेदांत लंब गोल, क्वचित् काजूच्या बीसारखे असतात; व मध्यम लहरी लहरी असलेले केस मध्यम बेजाचे असतात. लंबगोलच पण अरुंद

लंबगोल नव्हे असे असतात.' (आकृति २) पैकीं जाड सरळ केस मोंगोल वंशीय लोकांचे असतात. अति कुरळ (केशचक्राचा व्यास $\frac{1}{8}$ इंचापासून $\frac{1}{2}$ इंचापर्यंत ) केस नीग्रो वंशीय लोकांचे असतात व मध्यम कुरळे, लहरीमय केस युरोपीयांचे असतात. दक्षिण हिंदुस्थानांतील जंगलांतील <u>कादर</u> नांवाची जात वगळल्यास हिंदुस्थानांत अति वक्र केस कोणाचेच नाहींत. सरळ केस नेपाळांतील कांहीं जाती, भूतानांतील भोटिया व आसामांतील खासी, गारो, लेपचा आदि मोंगोल वंशीय वा मिश्र लोकांत आढळतात. बंगाल्यांतील महिलांचे लांबसडक काळेभोर केस हे कदाचित थोड्याफार वंशमिश्रणाचें फळ दिसतें. त्याचप्रमाणें कोंकणपट्टींत क्वचित् अतिशय कुरळे, मुंग्या मुंग्या सारखे केस दिसतात तेही त्या पट्टीवर आलेल्या मिश्र अरबी व हबशी लोकांच्या मिश्रणानें आले असावेत. त्याखेरीज हिंदुस्थानांत सर्व जमाती मध्यम कुरळ्या केसांच्या आहेत. कुरळे केस महाराष्ट्रांत, विशेषतः पश्चिम भागांत दिसतात. बाकीच्या महाराष्ट्रांत लहरीयुक्त केस व क्वचित् लांब सडक केसही दिसतात.

## केसांचें प्रमाण

केस जसे डोक्यावर असतात तसे अंगावरही असतात. विशेषतः पुरुषांना तोंडावर, छातीवर, हातावर व पायावर केस असतात. युरोपांतील



आकृति ३ : ऑस्ट्रेलियांतील मनुष्य



आकृति ४ : भरदार दाढीचा सॉलोमन बेटावरील माणूस

लोक, ऑस्ट्रेलियांतील लोक (आकृति ३ व ४), जपानांतील आयनु हीं जगांतील अत्यन्त केसाळ मागसें होत. मोंगोलवंशीय पीतवर्णी लोकांत डोक्याचे केस लांब व विपुल असतात. पण तोंडावर व अंगावर जवळ जवळ केस नसतात, म्हटलें तरी चालेल. कांहीं वर्षांपूर्वी आशियांतील सर्व राष्ट्रांची एक सांस्कृतिक परिषद झाली होती. तेव्हां तिबेट व भूतान मधून प्रतिनिधी आले होते. त्यांत कांहीं उच्च सरदार घराण्यांतली मंडळी होती व त्यांत एक स्त्री व दोन पुरुष होते. ह्या लोकांत स्त्री पुरुषांचा पोशाख सारखाच होता. स्त्रियांनीं व पुरुषांनीं लांब, ढोंगळ झगे घातलेले होते. गळ्यांत नील मण्यांच्या माळा होत्या. कानांत कुंडलें होतीं. केसांच्या वेण्या घालून त्यांतही अलंकार घातलेले होते व पुरुषाचा चेहरा, दाढी मिशा नसलेला असा नितळच होता. परिषद संपेपर्यन्त आम्हांपैकीं बरेच जणांना त्यांतली स्त्री कोठची व पुरुष कोठचा हें कांहीं कळलें नाहीं. नीग्रो लोकांतही पुष्कळदां शरीरावर व तोंडावर केस फार कमी असतात व आंग साटिनच्या कापडासारखें गुळगुळीत व मऊ असतें. ज्या त्वचेवर लव अथवा केस असतात ती अशी घोटीव, गुळगुळीत कधींच दिसत नाहीं. पॅरिसला एका नीग्रो कलावंताला नाचतांना मीं पाहिलेलें आहे. त्याचें काळेभोर, केशहीन, बांधेसूद शरीर जिवंत माणसाचें नसून ब्रॉन्झ धातूचेंच जणूं आहे असा भास होत होता. पुष्कळांचा असा समज आहे कीं, चेहऱ्यावर दाढीमिशांचें जंगल व वक्षस्थळ केसाळ असणें हें पौरुषाचें लक्षण आहे. दाढीमिशा हें पुरुषाला प्रौढत्व आल्याचें एक सामान्य लक्षण आहे. पण दाढीमिशांचें परिमाण वंशावर अवलंबून असतें हें आतां कळलें असेलच. केस कमी म्हणून नीग्रो वंशीय वा पीतवंशीय लोक पौरुष गुणांत कोणत्याही दृष्टीनें कमी नाहींत. हिंदुस्थानांत कांहीं लोक अति केसाळ तर कांहीं कमी केसांचे असे दिसतात. डोक्याखेरीजच्या शरीरावर मुळींच केस नाहींत असे लोक आढळले नाहींत, पण केसांचें परिमाण कमी असलेले पुष्कळ दिसतात. पंजाबी व जाट ह्यांच्या विपुल दाढीमिशा सर्वांना माहिती आहेतच. युरोपीयांच्या दाढीमिशाही तशाच असतात. गालफडाच्या हाडापर्यन्त दाढी येऊन पोचलेली असते व हन-

बटीखालीं व वर जवळ जवळ खालच्या ओठापर्यन्त दाढी भिडलेली असते. ह्याउलट कांहीं वन्य जाती अशा आढळतात कीं, गालावर दाढी फारच कमी, एक लहान रेघ व हनुवटीखालीं थोडी दाढी असते. अशा दाढीला (आकृति ५) "अजश्मश्रू" ( बोकडाची दाढी ) असें म्हणण्याचा जर्मन शास्त्रज्ञांत प्रघात आहे. महाराष्ट्रांत पंजाब्यां-इतकी दाढी असलेले लोक सर्व जातींत थोडथोडे सांपडतात पण एकंदरीनें अंगावरील केसांचें प्रमाण कमी असतें व बोकडदाढी असलेले लोक स्वतःला उच्च समजणाऱ्या जातींपासून तों तहत वन्य जातींपर्यंत सर्वांत आढळतात. हें वंशमिश्रणाचें लक्षण आहे ह्यांत संदेह नाहीं.



आकृति ५ : अजश्मश्रू–
सीलोनमधील वेद्द

डोकें व मुख

सर्वांचें पहिल्यानें लक्ष वेधणारा शरीराचा भाग म्हणजे चेहरा. चेहऱ्याच्या व डोक्याच्या परिमाणांवरून व आकृतीवरून मानवांचें महत्वाचें वर्गीकरण केलेलें आहे. डोक्याच्या कवटीचें परिमाण ठरवणें सोपें असतें. कवटींतील सर्व छिद्रें बंद करून, खालच्या मुख्य छिद्रांतून बरी किंवा बाजरी ह्यासारखें धान्य भरतात व नंतर तें बाहेर काढून किती भरतें तें मोजतात. सध्यांच्या मानवजातींत डोक्याच्या पोकळीचें परिमाण १३०० ते १८०० घनसेंटिमीटर म्हणजे ८०-१०० घनइंच भरतें.* बायकांचें डोकें साधारणपणें १२५०-१६०० घ. सें. मी. इतकें भरतें. चिनी लोक सर्वांत मोठ्या डोक्याचे असतात, तर मागें वर्णिलेलीं जळमाणसें सर्वांत लहान डोक्याचीं असतात. जिवंतपणीं डोकें मोजणें तितकें सोपें नाहीं. डोक्याची

* सुमारें १॥ शेर—२ शेर पुरुषांचें,
१। शेर—१॥ शेर बायकांचें प्रमाण.

लांबी, रुंदी व उंची ह्या तीन प्रमाणांचा गुणाकार केला असतां घनफळाची साधारण कल्पना येते, किंवा डोक्याचा घेर मोजूनहि येते. वरील गुणाकारानें आलेलीं घनफळें व घेरानें आलेली संख्या ह्यांचें प्रमाण इतकें उत्तम जुळतें कीं, नुसता घेर मोजूनही कार्यभाग होईल, असें वाटतें. मनुष्याच्या डोक्यावरचे केस व ते बांधण्याच्या तऱ्हा ह्या हें माप घेण्याच्या मार्गांत फार अडचणी उत्पन्न करतात. तरीहि आतांपर्यंतच्या कामावरून हें माप फार उपयोगी आहे व वांशिक तुलनेला त्याची फार मदत होते असें दिसून आलें आहे. मराठी मुलुखांतील मापें देतांना ह्याचा विचार पुढें येईलच.

डोक्याला जसें परिमाण किंवा लहान मोठेपणा असतो तशीच आकृती असते. ह्या आकृतीची कल्पना लांबी-रुंदीच्या सापेक्ष प्रमाणांत देण्याचा प्रघात आहे. फक्त एकच आंकडा देतात व त्यानें लांबीचें किंवा रुंदीचें प्रत्यक्ष ज्ञान न होतां केवळ लांबीच्या शेंकड्यांत रुंदीचें प्रमाण कळतें. हीं मापें कवटीचीं व जिवंत माणसाच्या डोक्याचीं निरनिराळीं असतात. ह्यावरून जगांतील मानव प्राण्यांचे खालीलप्रमाणें विभाग पाडलेले आहेत.



आकृति ६ : दीर्घकपाल		मध्यकपाल		पृथुकपाल

दीर्घ कपाल—७५ ते ७७ पर्यंत; म्हणजे ज्यांच्या डोक्याच्या रुंदीचें प्रमाण लांबीच्या शेंकडा ७५ ते ७७ पर्यंत आहेत असे लोक.

मध्य कपाल—७७ ते ८२ पर्यंत.

पृथु कपाल—८२ च्या वरचे.

कांहीं शास्त्रज्ञ हीं प्रमाणें ७५, ७५-८०, ८०-८५ अशींही देतात. पण वर सांगितलेलें हॅडनचें वर्गीकरण बहुतेक सर्वमान्य आहे ( आकृति ६ ).

कानापासून माथ्यापर्यंत डोक्याची उंची मोजून उंचीचें प्रमाण लांबीच्या शेकड्यांत येऊन आणखी एक माप मिळतें, त्यावरून डोकें उंच कीं थापटलेलें तें कळतें.

नीच मस्तक—( थापटलेल्या डोक्याचे ) ५८ ( म्हणजे लांबी : उंची हें प्रमाण ज्याचें १०० : ५८ आहे असे लोक ).

मध्यम मस्तक—५८–६३.

उन्नत मस्तक—६३ च्या वर.

जरी युरोपीय, नीग्रो व मोंगोलीय ह्या तीनही वंशांत वरील सर्व प्रकारचे लोक आढळतात, तरी देखील युरोपीयांत बहुसंख्य लोक डोक्याच्या लांबीच्या दृष्टीनें दीर्घ व मध्य-कपाल असतात. कांहीं थोड्या जाती पृथु-कपाल म्हणजे रुंद डोक्याच्या आहेत. नीग्रोमध्यें बहुसंख्य माणसें दीर्घ कपाल व कांहीं थोडीं मध्यम कपाल असतात. मोंगोलीय वंशांत एस्किमो फक्त दीर्घ-कपाल असतात. बहुसंख्य लोक पृथु-कपाल किंवा अतिपृथुकपाल व कांहीं थोडया जाती मध्यम कपाल आहेत डोक्याच्या उंचीच्या बाबतींत नीग्रो साधारणपणें सपाट डोक्याचे, मोंगोल वंशी उंच डोक्याचे ( उन्नत-मस्तक ) व युरोपीय मध्यम डोक्याचे असतात.

चेहेऱ्याचा आकार साधारणपणें डोक्याच्या आकारासारखाच असतो. म्हणजे, रुंद डोक्याच्या माणसांचे चेहरे रुंद असतात व लांब डोक्याच्या माण-सांचे लांब असतात (आकृति ७). ह्या नियमालाही महत्वाचे अपवाद आहेत. म्हणजे लांब डोक्याचे व रुंद चेहेऱ्याचे "क्रो मान्योन" हे इतिहासपूर्व लोक व सध्याचे एस्किमो आणि रुंद डोक्याचे व लांब चेहेऱ्याचे असे

फ्रान्समधील बास्क लोक होत. युरोपीय वंशांत गालफडाचीं हाडें लहान व अरुंद असतात. मोंगोल वंशीयांत तीं हाडें रुंद व पसरट असतात व त्यामुळें चेहरा पुढून थापटलेला दिसतो. नीग्रो लोकांत हाडें वर आलेलीं, पण थापटलेलीं नसतात. कांहीं जातींत, विशेषतः नीग्रो वंशीयांत खालचा जबडा म्हणजेच नाकाखालचा भाग पुढें आलेला असतो. चेहरा बाजूनें पाहिला तर तो भाग कपाळपट्टीच्या बराच पुढें आलेला दिसतो. युरोपीय व मोंगोल वंशांत जबडा व कपाळपट्टी एकाच उभ्या पातळींत असतात. कांहींचें कपाळ सपाट व उंच असतें, कांहींचें मागें झुकलेलें असतें. कांहींच्या





आकृति ७ : रुंद चेहरा लांब चेहरा

भुंवयांखालची हाडाची कमान बरीच वरती आलेली असते. हा प्रकार वन्य जाती व ऑस्ट्रेलियांतील आदिवासी ह्यांत दिसतो. स्त्रीच्या मानानें पुरुषांचीं भुंवयांखालचीं हाडें बरेचदां वर आलेलीं दिसतात. मोठ्या रुंद कपाळाच्या व रुंद डोक्याच्या माणसांत कपाळ नितळ, भुवयांची हाडें वर न आलेलीं असें बरेचदां दिसतें. नीग्रो वंशीयांचे ओठ जाड असतात. मोंगोल वंशीयांचे अति पातळ असतात. युरोपीय वंशीयांचे पातळ ते मध्यम असतात. डोळ्यांच्या रंगाबद्दल मागें सांगितलेलेंच आहे. डोळ्याचा आकारही लहान मोठा असतो. पण वंशशास्त्रीय दृष्ट्या त्याचा ठेवा

तितका अभ्यास झालेला नाहीं. डोळ्याच्या आकृतीचें आणखीहि एक वैशिष्ट्य आहे. “ चिनी डोळे ” किंवा “ जपानी डोळे ” हा शब्द-प्रयोग आपण पुष्कळदां ऐकला असेल. फक्त मोंगोल वंशीयांत किंवा त्यांच्याशीं मिश्र असलेल्या कांहीं वंशांतच असे डोळे असतात. आपल्या डोळ्याचा आंतला कोन व बाहेरचा कोन जोडून जी रेषा होते ती भुईशीं समांतर होते व दोन्ही डोळ्यांचे आंतील बाहेरील कोन एका रेषेंत येतात.




आकृति ८ : युरोपी डोळा चिनी डोळा

वरच्या बाजूला डोळ्याचे उभे छेद दाखवले आहेत.

अ = वरची पापणी

ब = खालची पापणी

क = बुबुळ

मोंगोलवंशीय लोकांचे डोळे नाकाच्या बाशाशीं काटकोनापेक्षां मोठा कोन करतात. त्यांचे आंतले कोन खालीं व बाहेरचे कोन वर असतात. दोन्ही डोळ्यांचे बाहेरचे कोन आंतल्या कोनाशीं जोडल्यास त्या रेषा एकमेकांशीं कोन करतात. ह्यावरून कोणाला असें वाटेल कीं, मोंगोलांच्या डोळ्यांच्या खांचाच तिरक्या असतात. पण तसें मुळींच नाहीं. डोक्याची कवटी पाहिली तर असें दिसून येईल कीं, त्यांच्या डोळ्याच्या खांचाची रचना

व प्रत्यक्ष डोळा हीं अगदीं इतरांसारखींच आहेत. वरच्या पापणीला मध्यभागीं एक अगदीं पातळशी घडी पडते. मोंगोलीय डोळयांत पापणी पातळ नसून बरीच जाड असते व तीमधली घडी चरबीच्या थरानें जाड होऊन इतकी खालीं लोंबते कीं, त्यामुळें डोळयाची खालची कड, विशेषतः नाकाजवळच्या आंतल्या कोनाची बाजू, झाकून जाते व आंतला खरा कोन न दिसतां दुसराच, जरा खालच्या कडेशीं असा कोन होतो व डोळे तिरकस दिसतात. कांहीं लोकांत ही घडी जाड व फार लोंबती असते. कांहींत कमी असते. त्यामुळें मोंगोल वंशीयांचे डोळे नुसते तिरकसच नव्हे तर, बरेचसे बारीकही असतात. महाभारतांतील शूर योद्धा भगदत्त हा हत्तीवर बसून लढत असे. त्याच्याबद्दल असें वर्णन आहे कीं, त्याच्या पापण्या डोळयावर येऊन त्याला दिसत नसे म्हणून तो त्या वर करून फडक्यानें पट्टी बांधून लढत असे. हा राजा प्रागज्योतिषपुरचा म्हणजे हिंदुस्थानच्या ईशान्येकडचा, ज्या देशांत गारो, लेपचा वगैरे मोंगोलवंशीय लोक आज रहातात तेथला. तेव्हां तो त्या वंशांतील तर नव्हे ना असें वरील वर्णनावरून वाटतें. ( आकृति ८ ).

चेहऱ्यावरचा चटकन् लक्षांत येणारा अवयव म्हणजे नाक. नाकाची लांबी, रुंदी, उंची हीं डोळयांनीं पारखतां येतात व मोजतांही येतात. व म्हणून नाकाच्या आकारावरून मनुष्याचें वर्गीकरण केलेलें आढळतें. भुंवया जेथें मिळतात त्याच्या जरा खालीं नाकाचें हाड कपाळाच्या हाडाशीं सांधलेलें असतें. तेथपासून तो नाकाचा खालचा भाग वरच्या ओठाला मध्यभागीं जेथें चिकटतो तेथपर्यंतच्या मापानें नाकाची लांबी मोजतात. दोन नाकपुड्यांमधलें जें अंतर ती नाकाची रुंदी. नाकाची रुंदी लांबीच्या शेंकडा प्रमाणांत मांडली म्हणजे नाकाच्या लांबी रुंदीची कल्पना येते. अरुंद नाकाचे लोकांत हा आंकडा ५० ते ७० येतो. मध्यम नाक ७५–८५ व रुंद नाकाचा आंकडा ८५–९१ किंवा १०० चे वरही येतो. १०० आंकडा म्हणजे नाक जितकें लांब तितकेंच रुंद. नीग्रोवंशीय लोक रुंद नाकाचे, मोंगोलवंशीय मध्यम नाकाचे व युरोपीय लोकांत अति अरुंद ते मध्यम नाक आढळतें. ऑस्ट्रेलीय लोकांत नाक रुंदच असतें. नाक बसकें

कां उंच तेंही मोजतां येतें. दोन्ही डोळ्यांच्या बाहेरील कडांमधील अंतर एकदां सरळ (कंपासनें) मोजावयाचें व एकदां नाकावरून पोलादी लवचिक पट्टी (टेप) लावून मोजावयाचें. दुसऱ्या मोजणींत नाकाची उंची येते. ह्यांत पुष्कळदां बुबुळ वर असेल तर डोळ्याच्या उंचीचीही भर पडते. पोलादी पट्टीनें घेतलेलें माप व सरळ घेतलेलें माप ह्यांचें शेंकडा प्रमाण म्हणजे नाकाच्या उंचीचें प्रमाण मिळतें. युरोपीय वंशाचे लोकांत नाक उंच असतें. नीग्रोचें नकटें असतें, पण मोंगोलीय लोकांत सर्वांत नकटीं नाकें आढळतात. पण त्याच वंशांतील तांबड्या इंडियनांचीं नाकें उंच व बरबरीत असतात. (आकृति ९)


आकृति ९
नाकाचे दोन प्रकार

## मुख्य मानववंश

हीं सगळीं प्रमाणें लावून मनुष्य जातीचें वर्गीकरण केलें तर मुख्य तीन वंश दिसतात. नीग्रोसदृश, मोंगोलसदृश व युरोपीयसदृश असे ते तीन वर्ग आहेत. नीग्रो सदृश लोक आफ्रिका खंडांत, अंदमान बेटांत मेलानेशियांत व अगदीं थोड्या प्रमाणांत मलाया व बोर्नियोच्या जंगलांत रहातात. ह्यांचे केस अत्यंत कुरळे, फार लांब नाहींत असे व काळे असतात. डोकें लांब व अरुंद, विशेषतः मागील बाजू खूप फुगीर व गोल अर्धवर्तुळाकृती अशी असते. डोकें वरून थापटलेलें असतें. रंग अतिशय काळा, जबड्याचें हाड पुढें आलेलें असतें. आफ्रिकन नीग्रो लोकांत ओठ अति जाड व बाहेर वळलेले असतात. अंदमान व मेलानेशियाच्या लोकांचे ओठ इतके जाडहि नसतात व बाहेर वळलेलेहि नसतात. ह्या वंशांत अंदमानी व मध्य आफ्रिकी जळमाणसें आढळतात. त्याचप्रमाणें नील नदीच्या कांठचे व सूडानमधील उंच लोकही आढळतात. नीग्रो वंशीयांच्या अंगावर व तोंडावर केस कमी असतात. कांहीं लोकांत धडाच्या मानानें तंगड्या फार लांब असतात. अतिप्राचीन काळीं नीग्रो-

सदृश लोक फ्रान्सचा दक्षिण किनारा, इटाली, भूमध्य समुद्राचा पूर्व किनारा येथपर्यंत पसरले असल्याचा पुरावा उत्खननांतून सांपडला आहे. दक्षिण हिंदुस्थानच्या रानांतील कांहीं जाती अंदमानीय लोकांप्रमाणें आहेत असें म्हणतात. आफ्रिकेपासून हजारो मैलांच्या समुद्रानें विभागलेल्या मेलानेशिया बेटावर किंवा अंदमानावर नीग्रोसम जाती कोठून आल्या हें एक कोडें आहे. पण त्या जर इतिहासपूर्व कालांत भूमध्य समुद्राच्या पूर्वेला असतील तर तेथून हिंदुस्थानांत येऊन पुढें सरकल्या असण्याचा संभव आहे.

मोंगोल सदृश जाती सबंध पूर्व व उत्तर आशियांत, त्याचप्रमाणें आग्नेय आशियांत व पॅसिफिक बेटांत पसरल्या आहेत. इतिहासपूर्व कालीं त्यांपैकीं कांहीं लोक बेअरिंगच्या सामुद्रधुनींतून अमेरिकेंत पोचले व त्यांनीं उत्तर दक्षिण अमेरिका व्यापली. अमेरिकेच्या उत्तरेपासून दक्षिण अमेरिकेच्या निमुळत्या टोंकापर्यंत ह्याच जातीचे लोक पसरले होते. ॲमेझॉनच्या अरण्यांतल्या एकदोन जातीच काय त्या पॅसिफिक बेटांतून आलेल्या मेलानेशीय वंशाच्या असाव्या असें वाटतें. त्याखेरीज सर्व अमेरिका ह्यांनीं वसविली होती. रेड इंडियन म्हणतात ते हेच. त्याचप्रमाणें उत्तर ध्रुवाभोंवतालच्या चिरंतन बर्फाच्छादित पट्टयांत रहाणारे एस्किमो लोक याच वंशांतले. आग्नेय आशियांत ह्यांची निग्रोसम व आस्ट्रेलियन जातींशीं गांठ पडली व त्यांचा संगम झाला. इतिहासाच्या दृष्टीनें महत्वाची घटना म्हणजे मोंगोल वंशीयांची पश्चिम सरहद्द, युरोपीय वंशांच्या पूर्व सरहद्दीशीं भिडते व फिनलंडपासून ग्रीसपर्यंत युरोपीय वंशांशीं त्यांचें मिश्रण आढळतें. हिंदुस्थानच्या उत्तरेस पशुपालन करणाऱ्या भटक्या टोळ्या ह्याच वंशाच्या आहेत. आफ्रिकेच्या दक्षिण टोकाशीं असलेले खोईसान उर्फ बुशमेन व हॉटेंटॉट ह्यांतही मोंगोल मिश्रण असावें असें दिसतें. म्हणजे इतिहासपूर्व कालांत हा वंश बहुप्रज, धाडसी, गतिमान असा दिसतो व युरोपीयांच्या मध्ययुगीन आक्रमणाआधीं अमेरिका, पॅसिफिक बेटें, आशिया, युरोपचा पूर्व भाग व उत्तर ध्रुव प्रदेश त्यांनीं व्यापला होता असें दिसतें. हिंदुस्थानांत हिमालय प्रदेशांतील गुरखा व भोटिया मिश्र मोंगोल वंशाचे

आहेत. आसामांतील मूळ प्रजा मोंगोल वंशीय आहे व मुंड, खोंड व कोरकू हेही मोंगोल–मिश्र असावे असें दिसतें. पण ते पूर्ण मोंगोल खास नव्हेत. कुशान व हूण हे हिंदुस्थानांतले लोक मोंगोल होते व बाबर, चेंगीझखान, वगैरे मिश्र मोंगोल होते.

ह्या वंशांतील लोक निमगोरे ते काळसर असतात. त्यांच्या वर्णांत पिवळी छटा असते. डोकीं रुंद, जवळ जवळ गोल अथवा चौकोनी व उंच असतात. रेड इंडियन खेरीज इतरांचीं नाकें बसकीं व आखूड, पण फारशी रुंद नाहीं अशीं असतात. डोळे तिरकस असतात. पण कांहीं प्राचीन मोंगोल जातींत डोळे तिरकस नव्हते. अमेरिकेंतील कांहीं रेड इंडियनांत डोळे सरळ दिसतात. त्याचप्रमाणें आसामांतील खासी, ब्रह्म-देशांतील कांहीं वन्य जाती, नाग लोक, जाव्हा, सुमात्रा येथील कांहीं जाती ह्यांचें डोकें, नाक व गालफडें वगैरे मोंगोलीय असूनही डोळे तिरकस नाहींत. मग तें अतिप्राचीन युरोपीय मिश्रणानें कीं काय कोण जाणे. गालफडें रुंद, डोळे बारीक, ओठ पातळ व लहानसें नाक, ह्यांमुळें सबंध चेहरा थापटलेला, त्यावर उंचसखलपणा नसलेला असा वाटतो. अंगावर व चेहऱ्यावर केस फार कमी असतात. ह्या वंशाचें मिश्रण ईशान्य भारतांत थोडें बहुत झालेलें दिसतें. इतर भागांत किती आहे तें नक्की कळत नाहीं. रुंद चेहेऱ्याचीं माणसें पुष्कळदां दिसतात, पण तीं मोंगोलीय वाटत नाहींत. तरी पण आशिया व युरोप ह्यांच्या सरहद्दीवर मोंगल-युरोपीय ह्यांचा संगम व संघर्ष अतिप्राचीनतम कालापासून चालत आलेला आहे हें पाहिलें म्हणजे तिकडून येणारे सर्वच लोक मिश्रवंशाचे असावे असें वाटतें. हंगेरींतील माग्यार लोक मिश्रवंशाचे आहेत व ते अतिशय सुंदर दिसतात. ह्यावरून मोंगोल व युरोपीय वंशमिश्रण मोंगोलसम दिसेल असेंच कांहीं नाहीं हें लक्षांत येतें. माझे एक युरोपीय सहव्यवसायी असें म्हणतात कीं, युरोपीयांचें उंचच उंच नाक, खोल डोळे वगैरेमुळें युरोपीय चेहरा खडबडीत वाटतो, तेंच त्यांत मोंगोलमिश्रण झालें कीं, चेहऱ्याला गोलाई येऊन सौंदर्य वाढतें व स्त्रियांचे बाबतींत तर हें मिश्रण वेड लावील असें होतें. हिंदुस्थानांत उघड उघड चिनी, जपानी किंवा ब्रह्मी लोकां-

सारखे दिसणारे लोक नसले, तरी मोंगोल मिश्रण असण्याचा बराच संभव आहे व त्याचा नीट काळजीपूर्वक अभ्यास खुद्द हिंदुस्थानांत व हिंदुस्थानच्या बाहेर दक्षिण रशियांत झाला पाहिजे. ह्या बाबतींत रक्त परीक्षेचा उपयोग होईलसें वाटतें. मोंगोल वंशांत धड लांब आणि पाय व हात आखूड असें शरीरप्रमाण असतें व अशा तऱ्हेचीं माणसें हिंदुस्थानांतही क्वचित् दिसतात.

युरोपीय वंश मोंगोलीय वंशाच्या पश्चिमेकडे उत्तर युरोपपासून ऑस्ट्रेलियापर्यंत पसरला आहे. युरोपमध्यें उत्तर स्वीडनमधील लाप्, फिनलंडमधील फिन्, उत्तर ध्रुव प्रदेशाचे एस्किमो हे मोंगोलवंशीय लोक त्यांचे उत्तरेकडचे शेजारी आहेत. सैबिरियामध्यें उत्तरेपासून तो थेट उरल पर्वताच्या दक्षिणेपर्यन्त मोंगोल वंशांतील सामोयेद, वोगुळ, किरघीज वगैरे लोक युरोपीयांच्या पूर्वेकडे आहेत. कास्पियनच्या जवळ आलें म्हणजे तर मोंगोल व युरोपीय ह्यांची इतकी सरमिसळ झाली आहे कीं, अमके सर्वस्वीं मोंगोल व अमके युरोपीय हें सांगणेंच कठीण आहे. आणखी दक्षिणेकडे सरकलें म्हणजे अझरबैझानमधून इराणमध्यें येतां येतें. तुर्की तुराणी व किरगिझ ह्या मिश्र मोंगोलीयांतच युरोपीय वंशाचे इराणी, आरमेनियी, पठाण वगैरे थेट हिंदुस्थानच्या सरहद्दीपर्यंत भिडलेले आहेत. बहुतेक सर्व हिंदुस्थान युरोपीय वंशाचाच आहे पण हिंदुस्थानच्या उत्तरेला तिबेट, चिनी तुर्कस्थान व पूर्वेला चीनची सरहद्द व ब्रह्मदेश हे मोंगोल वंशीयांचे देश आहेत. पण ह्या देशांतूनही मोंगोल वंशाचे नसलेले कांहीं आदिवंशीय थेट उत्तरेपासून तो मोलुक्काच्या सामुद्रधुनीपर्यंत व तेथून पुढें पॅसिफिक बेटांत अधून मधून दिसतात. ऑस्ट्रेलियांतले आदिवासी, सीलोनचे आदिवासी ( वेद्द ), हे युरोपीय वंशाचेच आहेत. युरोपीय वंश थेट उत्तर ध्रुवापासून ऑस्ट्रेलियापर्यंत इतिहासपूर्व कालांत पसरलेला होता व त्याचें आणि मोंगोल वंशाचें साहचर्यही फार जुनें आहे. आइकष्टेट हे जर्मन शास्त्रज्ञ मोंगोल वंशीय, नीग्रो वंशीय व युरोपीय वंशीय, अशीं नांवें न देतां पौर्वात्यवंश, दाक्षिणात्य वंश व उत्तरीय वंश अशीं नांवें देतात. त्यांच्या मतानें दाक्षिणात्यांत नीग्रोसम व ऑस्ट्रेलीयसम असे दोन वंश आहेत.

इतर मानवशास्त्रज्ञ ऑस्ट्रेलीय लोकांचा एक निराळाच वंश कल्पितात. कांहीं कां असेना, तो वंश केशाची रचना, केसाचें प्रमाण व शरीराच्या अवयवांचें प्रमाण ह्या बाबतींत युरोपीयांसारखा आहे एवढें मात्र खरें.

युरोपीय वंशांत दोन तऱ्हेचे लोक दिसतात. पहिल्या विभागांत दोन उप-विभाग आहेत. (१) ऑस्ट्रेलियन (२) वेद्द वगैरे लोक असलेला वर्ग व दुसऱ्या विभागांत इतर सर्व युरोपीय लोक येतात. ऑस्ट्रेलीय वंश फार जुना आहे. त्यांच्या सारखी शरीररचना असलेले लोक इतिहासपूर्व कालांत सांपडलेले आहेत. पूर्वी असे लोक युरोपांतही असावे व तेथून निघून ते हळूहळू ऑस्ट्रेलिया पर्यन्त पोचले असावे. इतिहासपूर्व कालांत हिंदुस्थानापासून मेलानेशिया पर्यंत अधून मधून भूमार्ग प्रस्थापित झाला व त्या मार्गानेंच ते पुढें सरकले असावे. खुद्द ऑस्ट्रेलिया खंड व इतर उत्तरेकडचीं बेटें अशीं जोडलेली असावीं असें दिसत नाहीं. ह्या मानववंश फार प्राचीन-काळीं ऑस्ट्रेलियांत पोंचला व दुसऱ्या कोणाशीही स्पर्धा करावी न लागल्यामुळें तेथें पाश्चात्य लोक येईपर्यन्त चांगलाच फोफावला. ह्यांच्याच जोडीच्या दुसऱ्या विभागांत वेद्द, साकाई वगैरे लोक, तसेंच हिंदुस्थानच्या जंगलांतील लोक आपापल्या जंगलांतून जीव धरून आहेत. हे लोक ठेंगणे, काळे ( पण नीग्रोइतके काळे नाहींत ), नाक नकटें व रुंद असे आहेत. ह्यांच्या भुंवयाच्या खालचीं हाडें पुष्कळदां बरींच वरतीं आलेलीं व त्यामुळें डोळे खोल गेलेले दिसतात. केस रंगानें दाट-पिंगट, जवळ जवळ काळे दिसतात. केस मध्यम कुरळे, लहरी लहरी असलेले असे असतात. ऑस्ट्रेलियन लोकांच्या अंगाबर व तोंडाबर केस खूप असतात. वेद्द व तत्सम लोकांच्या अंगावर केस कमी असतात व अंगकाठी अति बारीक असते. अशा बांध्याचीं माणसें कोंकणांत ब्राह्मण, मराठा, महार, कोळी वगैरे सर्व जातींत अधूनमधून आढळतात. ह्या सर्वांचें डोकें प्रमाणानें अति लहान व आकारानें लांब किंवा मध्यम असतें. दुसऱ्या वर्गांतील जे युरोपीय आहेत त्यांचा जरा बारकाईनें विचार करणें जरूर आहे. कारण हिंदुस्थानांतले बहुसंख्य लोक त्या वंशांतीलच आहेत. ह्या वंशांतील लोकांचीं मुख्य लक्षणें म्हणजे त्यांचे थोडेबहुत कुरळलेले किंवा लहरी

असलेले केस व मध्यम ते उंच नाक, हीं होत. बाकीच्या बाबतींत प्रत्येक उपवर्गांत फरक आढळतात.

प्रकार ( अ )—दीर्घकपाल लोकांचा गट–( १ ) ह्यांत वर्णानें काळे किंवा श्यामल, उंचीनें ठेंगणे ते मध्यम, लांब डोक्याचे म्हणजे दीर्घकपाल व मध्यम नाकाचे लोक येतात. दक्षिण हिंदुस्थानांतील द्राविड भाषा बोलणारे नागर लोक ह्याच वर्गांत येतात. त्याचप्रमाणें ईशान्य आफ्रिकेंतील हमाईट लोकही ह्याच वर्गांतील आहेत. मात्र त्यांच्यांत अधून मधून नीग्रो मिश्रण आढळतें. ( २ ) दुसऱ्या वर्गांत दीर्घमस्तकी पण वर्णानें निमगोऱ्या, कांहीं मध्यम व कांहीं उंच अशा जाती येतात. केस काळेभोर व पुष्कळ असतात. बलुची, अफगाण, वायव्य सरहद्दीवरील लोक, पंजाबी व कांहीं रजपूत लोकांचा ह्या वर्गांत समावेश होतो. ( ३ ) तिसऱ्या वर्गांत पॅसिफिक बेटावरची जुनी प्रजा येते. ह्यांपैकीं कांहीं चीन, सयाम इकडेही सांपडतात. हल्लीं ह्यांचें मोंगोल वंशाशीं मिश्रण झालेलें आहे. ( ४ ) चौथ्या वर्गांत अमेरिकेंतील आतां नाहींशा झालेल्या कांहीं मिश्र जाती येतात. ( ५ ) या वर्गांत भूमध्य समुद्राभोंवतालच्या प्रदेशांतील लोक येतात. हे बरेच गोरे व मध्यम उंचीचे असतात. ( ६ ) सहाव्या उपवर्गांत अरबस्तान, पॅलेस्टाइन, इराक वगैरे प्रदेशांतील लोक येतात.

प्रकार ( आ ) मध्यमकपाल लोकांचा गट–ह्यांत १ ला वर्ग पिरिनीज पर्वतांतील बास्क लोक. २ रा वर्ग जपानातील खूप रुंद नाकाचे आयनू. ३ रा वर्ग वायव्य युरोपांतील उंच, गोरे, निळ्या डोळ्याचे व सोनेरी केसाचे लोक होत. ह्यांनाच " नॉर्डिक " म्हणतात. ४ था वर्ग निमगोरे ते काळे, मध्यम उंचीचे लोक महाराष्ट्र व दक्षिण गुजरातमध्यें आढळतात. ह्यांच्याबद्दल पुढें वर्णन येईलच.

प्रकार ( इ ) युरोपीय वंशांतील पृथुकपाल लोक ह्यांत येतात. ह्या लोकांचा एक विशेष म्हणजे हिमालयाच्या रांगांमधल्या पठारापासून, आशिया मायनरच्या उंच माळ जमिनीवर व तेथून बाल्कन प्रदेशांतून थेट युरोपच्या मध्यावरील आल्प्स् पर्वताच्या रांगांतून युरोप ते मध्य आशि-

याच्या डोंगरी मुलुखांत हे लोक मुख्यत्वें रहातात. ह्यांचे मुख्य दोन वर्ग कल्पिले आहेत. १ त्या वर्गाच्या एका शाखेंत युरोपांतील आल्प्स व कार्पेथियन पर्वतांतील लोक येतात. दक्षिण जर्मनी, स्वित्सर्लंण्ड, उत्तर फ्रान्स, झेकोस्लोव्हाकिया वगैरे देशांत ते बस्ती करून आहेत. हे ५ फूट ४ इंच ते ५ फूट ८ इंचांपर्यंत उंच असतात. वर्णानें गोरे, डोकें गोल, पृथुकपाल ( प्रमाण ८५–८७ इतकें ) चेहरा रुंद, नाक अपुरें, पुष्कळदां टोक वरतीं गेलेलें पण अरुंद असें, डोळे फिके पिंगट व केस पिंगे, मधाच्या वर्णाचे असतात. उत्तरेस ह्यांचें नॉर्डिक लोकांशीं, दक्षिणेला दीर्घकपाल दक्षिण युरोपीयांशीं व पूर्वेला थोडेंबहुत मोंगोलीयांशीं मिश्रण झालेलें आहे. ह्याच लोकांच्या दुसऱ्या शाखेला पामिरी असें नांव आहे. हे लोक निमगोरे, भरदार दाढी मिशा असलेले, काळे किंवा पिंगे केस असलेले, उंच असतात. ह्यांचा चेहरा लांबट व नाकें उंच, अरुंद व बांकदार असतात. इराणमधील गिल्चे, ताजीक वगैरे लोक व पामीर पर्वतांतील लोक ह्या शाखेंत येतात. ह्यांतील लोक पूर्वेस थेट मांचुरियापर्यंत तुरळक तुरळक पसरलेले आहेत.

२ रा वर्ग अनाटोलिया ह्या काळ्या समुद्राच्या जवळील प्रांतांत आढळतो. हे लोक मध्यम उंचीचे, काळ्या केसाचे व निमगोरे असतात. हाडपेर रुंद असून डोकें रुंद व चेहराही गोल असतो. जरा लठ्ठ होण्याकडे शरिराचा कल असतो. नाक खूप मोठें असून अग्र खालीं लोंबलेलें असतें व नाकपुड्या मोठ्या व लठ्ठ असतात. डोक्याचा मागचा भाग पार सपाट असतो. प्राचीन काळांतील असीरिया उर्फ असुरांच्या राज्यांतील: शिलाशिल्पामध्यें ह्या लोकांचीं चित्रें कोरलेलीं आढळतात. इंद्र, वरुण हे ज्यांचे देव . होते, ते हट्टी, खट्टी उर्फ हिटाइट लोक ह्याच वंशाचे. ह्यांतील लोकांचें फार प्राचीन काळापासून इतर लोकांशीं दळणवळण व मिश्रण झालेलें आहे. ज्यू हयांच्याच मिश्रणाचे असावे असें वाटतें. आपल्या इकडील पारशी लोकांतही हयांचें मिश्रण आहे. हे लोक व्यापारी म्हणून फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहेत. भाटिया, लोहाणा, सिंधी, बाणिया ह्या लोकांत वरील लोकांचें बरेंच मिश्रण असावेसें वाटतें. हयांचीच एक

शाखा पश्चिम बाल्कनमध्यें बॉस्निया, युगोस्लाव्हिया ह्या प्रांतांतून दक्षिण जर्मनीपर्यंत पोंचली आहे. तिला इलीरी शाखा म्हणतात.

जगांतील मुख्य मुख्य मानव वंशाची थोडक्यांत कल्पना आपणांस दिली. आतां महाराष्ट्रीय लोक कोणत्या वंशांत बसतात तें पाहूं.



४

# मराठी लोकांचा पिंड–चालू

## महाराष्ट्रांतील वंश व जाति

महाराष्ट्राची काय किंवा हिंदुस्थानची काय वंशदृष्ट्या पहाणी करण्यासाठीं कोणती पद्धत स्वीकारावी याबद्दल थोडेसें विवेचन आधीं केलें पाहिजे. आपल्या देशाचे भौगोलिकदृष्ट्या कांहीं विभाग पडतात. उदा. हिमालयाच्या दक्षिण उतरणीवरील प्रदेश, गंगेचें खोरें, विंध्य प्रदेश वगैरे. त्याचप्रमाणें भाषेप्रमाणें सांस्कृतिक विभाग पडतात. उदा. पंजाब, उत्तर प्रदेश, माळवा, बंगाल वगैरे. ह्या प्रत्येक प्रदेशांतील माणसांची पहाणी करून शेजारच्या प्रदेशांशीं तुलना करतां येईल. पण प्रत्येक प्रदेशांतील माणसें दोन अडीचशें निरनिराळ्या जातींत विभागलेलीं असतात. एका जातींतील माणसें साधारणपणें दुसऱ्या जातींतील माणसांशीं लग्न करीत नाहींत. ह्या जातींचा मानव वंशांशीं संबंध असेल असें मुळींच नाहीं. पण एखादा समाज जातीजातींत विभागला असला म्हणजे जसजसे नवे नवे समाज येत जातात तसतशा त्यांच्या नव्या जाती होऊन मिश्रण न होतां अलग अलग राहण्याचा फार संभव असतो. अशा परिस्थितींत प्रत्येक मोठी जात निरनिराळी तपासणें संशोधनाच्या दृष्टीनें योग्य ठरतें. निरनिराळ्या जातींचीं मापें निरनिराळीं घेऊन त्यांचीं प्रमाणें काढून सरासरी काढल्यावर जर तीं मापें एक आहेत असें दिसलें तर निरनिराळ्या जाती वंशानें एकच आहेत असें म्हणणें भाग आहे. निर-

निराळ्या जाती, त्यांचा राहण्याचा प्रदेश, लग्नाचे प्रकार, कुटुंब पद्धति ह्यांचा अभ्यास सांस्कृतिक इतिहासास फार उपयोगी पडतो. जात ही एक हिंदूंची समाजसंस्था आहे. तिच्यामुळें हिंदु समाजाचें फार नुकसान झालें आहे व ती घालवण्याचे प्रयत्नहि करणें योग्य आहे. पण आज जी संस्था अस्तित्वांत आहे तिचा निरनिराळ्या तऱ्हेच्या अभ्यासासाठीं उपयोग करणें रास्त आहे. एवढेंच नव्हे तर जातिसंस्थेचें स्वरूप नीट समजल्याशिवाय हिंदू संस्कृतीचें स्वरूपच समजणें अशक्य आहे. जातीजातींच्या आचारांत फरक असतो. ह्या फरकाचें कारण केवळ सांस्कृतिक आहे कीं सांस्कृतिक व वांशिकही आहे हा प्रश्न मनांत येतो. त्याचप्रमाणें रूपांतही फरक असतो तो कोणत्या कारणानें? हिंदुस्थानांत कोणकोणते मानववंश आले, ते कोणकोणत्या प्रदेशांत वास्तव्य करून आहेत व त्यांच्या निरनिराळ्या जाती बनल्या कीं कसें हें अभ्यासणें आवश्यक आहे. महाराष्ट्रांत कमींतकमी अडीचशें जाती आहेत व त्या एकेका जातीच्या पोटजाती मिळून झाल्या आहेत. उदा. शेतकरी म्हटले म्हणजे त्यांत मराठा, माळी, कुणबी अशा जाती आहेत. मराठ्यांत पंचकुळी, सप्तकुळी, असे प्रकार आहेत. माळ्यांत फुलमाळी, हळदमाळी वगैरे पोटजाती आहेत. अशाच कुणब्यांतही आहेत. ब्राह्मणांत देशस्थ, ऋग्वेदी, कऱ्हाडे, चित्पावन असे कितीतरी वर्ग आहेत व साधारणपणें एका पोटजातीचें दुसऱ्या पोटजातींत लग्न होत नाहीं. अशा परिस्थितींत एका प्रदेशांतील सर्व जातींचें माप घ्यावयाचें म्हटलें तर दहाबारा वर्षेंहि पुरणार नाहींत. म्हणून प्रत्येक प्रदेशांतील मुख्य मुख्य जातींचें माप घ्यावें लागतें. अशा तऱ्हेनें महाराष्ट्रांत एकंदर ५० निरनिराळ्या जातींचीं मापें घेतलीं. त्यांतही ब्राह्मणेतर जातींत मराठा ही महाराष्ट्रांतील बहुसंख्य जात असल्यामुळें तिचीं मापें सर्वांत जास्त घेतलीं. तीं ज्या प्रदेशांत घेतलीं त्यावरून त्यांचे निरनिराळे लहानमोठे १९ गट पाडले आहेत. त्याचप्रमाणें ब्राह्मण जातींपैकीं शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण जातीचीं जास्त मापें घेतलीं व त्या जातीचे एकंदर नऊ प्रादेशिक गट झाले. हे २८ गट व



महाराष्ट्र
जाती व आदिवासी यांची प्रादेशिक विभागणी
मावची
इतर भिल
तापी नदी
बंजारी
लेवा
गुजर
तडवी लेवा
कोरकु
तिरोळे
माध्यंदिन
कोळी
अहिर सोनार
माध्यंदिन
ऋग्वेदी
धीवर
आंध
हटकर धनगर
मराठा
फुलमाळी
भावसार
माध्यंदिन
ऋग्वेदी
पैनगंगा नदी
मराठा
इतर सोनार
साळी
मल्हार कोळी
वारली
ठाकूर
आगरी
वाडवळ
कोळी
शिम्पी
परीट
तेली
बुरुड
गुरव
खुटेकर धनगर
गोदावरी नदी
त्वष्टाकासार
चांभार
मांग
खत्री
पाठारे क्षत्रिय
पाठारे प्रभू
महार
कायस्थ
न्हावी
वैश्य वाणी
सोनकोळी
दैवदन्य
मराठा
भण्डारी
सारस्वत
चित्पावन
कऱ्हाडे
वैश्य वाणी
भीमा नदी
भण्डारी
सारस्वत
पोवार
गोंड
हळबी कोष्टी
चरक
महार
हळबी
कोहळी
गोवारि
महार
बावने
गोंड
मान
धनोजे
कोलाम
हळबी
गोंड

बाकीचे जातवार गट मिळून एकंदर मापें ३०५४ माणसांचीं घेतलीं. ह्या सर्व गटांची प्रादेशिक विभागणी खालीलप्रमाणें आहे.*

**वऱ्हाड व मध्यप्रांत**—( पूर्णा, वर्धा व वैनगंगा ह्यांचीं खोरीं )—१. कुणबी ( अ. तिरोळे, आ. धनोजे, इ. माना उर्फ मानवा उ. खैरे ), २. मराठा, ३. ब्राह्मण, ( अ. चरक, आ. माध्यंदिन ), ४. गोवारी, ५. कोरकू, ६. हळबी कोष्टी, ७. हळबी, ८. पोवार, ९. बावने महार, १०. कोह्याळी, ११. गोंड, १२. ढीवर व १३ कोलाम.

**खानदेश**—( तापीचें खोरें )—१. ब्राह्मण, ( अ. माध्यंदिन, आ. ऋग्वेदी देशस्थ ) २. वंजारी, ३. लेवा, ४. गुजर, ५. भिल्ल ( अ. मावची, आ. तडवी, इ. इतर ), ६. अहिर सोनार, ७. बारी, ८. मराठा.

**देश**—( गोदावरी व कृष्णा ह्यांचीं खोरीं )—१. मराठा २. ब्राह्मण ( अ. माध्यंदिन, आ. ऋग्वेदी ), ३. फुलमाळी, ४. महार, ५. कोळी, ६. चांभार, ७. तेली, ८. मांग, ९. शिंपी, १०. साळी, ११. न्हावी, १२. परीट, १३. गुरव, १४. बुरूड, १५. आंध, १६. सोनार (इतर) १७. भावसार, १८. धनगर ( हाटकर व खुटेकर ).

**कोंकण**—१. मराठा, २. वैश्यवाणी, ३. भंडारी, ४. ब्राह्मण, ( अ. सारस्वत, आ. कऱ्हाडे, इ. चित्पावन ), ५. सोनकोळी, ६. पाठारे प्रभु, ७. कायस्थ प्रभु, ८. दैवज्ञ सोनार, ९. त्वष्टा कासार, १०. पाठारे क्षत्रिय, ११. खत्री, १२. सोमवंशी वाडबळ, १३. आगरी, १४. ठाकूर, १५. वारली, १६. मल्हार कोळी.

वरील जातींची प्रादेशिक वर्गवारी जशी केली तशीच धंद्यावरून वर्गवारी केली असतां खालील मुख्य गट पडतात.

---

* ह्या सर्व संशोधनाचा सविस्तर वृत्तान्त खालील पुस्तकांत आहे. ( Karve and Dandekar ) "Anthropometric measurements of Maharashtra" (Deccan College Monographs, 1951.)

**पहिला गट**—ह्यांत मुख्यत्वें करून शिक्षक, डॉक्टर, कारकून, वकील, एंजिनिअर वगैरे धंद्यांत असलेले लोक समाविष्ट केले आहेत. बाकीच्या गटांतील लोकही हे धंदे करतात. पण ते ते नव्यानें करुं लागले आहेत व त्यांचे ज्ञातीचे असे दुसरे व्यवसाय आहेत. या गटांत पुढील जाती येतात —सर्व ब्राह्मण, सर्व कायस्थ, खत्री व वैश्यवाणी.

**दुसरा गट**—ह्यांत सर्व कारू जाती येतात. कसब व ज्यावर कसब चालवायचें त्या वस्तूचें मूल्य ह्या दोन्हीवर ह्या जातींतील उच्चनीचता व श्रीमंती–गरिबी अवलंबून असते. त्यावरून तीन पोटभेद केले आहेत. ( अ ) सोनार व कासार, ( आ ) शिंपी, कोष्टी, भावसार, तेली, भंडारी. ( इ ) ह्या वर्गांत खेड्यांतील कांहीं बलुतदार येतात : न्हावी, परीट, बुरूड, गुरव.

**तिसरा गट**—हा सर्वांत मोठा व महत्वाचा गट आहे. ह्यांत शेतकरी —जिराईत व बागाईत—येतात. ह्यांतील बरेच लोक आपल्याला क्षत्रिय म्हणवितात. इतिहासांतही शेती व लढाई हीं दोन्ही कामें त्यांनीं केलेलीं दिसतात. ह्यांतही तीन गट पडतात—( अ ) मराठा, पोवार, लेवा, गुजर, तिरोळे कुणबी, कोहाळी. ( आ ) बारी, फुलमाळी, सोमवंशी वाडबळ, ( इ ) ह्या वर्गांतले लोक स्वतःला कुणबी म्हणवतात पण कुणबी त्यांना तो दर्जा देत नाहींत. ह्यांत खैरे, माना व धनोजे हे कुणबी, हळबी, कोळी व आगरी लोक येतात.

**चवथा गट**—अस्पृश्य : महार, चांभार व मांग.

**पांचवा गट**—मासे पकडणारे : सोनकोळी—( हे समुद्रावर मासे पकडतात ), व ढीवर ( हे नद्या, तळीं वगैरे गोड्या जलसंचयांत मासे पकडतात ).

**सहावा गट**—पशुपाल : खुटेकर व हाटकर धनगर, गोवारी आणि वंजारी.

**सातवा गट**—अरण्यवासी : ह्यांतील बहुतेक लोक थोडी शेती करतात व त्याच्या जोडीला शिकार, रानांतील माल म्हणजे मध, कात, गवत लांकूड वगैरे गोळा करून विकून पोट भरतात. हे जरी अरण्यांत असले

तरी गांवढयांशीं त्यांचें शतकानुशतकें साहचर्य आहे. "गांवाबर अवलंबून असलेले शिकारी" असें ह्यांचें वर्णन एका समाजशास्त्रज्ञानें केलें आहे. ह्यांत भिल्ल, वारली, ठाकूर, मल्हार कोळी, कोरकू, कोलाम व गोंड लोक येतात.

ह्यांतील बहुतेक जाती सर्वांच्या परिचयाच्या आहेत. पण कांहीं माहित नसण्याचा संभव आहे म्हणून खालीं अकारानुक्रमें सर्व जातींबद्दल अगदीं थोडक्यांत टिपण दिलेलें आहे. विशेष माहितीसाठीं मुंबई, मध्य-प्रांत व हैद्राबाद ( दक्षिण ) ह्या विभागांचीं गॅझेटियरें व एन्थोव्हेन (Castes & Tribes of Bombay Presidency), रसेल आणि हिरालाल ( Castes and Tribes of C. P.) आणि सिराज उल हुसेन ( Castes and Tribes of the Nizam's Dominions ) हीं पुस्तकें पहावीं. ज्या कांहीं जातींबद्दल वरील तीन पुस्तकांत माहिती नाहीं ती स्वतः लेखिकेनें मिळवलेली समजावी.

आगरी:—ह्यांना "आगळे" किंवा "खारपाटील" अशींहि नांवें आढळतात. १९०१च्या खानेसुमारींत त्यांची संख्या २,००,००० होती. ते मुख्यत्वें ठाणें, कुलाबा, व जंजिरा ह्या प्रदेशांत म्हणजे उत्तर कोकणांत रहातात. ते स्वतःस क्षात्रिय म्हणवतात. त्यांच्यांत मामाच्या मुलीशीं लग्न करण्याची चाल आहे. विधवेचें दिराशीं लग्न होत नाहीं. पूर्वी ते मीठ तयार करीत, पण हल्लीं शेती करतात व गिरण्यांतूनही कामावर आहेत. उत्तर कॅनरा जिल्ह्यांत अंकोला तालुक्यांत 'आगेर' ह्या नांवाची शेतमजुरी करणारी एक जात आहे. ती आगरीसारखीच आहे. मात्र ती आगरी-पेक्षांही मागासलेली दिसते. त्यांच्या स्त्रियांचा पोषाख कातकरी, वारली वगैरे स्त्रियांसारखा असून सबंध वक्षस्थळ रंगारंगाच्या मण्यांच्या माळांनीं झांकलेलें असतें.

आंध:—ही एक शेती करणारी व शिकारी जात आहे. त्यांची मुख्य वस्ती परभणी व नांदेड जिल्ह्यांचा उत्तर भाग व बुलढाणा, चांदा व वणी ह्यांचा दक्षिण भाग ह्यांत असलेल्या डोंगराळ प्रदेशांत आहे. ह्यांची संख्या ३००० पेक्षांही कमी होती ( १९०१ खानेसुमारी ). ते क्वचितच स्वतंत्र

शेती करतात.बहुतेक खंडानें करतात. दिसावयास वन्य जातींसारखे दिसतात. चांद्याच्या कांहीं भागांत इतर शेतकरी त्यांना जवळ जवळ अस्पृश्य समजतात. त्यांच्यांत आतेच्या किंवा मामाच्या मुलीशीं लग्न होतें. विधवेचें दिराशीं लग्न होत नाहीं. मृत लग्न झालेला असल्यास जाळतात; लग्न न झालेला असल्यास पुरतात.

कुणबी व मराठाः––समस्त कुणबी व मराठे मिळून महाराष्ट्रांतील जवळ जवळ निम्मी लोकसंख्या होते. हे सर्व शेतकरी आहेत व वऱ्हाड व मध्यप्रदेश येथील शेतकरी अजूनही आपणांस कुणबी म्हणवतात. क्वचित् क्षत्रियहि म्हणवतात. खानदेश, मराठवाडा, देश व कोकण येथील लोक स्वतःस मराठा म्हणतात. सुमारें पंचवीस-तीस वर्षांपूर्वींच्या खानेसुमारींत ह्या प्रदेशांतही कुणबी व मराठा अशा दोन जाती दिलेल्या आहेत. मराठा आपणांस क्षत्रिय म्हणवतात व त्यांच्यांतही रजपुतांप्रमाणें निरनिराळ्या उच्च-नीच कुळी आहेत. उच्च कुळींतील मराठे नीच कुळींतील मुली करून घेत, पण आपल्या मुली नीच कुळींत देत नसत. मराठ्यांचीं बरींच आडनांवें रजपूत कुलांच्या आडनांवांवरून घेतलेलीं वाटतात. उदा. मराठा चव्हाण, रजपूत चौहान; मराठा पवार, रजपूत परमार, इत्यादि. कांहीं महाराष्ट्रांतील जुन्या राजवंशांचीं द्योतक आहेत, उदा. शेळार ( शिलाहार ), कदम ( कदंब ), शिंदे ( सिंद ) इत्यादि. मराठे स्वतःला रजपूतवंशीय म्हणवतात. मराठ्यांचे व म्हणूनच महाराष्ट्राचे कांहीं दूरदर्शी पुढारी झाले व त्यांनीं कुळीच्या उच्चनीचतेवर उभारलेल्या ह्या समाजरचनेविरुद्ध जोराची चळवळ करून सर्वच शेतकरी समाजानें आपणांस मराठा म्हणवावें व कुणबी हें नांव टाकून द्यावें असा आदेश दिला. त्याचा परिणाम म्हणून खानेसुमारींतून कुणबी हें सदरच नाहींसें झालें व आतां सर्व श्रीमंत, गरीब, जमिनदार व शेतकरी सरसकट आपणांस " मराठा " म्हणवतात. ह्या म्हणविण्याबरोबर समाजांतील उच्चनीचता नाहींशी झालेली नाहीं व अजूनही कुळीचे मराठे कुणब्यांशीं शरीरसंबंध जोडण्यास नाखूष असतात. एका जातीला ' मराठा ' नांव कसें पडलें हा प्रश्नही विचारांत घेण्याजोगा आहे. पूर्वींचे यादव, शिलाहारादि राजवंश आपणांस

क्षत्रिय म्हणवीत. ‘ मराठा ’ हें नांव लावीत नसत. मोगल बादशहांच्या दक्षिणेच्या स्वाऱ्यांमध्यें ज्या लोकांनीं शौर्यानें त्यांना तोंड दिलें त्यांना देशवाचक ‘ मरहट्टे ’ असें नांव आढळतें. त्याप्रमाणें भोसल्यांच्या फौजा बंगाल्यांत गेल्या त्या मराठ्यांच्या नांवाचा दरारा बसवीतच गेल्या. उत्तरेकडे अजूनही मराठे हें नांव देशवाचक आहे. गांधीजींचा खून करणाऱ्या इसमाचें वर्णन उत्तरेकडच्या वर्तमानपत्रांतून व इंग्रजी वर्तमानपत्रांतून ‘एक मराठा तरुण ’ असें आल्यावरून इकडच्या मराठे मंडळींना फार वैषम्य वाटलें, हा इतिहास ताजाच आहे. कुणबी हें जातिवाचक नांव कणबी, कुर्मी, कुडमी अशा निरनिराळ्या रूपांत गंगाप्रदेशापासून महाराष्ट्रापर्यंत सर्वत्र दिसतें व तेंच जुनें आहे. महाराष्ट्रांतील कुणब्यांच्या मोगलाविरुद्ध स्वातंत्र युद्धानंतर कधींतरी ‘ मराठा ’ असें जातिवाचक नांव रूढ झालें असें दिसतें. अजूनही वऱ्हाड, नागपूर प्रांतांत तें रूढ नाहीं. निजामाच्या राज्यांतील ‘ मराठवाडा ’ हें प्रादेशिक नांव ‘ मराठा ’ जातीवरून पडलेलें नसून जेथली बोली मराठी तो मराठवाडा अशा अर्थानें पडलेलें आहे. मराठा जातींत मामेबहिणीशीं लग्नाचा प्रघात आहे. क्वचित् आतेबहिणीशीं करतात. पण तें गौण समजतात. विधवेचें लग्न दिराशीं होत नाहीं.

**वऱ्हाड नागपुराकडील कुणबीः**—( अ ) तिरोळे कुणबी नांव धारण करणाऱ्या बऱ्याच जाती ह्या प्रांतांत आहेत. पैकीं वऱ्हाड ते थेट वर्धा खोऱ्यापर्यंत तिरोळे ऊर्फ तिरळे कुणबी राहतात ह्या प्रांतांतील शेतकऱ्यांची हीच मुख्य मातबर व उच्च जात समजतात. इतर महाराष्ट्रांत मराठयांचें जें स्थान तें विदर्भात तिरोळे कुणब्यांचें आहे. ह्यांच्यांत मामेबहिणीशीं लग्न होतें. विधवेचें दिराशीं लग्न करण्याचा प्रघातही आढळतो. हल्लीच्या काळांत तो कमी होऊं लागला आहे.

( आ ) **माना कुणबीः**—ह्यांनाच ‘ मानवा ’ असेंहि म्हणतात. त्यांना ‘ कुणबी ’ म्हणावयास तिरोळे तयार नाहींत. ही एक लहान जात आहे व ती चांदा जिल्ह्यांत आढळते. हे बहुधा शेतकाम करतात व वंशपरंपरा एकाच मालगुजाराकडे राहतात. त्यांच्यांत कुळनांवें आहेत. एकाच कुळनांवाच्या माणसांचीं लग्नें होत नाहींत. मामेबहिणीशीं लग्न होत नाहीं म्हणून सांगतात, पण अधिक संशोधन केलें पाहिजे.

( इ ) खैरे कुणबी:—नागपूरचा पूर्व भाग व भंडारा जिल्हा ह्यांत हे लोक रहातात. ह्यांना समाजांत दर्जा 'मानबा' पेक्षां बरा दिसला. ह्यांनाही कुळनांवें आहेत व एका कुळींत लग्न होत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न होत नाहीं. विधवेचें दिराशीं लग्न होतें.

( ई ) धनोजे कुणबी:—धनोजे चांदा जिल्हा व वणी तालुक्यांत रहातात. ह्यांची सांपत्तिक व सामाजिक परिस्थिति खैरे व मानांपेक्षा बरी दिसली. आतेच्या वा मामाच्या मुलीशीं लग्न करीत नाहींत असें सांगतात. विधवेचें दिराशीं लग्न होतें. ह्याखेरीज झाडे कुणबी, बावने कुणबी वगैरे पोटजाती आहेत. पण त्यांचीं पुरेशीं मापें मिळालीं नाहींत. हे सर्व पूर्व नागपूर व भंडारा जिल्ह्यांत राहतात.

कोलाम:—ह्या जातीची लोकसंख्या सुमारें २५००० दिली आहे.त्यांतील २३००० यवतमाळ जिल्ह्यांतील वणी तालुक्यांत रहातात. उरलेले वर्धा जिल्हा व हैद्राबाद प्रदेशांत रहातात. हे एक द्राविड भाषा बोलतात. तिला कोलामी असेंच म्हणतात. ग्रिअर्सनच्या मतें गोंडी व कोलामी भाषेंत साम्य आहे, कांहीं बाबतींत ती भाषा तेलगू व कन्नड ह्यांचें पूर्वरूप दर्शवते असेंही म्हणतात. पण अजून संशोधन पुरेसें झालेलें नाहीं. कोलाम लोक आतां मराठीहि चांगलें बोलतात. बायका मराठी गाणींहि रचतात व म्हणतात. आतेच्या व मामाच्या मुलीशीं लग्न होतें. विधवेनें विधुराशींच लग्न केलें पाहिजे असा दंडक आहे. एकाद्या बाईला एकादा पुरुष आवडला तर ती त्याच्या घरांत शिरून बसते व त्याच्याबरोबर संसार करूं लागते. ह्याच प्रकार एलविननें गोंडांबद्दल नमूद केलेला आहे. (आपल्या मराठी वाङ्मयांत "घरघुसी-शी" असा शब्द ज्ञानेश्वरांपासून सांपडतो. तो असल्याच प्रघाताचा तर द्योतक नसेल ना ?) कोलाम लोकांचें एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांची वसती. ते ज्या जमिनदाराकडे रहातात त्याच्याकडून वसतीसाठीं जमीन मागून घेतात. ही बहुधा डोंगराजवळ असते. नंतर त्यांचा मांत्रिक चार दिशांना खुंटे ठोकून सीमा ठरवतो व आंत ओळी आंखून घरांची जागा ठरवून देतो. मध्यभागीं मोठ्या चौकांत जमातीचें सभागृह असतें. इतकी स्वच्छ, योजनाबद्ध आंखणी मी अजून

कोणत्याही ठिकाणीं पाहिली नाहीं. अशी पद्धत सर्व कोलमांची आहे असें मला सांगण्यांत आलें. कोलाम भातशेती उत्तम करतात.

कोळीः—कोळी हें नांव बऱ्याच निरनिराळ्या जमातींना आहे. त्यांतील कांहीं (सोनकोळी) समुद्रावर मासे धरतात, कांहीं डोंगरावर थोडी शेती करतात व नद्यांतून मासे धरतात, कांहीं वन्य जातींत जमा होतात. गुजरातेंतही कोळी नांवाचे लोक मासे पकडतात व शेतीहि करतात. उत्तर हिंदुस्थानांतील इतर प्रांतांतून मत्स्यजीवी जातींना मच्छी, केवट (कैवर्त) मल्ला, ढीवर अशीं नांवें आढळतात. तीं संस्कृत वाङ्मयांतही आढळतात. पण कोळी म्हणजे मत्स्यजीवी ह्या अर्थी शब्द सांपडत नाहीं. 'कोल्ल' म्हणजे नीच वा क्षुद्र योद्धे (?) असा अर्थ शब्दकोशांत सांपडतो, त्यावरून तें पूर्वीपासून विशिष्ट जनदर्शक, जमातदर्शक नांव असावेंसे दिसतें; (छोटा नागपूरमध्यें कोळ नांवाची मोठी वन्य जमात आहे.) व ह्या लोकांनीं निरनिराळे धंदे स्वीकारले असावे असें वाटतें. ह्यांपैकीं सह्याद्रीच्या माथ्यावरील कोळी उर्फ डोंगरी कोळी, त्याचप्रमाणें खानदेशांतील तापी कांठचे कोळी हे थोड्या प्रमाणांत मासे धरतात, कांहीं शेती करतात व ब्रिटिश राज्याआधीं व नंतरही धाडसी लुटारू म्हणून प्रसिद्ध होते. ते सहसा गरिबाच्या वाटेस जात नाहींत. मराठ्यांच्या राज्यांत किल्ल्याच्या भोंवती ह्यांचीं मेटीं असत व ते किल्ल्याचे रक्षणकर्ते होते. ही मूळ महाराष्ट्रांतली वन्य जात असावी असें कांहींचें मत आहे. त्यांचीं आडनांवें मराठ्यांसारखीं आहेत. आतेच्या व मामाच्या मुलीशीं लग्न होतें.

कोळी-मल्हारः—ही ठाणें जिल्ह्यांत रहाणारी एक वन्य जात आहे. सध्यां हे लोक वंशपरंपरा बांधील नोकर म्हणून इतर शेतकऱ्यांकडे वा जमीनदारांकडे राबतात. ह्यांतील कांहीं जंगल तोडून स्वतंत्र शेतीही करतात. शेतीच्या जोडीला पारध हाही त्यांचा एक पोटाचा धंदा आहे. त्यांचें घरें बांधण्याचें कौशल्य वाखाणण्यासारखें आहे. त्यांचीं आडनांवें वारली व कातकऱ्यांतही आढळतात. इतर वन्य जातींपेक्षां ह्यांचा सामाजिक दर्जा जरा वरचा आहे. मामे व आतेबहिणीशीं लग्न होतें. ते वारल्यांसारखीच भाषा बोलतात.

कोरकूः—ही मुंड लोकांपैकींच एक वन्य जात आहे. सातपुड्याच्या पठारावर, क्वचित वऱ्हाडच्या खोऱ्यांत व भोपाळ प्रांतांत ह्या लोकांची वस्ती आहे. हे लोक एक स्वतंत्र भाषा बोलतात. ती छोटा नागपूरमधील कोळ लोकांसारखी आहे. छोटा नागपूरमध्यें कोरवा म्हणून एक वन्य जमात आहे तीही 'कोरकू' भाषा बोलते. ह्यावरून दोन्हीही जमाती मूळ एक असाव्यासें वाटतें. हल्लीं मात्र छोटा नागपूरचे कोरवा व वऱ्हाडांतील कोरकू ह्यांमध्यें गोंडांच्या वसाहती आहेत. जमात निरनिराळ्या कुळांत विभागलेली आहे. एका कुळांत लग्न होत नाहीं. घरघुशीची चाल ह्यांच्यांतही दिसून येते. थोरल्या भावाची विधवा स्वतःच्या बायकोची थोरली बहीण असेल तर तिच्याशीं लग्न होत नाहीं, एरवीं हरकत नाहीं. महाराष्ट्रांत त्यांची भाषा बोलणारी दुसरी जात नाहीं. मुंड लोकांपैकीं सर्वांत पश्चिमेकडे आलेले लोक कोरकू होत.

कोहाळीः—ही एक शेतकी व बागायत करणारी जात आहे. वर्धेच्या पूर्व थडीवर व वैनगंगेच्या खोऱ्यांत ह्यांची मुख्यत्वें वस्ती आहे. १९११ च्या खानेसुमारींत त्यांची लोकसंख्या २६००० दिलेली आहे. हे तांदूळ व ऊंस पिकवतात. त्यांचीं घरें चांगलीं दगडी व भक्कम बांधलेलीं अशीं असतात. घरांत मुख्यत्वें खाटांवर निजतात. आम्ही पांचदहा जणें अपरात्रीचे पाहुणे म्हणून गेलों असतांनाही सर्वांना खाटा मिळाल्या. बायकांचें नेसणें धड मराठी नाहीं, धड हिंदी नाहीं असें आहे. पुरुष हकड्यासारखें धोतर नेसतात, रुमाल बांधतात व शुद्ध मराठी भाषा बोलतात. वैनगंगेच्या सपाट खोऱ्यांत जे लहानमोठे तलाव खोदले आहेत, ते सर्व ह्या लोकांनीं खोदले असें रसेल सांगतो. तळ्याच्या पाण्यावर तांदूळ व ऊंस पिकवतात. ह्यांना एका गोंड राजानें बनारस ( काशी ) हून आणलें अशी आख्याइका ते सांगतात. त्यांचीं कुळनांवें चमत्कारिक असतात. उदा. हटवादे ( हट्ट करणारे ), मुंगुसमारे, पुसतोंडे ( शेपूट कापणारे ), शहरे, वगैरे. सर्व नांवें कांहीं तरी घटनेवरून पडलेलीं दिसतात. महाराष्ट्रांतील इतर शेतकऱ्यांप्रमाणें वनस्पति, जनावरें वगैरेंवरून पडलेलीं आडनांवें त्यांच्यांत नाहींत हें त्यांच्या उत्तर प्रांतीयत्वाचेंच लक्षण दिसतें. कोहळी अनेक बायका

करतात व प्रत्येकीला निरानिराळें घर बांधून देऊन निरानिराळें काम वाटून देतात. नवें शेत विकत घेतलें कीं कोह्ळी नवी बायको पहातो अशी प्रथा आहे. त्यामुळें जमातींत स्त्रियांचा तुटवडा आहे व नवरीसाठीं देजही बरेंच द्यावें लागतें. विधवांना मागणी भरपूर असते व त्यांचें लग्न नेहमीं होतें. हे फार मेहनती व हुषार शेतकरी आहेत. त्यांनीं बांधलेलीं तळीं म्हणजे भंडारा जिल्ह्याच्या सृष्टीचें एक वैशिष्टय झालें आहे. कित्येक तलाव तर खूप मोठे आहेत. नवेगांवच्या तलावाचा परीघ १७ मैल आहे. बारकीं तळीं तर हजारांनीं आहेत. प्रत्येक कुटुंब स्वतःच्या शेतावरच्या उसाचा गूळ करतें. गूळ करण्याची पद्धतही आपल्याकडच्यापेक्षां निराळी आहे. संध्याकाळीं रसाची भट्टी लावतात. रस उकळला म्हणजे एक मनुष्य प्रथम पाण्यांत भिजवलेला हात रसांत घालून रस बरोबर झाला कां तें पहातो. मग काहील उतरतात व जरा थंड होते न होते तों घरची बायका मंडळी, पोरेंसोरें सर्व बसून घेववेल तेवढा गोळा हातांत घेऊन मुठींत घट्ट आवळून चटईवर टाकतात. ह्यांना बट्ट्या म्हणतात. ऊंस लावणें, तांदूळ लावणें, गूळ करणें, सगळीं कामें होतां होईतों घरच्या बायकामुलांच्या मदतीनें पार पाडतात. फार गडी ठेवीत नाहींत. कोहाळी हे बहुधा " कोयरी " ह्या उत्तरप्रांतीय शब्दाचें मराठी रूप असावें. उत्तर प्रांतांत व बिहारमध्यें कोयरी नांवाचा वर्ग आपल्या इकडील माळ्यासारखा आहे. तेच बहुधा हे कोहाळी असावेत.

खत्रीः—हा शब्द क्षात्रिय ह्या शब्दाचा अपभ्रंश आहे. पण दूरवर पसरलेली ही जात सर्वस्वीं व्यापार करणारी आहे. पंजाबांत खत्री अति हुषार व्यापारी जमात आहे. गुजराथेंत ब्रह्मक्षत्री व्यापार ( विशेषतः रेशमाचा व्यापार ) करतात. महाराष्ट्रांतही ब्रह्मक्षत्री असून तेही पूर्वी रेशमाचा व्यापार करीत. कर्नाटकांत क्षत्री उर्फ ब्रम्हक्षत्री स्वतःस पटवेगार म्हणवतात व रेशमाचे गोंडे बनाविणें वगैरे कामें करतात. मुंबईची खत्री जात लहान आहे. ती कोठून आली ह्याबद्दल त्यांना कांहीं माहिती नाहीं. पूर्वी व्यापार करीत असत पण हल्लीं नोकरी, वैद्यकी, शिक्षक, वगैरे

मध्यमवर्गीयांचे व्यवसाय करतात. त्यांच्यांत आतेच्या व मामाच्या मुलीशीं लग्न होत नाहीं. सर्व रहाणी सुशिक्षित मध्यमवर्गीयांसारखी आहे.

गुजरः—हिंदुस्थानच्या इतिहासांत मोठें नांव गाजविलेली व हिंदुस्थानांत लांबवर पसरलेली ही एक जमात आहे. त्यांच्या नांवावरूनच कांहीं प्रादेशिक नांवें पडलेलीं दिसतात. गुजरात प्रांत, पंजाबमधील गुजरांवाला गांव व गुजरात जिल्हा आणि ग्वाल्हेर राज्यांतील गुजरगड हीं नांवें त्या लोकांच्या वास्तव्यावरून आलीं असावीं असें वाटतें. मध्यप्रांतांत नेमाड व हुशंगाबाद जिल्ह्यांत गुजर लोक रहातात. पंजाब, दिल्ली, रजपुताना ह्या सर्व प्रांतांतून गुजरांची मोठी वस्ती आहे. कनौजचे गुर्जर प्रतिहार ह्या गुजरांपैकींच असावे. मापें घेतलेल्या एका कुटुंबानें बरेच आढेवेढे घेऊन आपलें आडनांव पढयार म्हणून सांगितलें. तें उघड उघड "प्रतिहार" शब्दापासूनच आलेलें दिसतें. ही जमात मूळ भटक्या टोळ्यांपैकीं असावी. जुन्या दिल्लीला निजामउद्दीन अवलिया ह्या मुसलमान संतानें शाप दिला कीं, " ही राजधानी उजाड ( उजर ) तरी राहील किंवा फार तर गुजर वस्ती करतील. " अशी एक दंतकथा आहे. ( " या बसे गुजर या रहे उजर " ). दिल्ली प्रांतांत जाट व गुजर आज शेतकी करतात, पण जाटांच्या जमिनी उत्तम व सकस तर गुजरांच्या फार कनिष्ट प्रतीच्या अशी माहिती श्री. आनंद मोहन शर्मा यांच्या निबंधांत दिली आहे. आजही गुजरांचा म्हणून निराळा प्रदेश दिल्ली प्रांतांत दाखवतां येतो. मोगल राजांच्या वेळीं दिल्ली शहराबाहेर राहून गुजर रोज दूधदही विकण्यासाठीं शहरांत येत असा उल्लेख "गुजरात तथा काठियावाड देशनी वार्ताओ भा. १ ला" मध्यें सांपडतो. महाराष्ट्रांत सोलापुरांत जैन गुजर लोकांची वस्ती आहे. खानदेशांत सातपुड्यानजीक बरीच गुजर खेडेगांवें आहेत. गुजरांमध्यें एकमेकांशीं लग्न न करणाऱ्या रेवा ऊर्फ लेवा गुजर, बड गुजर अशा जाती आहेत. ह्यांच्यांमध्यें आतेमामेभावंडांचें लग्न होऊं नये असा दंडक आहे. पण हल्लींच्या काळांत तसें एक लग्न झालें व जमातीची पंचायत भरून तिनें देशाचार म्हणून त्याला संमति दिली, अशी माहिती खानदेशांत कळली. हे लोक सध्यां शेती करतात पण शेतीपेक्षांही

गुरें पाळणें त्यांना फार प्रिय आहे. महाराष्ट्रांतील गुजरांत विधवेचें लग्न दिराशीं होत नाहीं. पण रसेलनें असें दिलें आहे कीं, उत्तर प्रदेशांतील बुलंदशाही जिल्ह्यांत विधवा बाईचें लग्न अविवाहित धाकट्या दिराशीं होतें. मराठ्यांच्या सरदार घराण्यांपैकीं 'गुजर' कुळ इतिहासांत प्रसिद्ध आहे.

गुरवः—हे शिवाच्या देवळांतील पूजक असतात. ते अब्राह्मण समजले जातात. त्यांच्यांत बऱ्याच पोटजाती आहेत. त्यांपैकीं शैव गुरव श्रेष्ठ समजतात व त्यांचींच मापें ह्या पहाणीसाठीं घेतलेलीं आहेत. पूर्वी देवापुढें ठेविलेल्या पैसा तांदुळावर व जमिनीवर ते गुजारा करीत. हल्लीं ते नोकरी धंदा करतात. मामे बहिणीशीं लग्न होतें. नवऱ्याचा हुंडा व नवरीचें देज असें दोन्ही देण्याची पद्धत आहे. काडीमोड व विधवाविवाह होतो, पण विधवेचें लग्न दिराशीं होत नाहीं. शिवाखेरीज खंडोबा व भवानी ह्या दैवतांचीहि ते पूजा करतात. मद्य व मांस खात नाहींत.

गोंडः—ही हिंदुस्थानांतील एक महत्त्वाची, संख्येनें मातबर व मोठ्या प्रदेशांत पसरलेली वन्य जमात आहे. १९११ च्या खानेसुमारींत त्यांची संख्या तीस लाख दिलेली आहे. गोंडांच्या दोन प्रादेशिक शाखा आहेत. एक शाखा सातपुड्याच्या रानांत व डोंगरांत रहाते व मुख्यत्वें छिंदवाडा, बेतूल, शिवणी व मांडला येथें आढळते. दुसरी शाखा छत्तिसगडच्या पठाराच्या दक्षिणेकडील निबिड अरण्यें व दुर्गम पर्वतप्रदेश ह्यांत आढळते. छत्तिसगडांतील तीन जिल्हे, दातार व काकेर हीं संस्थानें, चांदा जिल्हा व हैद्राबादेंतील अदिलाबाद विभाग व दक्षिण ओरिसा येथें त्यांची मुख्य वस्ती आहे. तरीही मध्यप्रांतांत गोंडांची वस्ती नाहीं असा एकही जिल्हा नाहीं. गोंड हें नांव त्यांना इतरांनीं दिलेलें आहे. ते स्वतःस कोयी अथवा कुयी म्हणवतात, ते कोलाम व खोंड लोकांशीं वंशानें व भाषेनें संलग्न आहेत असें समाजशास्त्रज्ञांचें मत आहे. ते बाराव्या शतकांत दक्षिणेकडून पूर्व महाराष्ट्रांत आले व त्यांनीं मोठालीं राज्यें स्थापिलीं, पण मोगल आणि मराठ्यांपुढें त्यांचा टिकाव लागला नाहीं. गोंडांची राणी दुर्गावती हिचें नांव सर्व महाराष्ट्रीयांना परिचित आहेच. जबलपूरजवळील मदनमहाल

तिनेंच बांधवला. मोठमोठ्या भिंती, तलाव, नाना तऱ्हेच्या पाषाणमूर्ति आजही गोंडांच्या पूर्वीच्या राजधान्यांतून त्यांच्या एकेकाळच्या वैभवाची साक्ष देतात. आजही अहिरी जमीनदारीचे गोंड जमीनदार हुषार व सुसंस्कृत म्हणून प्रसिद्ध आहेत, पण एकंदर जमात मात्र पारध व थोडीशी शेती करणारी, रानावनांत रहाणारी वन्य जात म्हणून जीवन कंठीत आहे. ह्यांच्या कांहीं सामाजिक चालीरिती ऑस्ट्रेलियन जमातीसारख्या आहेत असें समाजशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. उदा. त्यांच्यांत आजोबाचें नातीशीं लग्न होतें असें संशोधक सांगतात. पण ह्या बाबतींत अधिक संशोधन झालें पाहिजे, कारण अशा तऱ्हेचें लग्न द्राविडांत होतें हें मी नुकतेंच दर्शविलें आहे. ( Bulletin of the Deccan College Postgraduate and Research Institute, 1950 ) दिराशीं विधवा भावजईचें लग्न सात-पुड्यांतील गोंडांत होतें. चांदा व आदिलाबाद येथील गोंड लोक तशी आमची चाल नाहीं म्हणून सांगतात. दिराशीं एरवींसुद्धां प्रेमाचें नातें असतें अशाबद्दलचीं सातपुड्यांतील गोंडांचीं गाणीं प्रसिद्ध संशोधक दुर्गा-बाई भागवत ह्यांनीं जमवून प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांच्यांतील एक विशेष चाल म्हणजे लग्न न झालेलीं, पण वयांत आलेलीं मुलें ( मुलगे व मुली ) गांवांत एका मोठ्या घरांत एकत्र रहातात व एकत्र झोपतात. ह्याच मैत्रींतून पुढें सहचर वा सहचरी निवडून लग्न होतें. पुष्कळदां गरीब गोंड मुलगा बायको मिळावी म्हणून कांहीं वर्षें भावी सासऱ्याकडे काम करावयास राहतो व कामाच्या मोबदल्यांत बायको मिळवितो. त्याला लांबडा किंवा लामेटा म्हणतात. मराठी वाक्प्रचार 'बायकांत पुरुष लांबडा, भाजून खातो कोंबडा' ह्याचा वरील चालीशीं संबंध आहे काय न कळे. गोंडांच्या मुलखांत मांडला, चांदा, वगैरे भागांत " फळ " प्रत्यय अस-लेलीं ग्रामनांवें बरींच आढळतात. उदा. मोकफळ, शेटफळ वगैरे. अशीं नांवें तुरळक तुरळक परभणी, औरंगाबाद व नगर जिल्ह्यांतही आढळतात. त्याचप्रमाणें पुणें जिल्ह्याच्या पूर्व विभागांत " शेटफळ " व " गटेफळ " अशीं दोन गांवें आहेत. ह्यावरून गोंड किंवा तत्सम लोक महाराष्ट्रांत इतक्या पश्चिमेपर्यंत आले असावे किंवा कसें हें कळत नाहीं. हे लोक पूर्व-जांची व दुल्हा देवाची पूजा करतात. अंगावर गोंदतात.

गोवारीः—म्हणजे गुरें सांभाळतात ते लोक. हे नागपूर प्रांतांतले गुराखी लोक आहेत. मात्र गाई-बैलांपेक्षां ते म्हशीच जास्त बाळगतात असें दिसतें. १९११ मध्यें त्यांची संख्या दीड लाख होती. त्यांच्यांत गायगोवारी, इंगागोवारी व गोंडगोवारी असे तीन पोटभेद आहेत. इंगा असें कुळनाम छोटा नागपूरच्या वन्य लोकांतहि आढळतें गोवारी लोक गोंड व इतर वन्य जमातींच्या मिश्रणाचे असावेत असें वाटतें. त्यांचीं पुष्कळ कुळें आहेत. एकाच कुळांत लग्न होत नाहीं. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. विधवेचें दिराशीं लग्न होतें. एकाद्याला मुलगा नसेल तर त्याचें धन बहिणीच्या मुलाला मिळतें. ह्या व इतर कांहीं चालींवरून ह्या लोकांत पूर्वी मातृप्रधान कुटुंबव्यवस्था असावी असें रसेलचें मत आहे. हे पूर्वजांची व दुल्हा देवाची पूजा करतात व आंगावर गोंदतात.

चांभारः—ही महाराष्ट्रांत पूर्वी अस्पृश्य गणल्या जातींपैकीं एक आहे ह्यांची लोकसंख्या एक लक्ष दिलेली आहे. महार व मांग ह्यांना धंदेवाईक परंपरागत असें कसब नाहीं व तें ह्या जातीला आहे. कमावलेल्या चामड्याचे जिन्नस करणें हें त्यांचें काम, कातडें कमावण्याचेंही काम हे लोक करतात. पायतणें करणारे चांभार कातडें कमावणाऱ्यांपेक्षां श्रेष्ठ समजले जातात. मामेबहिणीशीं लग्न होतें. मद्य, मांस भाक्षिण्याची चाल आहे, पण ते मृतमांस व गोमांस खात नाहींत.

ठाकूरः—यांचें वर्णन श्री. चापेकरांनीं पश्चिम महाराष्ट्राचे डोंगरपठाराचे शेतकरी असें केलें आहे. ही पश्चिमेकडची एक वन्य जात आहे व नाशिकपासून कुलाब्यापर्यंत पसरलेली आहे. डोंगरपठारावर वस्ती करून ते रहातात व पठारावरच पावसाळी शेती करतात. ह्याशिवाय शिकार करणें व जंगलाचा माल ( गवत, लाकूड, मध वगैरे ) विकणें हेंहि ते करतात. त्यांच्यांत क ठाकूर व म ठाकूर असे दोन पोटभेद आहेत. 'क' व 'म' चा अर्थ त्यांनाही ठाऊक नाहीं, व इतरांनाही कळत नाहीं. आपण मूळ रजपूत असून महमुद बेगडाचे वेळीं गुजरातेंत पळून आलों असें ते सांगतात. गुजरातेंत स्वतःस रजपूत म्हणवणारे पण कनिष्ठ नोकरी करणारे भटके व शिकारी ठाकरडा म्हणून लोक आहेत तशाच पैकीं ही एखादी मिश्र वन्य

जात असावी असें दिसतें. बाया पदर घेत नाहींत. फक्त चोळी घालतात व मण्यांच्या खूप माळा घालतात. त्यांच्यांत निरनिराळ्या कुळीं व देवकें आहेत व एकाच देवकांत लग्न होत नाहीं. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. आतेच्या मुलीशीं नाहीं. पुष्कळदां स्त्रीपुरुष लग्नाशिवाय एकत्र राहून संसार करतात व मग कधीं जमेल त्याप्रमाणें मुलेंबाळें झाल्यावरहि लग्नाचा विधी उरकतात. ही चाल वारली व भिल्ल लोकांतहि आढळते. ह्यांचीं नांवें व आडनांवें कातकऱ्यांसारखीं व कुणब्यांसारखीं आहेत. पण कांहीं थोडीं गुजराती नांवें, विशेषतः स्त्रियांत आढळतात.

तेलीः—ही जात सर्व महाराष्ट्रभर पसरलेली आहे. मीं घेतलेलीं मापें नागपूर व खानदेशांत घेतलेलीं आहेत. त्यांच्यांत प्रादेशिक व इतर पोट-विभाग पुष्कळ आहेत व त्यांत एकमेकांत लग्नें होत नाहींत. खानदेशचे तेली आपणांस चौधरी म्हणवतात. त्यावरून ते उत्तरेकडचे असावे असें वाटतें. मामेबहिणीशीं लग्न होतें. क्वचित् आतेबहिणीशींहि होतें. विधवेचें दिराशीं लग्न होत नाहीं.

त्वष्टा कासारः—ह्यांचा परंपरागत धंदा तांबें, पितळ व काशें ह्या धातूंचीं भांडीं घडवणें हा आहे. ह्यांच्या कामांत कसब आणि शक्ति दोन्ही-चीहि जरूरी लागते. एकेकाळी आपणांस ब्राह्मण म्हणवून घेण्याची ह्या जमातीची फार इच्छा होतीसें दिसतें व ते आपणांस विश्वकर्मा म्हणवीत. हल्लीं तें नांव कोणी सांगितलें नाहीं. ही जात नागर जात आहे व हल्लीं पश्चिम महाराष्ट्रांतील सर्व शहरांत आढळते. परंपरागत धंद्याखेरीज सराफी, नोकरी पेशा, डॉक्टरी, वकिली वगैरे धंदेही ते करतात. मामे बहिणीशीं लग्न होतें. मद्य व मांस भक्षण करण्याचा प्रघात पूर्वीपासून आहे. विधवेचें सहसा पुनर्लग्न होत नाहीं.

धनगरः—ही शेळ्यामेंढ्या राखणारी जात सर्व महाराष्ट्रभर पण त्यांतूनही विशेषतः दक्षिण महाराष्ट्रांत पसरली आहे. ह्यांची लोकसंख्या सुमारें पांच लाख असावी. दन(धन) हा कानडी शब्द गुरूं ह्या अर्थी आहे. उत्तर कर्नाटक व तेलंगण येथें असलेल्या कुरुबा जातीशीं ह्यांचें साम्य वाटतें. ह्यांचा पोषाख म्हणजे वर अंगरखा व खालीं तिकोनी लंगोटी

असा असतो. वरून पुष्कळदां वेष्टीसारखें घोतर गुंडाळलेलें असतें तेंही गुडघ्यावर घेऊन खोचलेलें असतें. कांहीं धनगर काचा घालूनही धोतर नेसतात. ह्यांचा देव खंडोबा. खंडोबाची एक बायको धनगराची होती असें म्हणतात. हे लोक तिला दगडाच्या घडवलेल्या किंवा मातीच्या मेंढया वहातात. जेजुरीच्या देवळांत अशा मेंढयांचा ढीग पडलेला असतो. इतिहाससंशोधक मंडळाच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या लोक-गीतांची सुरवात " मेघराय पिता व धरतरी माता " ह्यांच्या नमनापासून झालेली आहे. मेंढया बाळगणें, लोकर कापणें, कांतणें व घोंगड्या विणणें आणि बुरणुसाचे गालिचे बनविणें हीं कामें हे लोक करतात. मामेबहिणीशीं लग्न होतें. भाचीशीं होतें कीं नाहीं त्याची महाराष्ट्रीय धनगरांत चौकशी करावयास पाहिजे. धनगरांत बऱ्याच पोटजाती आहेत व त्यांचें एक-मेकांत लग्न होत नाहीं. पैकीं खुटेकर धनगर व हाटकर धनगर अशा दोन पोटजातींचीं मीं मापें घेतलीं आहेत. खुटेकर धनगर महाराष्ट्रांत सर्वत्र आहेत व ते वर सांगितलेलीं कामें करतात.

**हाटकर धनगरः**—हे फक्त मराठवाडा व वऱ्हाड ह्यांच्या सरहद्दीवर नांदेड व परभणी जिल्ह्यांत आढळतात. ते स्वतःला नाईक अथवा राव म्हणवतात. ह्यांना बारगी धनगर असें म्हणतात. मराठयांच्या राज्यांत हे चांगले लढवय्ये म्हणून नांवारूपास आले. वरील प्रदेशांत किल्ल्यांच्या व गढयांच्या आश्रयानें राहून इंग्रजी राज्यांतही त्यांनीं मोठा पुंडावा मांडला होता. तो सैन्याच्या मदतीनें मोडून काढावा लागला. पूर्वी ते दाढया राखीत. मामेबहिणीशीं लग्न होतें. सर्व धनगरांप्रमाणें विधवेचें पुनर्लग्न होतें. खंडोबा कुलदैवत असतें.

**ढीवरः**—अथवा धीमार, पूर्व महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. पश्चिम महाराष्ट्रांत कोळी व भोयी ह्यांचें जें स्थान तेंच पूर्वेला ढीवरांचें. हे लोक नद्यांतून, तळ्यांतून मासे धरतात. शिंगाडे काढून विकतात, मशाल धरतात व पालखी वहात असत. रसेलच्या म्हणण्याप्रमाणें ते दुल्हा देवाची पूजा करतात व डुकर बळी देतात. ह्यावरून ते मूळ वन्य जातींपैकीं असावेसें दिसतें. ह्यांच्यांत आतेच्या व मामीच्या मुलीशीं लग्न होत नाहींसें दिसतें. लग्न

झाल्याशिवाय एकत्र रहाण्याचा प्रघात आहे. कधींतरी एकदां मोठा लग्न-समारंभ होतो, त्यावेळीं आजोबा, मुलें, नातवंडें, सगळीं लग्न उरकून घेतात. मरायच्या आधीं कधींतरी लग्न झालें पाहिजे असा समज आहे. विधवेचें पुनर्लग्न होतें. ह्यांचा सामाजिक दर्जा कनिष्ठ असला तरी ते कुठेंही अस्पृश्य नाहींत व त्यांनीं वाहिलेलें पाणी सर्व जातींना चालतें.

न्हावीः—जातीचा परंपरागत धंदा हजामत करणें. पण इतरहि पुष्कळ कामें ते करतात. सोलापूर आणि मराठवाडा प्रदेशांत त्यांना "बारिक" म्हणतात. वऱ्हाडांत "महाली" म्हणतात. न्हावी बहुधा बलुतदारांत असतो. पूर्वींच्या काळीं खानदेशांत मोठमोठ्या मराठा लोकांचें लग्नांत न्हावी वाढप करीत असें एन्थोव्हेन म्हणतो. न्हावी गळवें कापणें, रक्त काढणें, जळवा लावणें, वगैरे शस्त्रवैद्यकही थोड्याबहुत प्रमाणांत करीत. न्हाव्यांच्या स्त्रिया बाळंतपणें करण्यांत हुषार असतात. गुजरात व उत्तर हिंदुस्थानांत लग्न जमविणें, आमंत्रणें देणें व दुखवट्याची बातमी पोचविणें हीं कामें न्हावी करतात. नाई ( न्हावी ) नसला तर लग्नच जमणें कठीण अशी परिस्थिति पूर्वी होती. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. विधवा-विवाह कांहीं पोटविभागांत होतो, कांहींत नाहीं. न्हाव्याच्या हातीं सर्व जातींचें डोकें असल्यामुळें व सर्वांशीं त्यांचा निकटचा संबंध येत असल्या-मुळें ही जात मोठी हुषार व सर्वांचीं वर्मे माहित असलेली अशी असते असा तिचा प्राचीन काळापासून लौकिक आहे व सर्व भारतीय भाषेंतील ( संस्कृत पाली धरून ) न्हाव्याच्या गोष्टी एकत्र केल्या तर मोठा ग्रंथ होईल.

परीटः—परिटालाच वऱ्हाडांत वरठी असें म्हणतात. ह्यांची वस्ती सर्व महाराष्ट्रभर आहे. कांहीं खेडेगांवांतून परिटांना बलुतें मिळतें. ह्यांचें सामाजिक स्थान बरेंच कनिष्ठ आहे. मामेबहिणीशीं लग्न होतें. विधवेचें पुनर्लग्न होतें, पण तिनें पहिल्या नवऱ्याच्या कुळांत लग्न करतां कामा नये असा दंडक आहे.

प्रभूः—प्रभूंमध्यें कायस्थ व पाठारे असे दोन पोटभेद आहेत. प्रभू हा एक मुलकी हुद्दा आहे. प्रभू हें आडनांव दक्षिणेकडे सारस्वतांतही

आढळतें. जमाखर्च, वसुली वगैरे खात्यांवर काम करणारे व देखरेख करणारे ते प्रभू.

( अ ) कायस्थ प्रभू आपणामागें चांद्रसेनीय असें उपपद लावतात. त्याचा अर्थ काय तें कळत नाहीं. कायस्थ हें उपपद मात्र फार अर्थबाही आहे. हिंदुस्थानांत प्राचीन काळापासून कायस्थ म्हणून लोकांची जात होती. शिलालेख लिहिणें, खत—पत्रें लिहिणें वगैरे कामें ते करीत. त्यांचें अक्षर सुवाच्य असे ह्याची ग्वाही मुद्राराक्षस नाटकांत चाणक्याच्या तोंडून देववली आहे. कायस्थ जात सबंध उत्तरभारतांत पसरलेली आहे. पंजाबपासून तो बंगालपर्यंत कायस्थ आज सर्वांत सुशिक्षित व पुढारलेला समाज म्हणून लौकिक मिळवून आहे. ह्यांच्या हातीं लेखणी असल्यामुळें सर्व गांवच्या व मुलखाच्या नाड्या त्यांचे हातीं असत व निरक्षर समाजांत ह्या अलौकिक शक्तीचा दुरुपयोग होत असे. महाराष्ट्रांतील कायस्थ नुसते आपल्या लेखणीनेंच नव्हे तर शौर्यानें व स्वामीभक्तीनेंही मराठी राज्यांत गाजले आहेत. पश्चिम महाराष्ट्रांत मुंबई व ठाणें येथें ह्यांचें मुख्य वास्तव्य आहे. हे मद्य व मांस भक्षण करतात. स्वतःस क्षत्रिय म्हणवितात. मामे-बहिणीशीं लग्न होतें. विधवापुनर्विवाह होत नाहीं. बहुतेक लोक पांढर-पेशे धंदेवाईक आहेत, पण मावळांत कांहीं शेती करतांनाहि आढळतात. ही शेती बहुतेक इनाम मिळालेली असते.

( आ ) पाठारे व पाठारे क्षात्रिय ही एक खुद्द मुंबई शहर व त्या भोवतालचीं उपनगरें ह्यांत आढळणारी लहानशी जात आहे. पाठारे क्षात्रिय ही त्यांच्यांतून भांडून वा फुटून निघालेली जात आहे. लोकवस्ती सुमारें ४०००. ह्यांचा उल्लेख महिकावतीच्या बखरींत पहिल्यानें येतो. अव्वल इंग्रजींत प्रसिद्धीस आलेली व भरभराटलेली ही एक जमात आहे. सर्व लोक पांढरपेशे धंदेवाईक आहेत. सर्व समाज सुशिक्षित आहे. वृत्ति खर्चिक व षोकिन असल्यामुळें गेल्या पिढीची कमाई आज टिकून राहि-लेली दिसत नाहीं.

पोवार—ह्यांना पुवार, पवार वा परमार रजपूत अशींहि नांवें आहेत. पश्चिम महाराष्ट्रांत ह्या नांवाची एक मोठी कुळी मराठ्यांत आहे. पण

पूर्व महाराष्ट्रांत ह्या नांवाची एक सबंध जात आहे. परमार रजपूत माळ-व्याचे राजे होते व त्यांची राजधानी धार ही होती. ११९० मध्यें शहा-बुद्दीन घोरीनें " धार " चा पाडाव केला व तेव्हां पवार मध्य हिंदुस्थानांत व नागपूर प्रांत येथें पसरले. त्यांची मुख्य वस्ती वैनगंगेच्या खोऱ्यांतील तांदुळाचें पीक निघणाऱ्या प्रदेशांत आहे. पुरेशा स्त्रिया नसल्यामुळें इतर जातींतून त्यांनीं स्त्रिया घेतल्या अशी त्यांच्यांत आख्यायिका आहे. त्यांच्यांत गोंड, ढीवर वगैरे जातींच्या स्त्रिया कुणबिणी म्हणून ठेवण्याचा प्रघात होता. त्यांची संतति स्वतःस पवारच म्हणवी. त्यांच्यांत कांहीं कुळ-नांवें " कोरकू " "भोयर " " कोहाळी " अशीं आहेत. त्यावरून वरील विधानाला पुष्टि मिळते. गरीब मुलाला भावी सासऱ्याकडे नोकरी करून बायको मिळवितां येते. आतेच्या व मामाच्या मुलीशीं लग्न होत नाहीं. विधवेचें पुनर्लग्न होतें, पण दिराशीं नाहीं असें सांगतात. हे जमीनदार शेतकरी होते. हल्लीं पांढरपेशांचे बरेच धंदे करतात. ह्यांचीही तळीं बांधण्याबद्दल प्रसिद्धी आहे.

फुलमाळीः—( माळी ) माळ्यांच्या निरनिराळ्या पोटजातींमध्यें फुल माळी ऊर्फ सांवतामाळी ही पोटजात सर्वांत श्रेष्ठ समजली जाते. ज्याप्रमाणें पश्चिम महाराष्ट्रांत कोणीही शेतकरी आपल्याला कुणबी म्हणवीत नाहींत व सर्वांना सरसकट " मराठा " हें नांव लावण्यांत येतें, त्याचप्रमाणें हळद माळी, जिरेमाळी, असे निरनिराळे भेद हळूहळू पोटजाती म्हणून नाहींसे होऊन सांवतामाळी किंवा नुसतेंच माळी असें जातीचें नांव सांग-ण्यांत येतें. म्हणून ह्या ठिकाणीं सर्व तऱ्हेचे माळी समजावे. माळी विहिरीच्या पाण्यावर व हल्लीं कालव्यावर बारमास पिकें काढतात. त्यांत हळद, जिरें, फुलें, भाज्या, फळें व ऊंस मुख्यत्वें करून असतात. ही जात मराठे शेतकऱ्यांच्या अगदीं जवळ असते, पण जास्त मेहनती असते. सर्व कुटुंब मळ्यांत काम करतें. मळ्यांतील माल रोजच्या रोज बाजारांत जावा लागतो. म्हणून धनी कामांत असेल तर बनकरीण उर्फ माळीण माळव घेऊन बाजारांत जाते. शहरी लोकांशीं संबंध आल्यामुळें वाणी आर्जवी व गोड असते. इंग्रजी अमलांत हे लोक चांगलेच पुढें सरसावले

आहेत. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. विधवेचें पुनर्लग्न होतें. वारकरी संप्रदायाचा यांच्यात पुष्कळ प्रसार झाला आहे.

बारीः—म्हणजे पानमळे करणारे लोक. नागपूरच्या जवळ रामटेक येथें ह्या लोकांची मोठी वस्ती आहे. त्याचप्रमाणें खानदेशांतही बिहिरींना जेथें बारमास पाणी असतें अशा ठिकाणी यांची वस्ती आहे. खानदेशांत हे लोक केळ्याची लागवड फार मोठ्या प्रमाणांत करतात. त्याचप्रमाणें इतर फळांची पण लागवड करतात. आतां फक्त पानमळे करण्याचेंच धोरण नाहीं. हे उत्तर हिंदुस्थानांतून महाराष्ट्रांत आलेले आहेत. ह्यांच्यांतही पुष्कळ पोटजाती आहेत. बारी गोलाईत स्वतःस श्रेष्ठ समजतात. ह्यांचे गुरु गिरी, पुरी, व नाथ पंथाचे गोसावी असतात, असें एन्थोव्हेन लिहितो. मामाच्या मुलीशीं लग्न करण्याचा प्रघात दिसून आला नाहीं.

बुरूडः—मराठी बुरुडाची लोकसंख्या सुमारें १ लक्ष आहे. बांबूपासून चटया, सुपें, टोपल्या, चिकाचे पडदे वगैरे जिन्नस हे करतात. कांहीं बुरूड वेताचा मालही तयार करतात. ते मर्तिकाचे विधी लिंगायत जंगमांकडून करवतात असें एन्थोव्हेन म्हणतो. मद्य व मांस खाण्याचा प्रघात आहे. मेलेल्या जनावरांचें व गाईचें मांस खात नाहींत. मामाच्या व आत्याच्या मुलीशीं लग्न होतें. समाजांत त्यांचा दर्जा फार कनिष्ठ असे. पण ते अस्पृश्य नव्हते. बुरूड शब्दाचा अर्थ काय असावा हें कळत नाहीं कदाचित तो शब्द द्राविड भाषेंतील असेल किंवा एखाद्या जमातीचें ( गोंड, मुंड वगैरे ) नांव असेल.

ब्राह्मणः—महाराष्ट्रांत ब्राह्मणांची संख्या काय हें निश्चित नाहीं, पण बहुधा ती १५ लाखांपर्यंत असावी. त्यांच्यांतही पुष्कळ पोटजाती आहेत व बहुधा त्यांत बेटी व्यवहार होत नाहींत. महाराष्ट्रांतील ब्राह्मणांचें वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या बहुतेक मोठ्या पोटजाती वेदशाखेवरून पडलेल्या आहेत व निदान वरच्या पिढींतील लोकांना तरी आपली वेदशाखा कोणती

तें सांगतां येतें. कांहीं नांवें, कोंकणस्थ, देशस्थ, सारस्वत, वगैरे प्रांदेशिक आहेत. पण त्यांतील लोकांनाही वेदशाखा सांगतां येते. उत्तर हिंदुस्थानांत केवळ प्रादेशिक, अतिशय संकुचित प्रादेशिक, नांवें आहेत व त्यांतील बहु-संख्य लोकांना आपली वेदशाखा कोणती हें सांगतां येत नाहीं. बिहारांत मैथिल, कान्यकुब्ज, शरयूपारिन्, शाकद्वीपिन् अशा जाती आढळल्या. त्याचप्रमाणें गुजरातेंत नागर, प्रश्नोरा, ओसवाळ, खेडावळ वगैरे अनेक जाती आहेत व त्या अति लहान लहान आहेत. दक्षिणेंत निरानिराळ्या पीठांना ( वैष्णव व शैव पीठांना ) प्राधान्य दिलें जातें व माध्व वैष्णव, वीरवैष्णव, अशा पोटजाती आहेत. वेदशाखा सांगण्याची रीतच लोपली आहे. महाराष्ट्राचें आणखी एक वैशिष्टय म्हणजे शाखांची प्रादेशिक वाटणी हें होय. कऱ्हाडे, चित्पावन, सारस्वत, हे पश्चिमेकडचे ब्राह्मण बहुतेक ऋग्वेदी व थोडया प्रमाणांत कृष्णयजुर्वेदी आहेत. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण महा-राष्ट्रांत सर्वत्र आहेत, पण त्यांतले त्यांत पश्चिम महाराष्ट्रांत मुख्यत्वें आहेत. शुक्लयजुर्वेद्यांपैकीं माध्यंदिन शाखा गोदाकांठीं, खानदेशांत व वऱ्हाडांत दिसते. काण्व शाखा मुख्यत्वें पंढरपूर, सोलापूर व उत्तर कर्नाटकांत दिसते. कृष्णयजुर्वेदी नागपूर प्रांतांत दिसतात व त्यांतील बरेच तेलंगणांतून येऊन महाराष्ट्रांत स्थायिक झाले असावेत असें दिसतें. सामवेदी कांहीं खानदेशांत व पूर्वी पुणें प्रांतांत होते असें दिसतें. कृष्णेच्या दक्षिणेस काण्व शाखा दिसते पण माध्यंदिन फारच कमी. बहुसंख्य कृष्ण यजुर्वेदी ब्राह्मण पूर्व विभागांत व ऋग्वेदी आणि कृष्णयजुर्वेदी पश्चिम विभागांत आढळतात. सामवेदी थोडे आहेत. त्यांतील एक मोठा विभाग आम्ही पुणें प्रांतांतून मद्रास इलाख्यांत गेलों असें सांगतो. याउलट उत्तर हिंदुस्थानांत ऋग्वेदी व कृष्णयजुर्वेदी ब्राह्मण कमी आहेत. शुक्लयजुर्वेदी जास्त. शुक्ल-यजुर्वेदी ही शाखा वेदशाखांपैकीं सर्वांत नवी, अलीकडची. तिचा प्रसार दक्षिणेंत नर्मदा व गोदा यांच्या दरम्यान झाला, पण तिच्या प्रथमशाखे-

खेरीज (काण्व) दक्षिणेकडे मद्रास इलाखा, केरळ व कर्नाटक इकडे तिचा प्रसार झाला नाहींसें दिसतें. महाराष्ट्रांत खालील जातींचीं मापें घेतलीं.

( अ ) देशस्थ ऋग्वेदीः—ही महाराष्ट्रांतील प्राचीनतम ब्राह्मण शाखा असावी असें वाटतें. महाराष्ट्र जेव्हां वेगळें राष्ट्र नसून कर्नाटक, महाराष्ट्र व तेलंगणाचा कांहीं भाग असें एक राज्य होतें तेव्हांपासून हे ब्राह्मण येथें चांगले स्थायिक होतेसें दिसतें. ह्यांची संख्या दोन लाखांवर असावी. कर्नाटकांतही हे सर्वत्र दिसतात. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. इतकेंच नव्हे तर दक्षिण महाराष्ट्रांत व कर्नाटकांत या जातींत आत्याच्या मुलीशीं व बहिणीच्या मुलीशींहि लग्न करण्याचा प्रघात दिसतो. महाराष्ट्रांत देशपांडे, कुलकर्णी वगैरे वतनें यांचीं आहेत.

( आ ) कऱ्हाडेः—ही शाखा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचीच असावी. पण कोंकणांत आल्यावर त्यांच्यांत कांहीं दुसरें मिश्रण झालें असावें असें दिसतें. देसाई, सरदेसाई वगैरे यांचीं वतनें होतीं. पूर्वीच्या काळीं यांना राजाश्रय चांगला होता. वस्ती मुख्यत्वें दक्षिण रत्नागिरी जिल्ह्यांत.

( इ ) चित्पावनः—ह्या नांवावरून अति तर्कवितर्क झाले आहेत. पण त्याचा अर्थ कोणास कळला नाहीं. जातीला मोठेपणा देण्यासाठीं इतर कांहीं जातींना विश्वकर्मा, चांद्रसेनीय वगैरे उपपदें आहेत. त्यापैकींच हें असावें असें वाटतें. वसती मुख्यत्वें रत्नागिरी जिल्हा. ऋग्वेदी व कृष्ण-यजुर्वेदी दोन्हीही शाखेचीं घराणीं आहेत व त्यांचा बेटीव्यवहार होतो. त्यावरून ही जात जुनी असावीसें वाटतें. आतां घाटावरील त्यांची वस्ती बरीच झालेली आहे. मामाच्या मुलीशीं लग्न करण्याचा प्रघात नाहीं.

( ई ) सारस्वत ब्राह्मणः—मालवण, वेंगुर्ला, गोवा, दक्षिण कानरा येथें मुख्यत्वें रहातात. कदंबांच्या काळीं ह्यांना राजाश्रय चांगला होता. ह्यांच्यांत ऋग्वेदी ब्राह्मण आहेत. त्यांच्या अनेक पोटजाती आहेत व त्यांत बेटीव्यवहार होत नाहीं. कर्नाटकाशीं यांचा निकट संबंध असल्यामुळें

कानरा जिल्ह्यांतील सारस्वत कानडी भाषाही बोलतात. सारस्वतांची भाषा कोंकणी आहे व ती मराठीसारखीच एक संस्कृतोद्भव स्वतंत्र भाषा आहे असें भाषाशास्त्रज्ञांचें मत आहे. ह्यांच्यांत आतेच्या, मामाच्या व बहिणीच्या मुलीशीं लग्न होतें.

(उ) **चरक ब्राह्मणः**—हे नागपूर प्रांतांत आढळतात. ही कृष्ण यजुर्वेदी ब्राह्मणांची अति लहान पोटजात आहे. संख्या ३।४ हजारांपेक्षां जास्त नसावी. हे तेलंगणातून आले असण्याचा संभव आहे.

(ऊ) **माध्यंदिनः**—ही शुक्ल यजुर्वेदाच्या बारा शाखांपैकीं दुसरी शाखा. ही उत्तर हिंदुस्थानांत, गुजरातेंत व महाराष्ट्रांत गोदातिरीं आढळते. लोकसंख्या सुमारें २–२½ लाख असावी. ह्यांच्यांत आतेच्या व मामाच्या मुलीशीं लग्न होत नाहीं. एवढेंच नव्हे तर नवरा-मुलगा मुलीच्या मामाशीं सगोत्रीय असूनही चालत नाहीं.

**भंडारीः**—ह्यांना भावगुण असेंही म्हणतात. १९०१ मध्यें त्यांची संख्या सुमारें १७०००० होती. त्यांची मुख्य वस्ती मुंबई, ठाणें, कुलाबा, सावंतवाडी, रत्नागिरी व कानरा या जिल्ह्यांतून आहे. त्यांचा परंपरागत धंदा ताडी करणें हा आहे. मराठ्यांच्या राज्यांत ते चांगले लढवय्ये म्हणूनहि गाजले आहेत. मुंबई बेटावर एकेकाळीं त्यांचें राज्य होतें. ते मद्य व मांस भक्षण करतात. मामाच्या मुलीशीं लग्न होतें; विधवेचें पुनर्लग्न होतें.

**भावसारः**—ही जात दक्षिण गुजरातेंत आढळते. आपलें मूळ ठिकाण मुंगी पैठण असें मराठी भावसार सांगतात. अजूनही मराठवाड्यांत ही जात सर्वत्र आढळते. इतर देवांखेरीज हे लोक बालाजी व हिंगलाज माता ह्यांना मानतात. हे दोन्ही देव महाराष्ट्राबाहेर गुजरात व काठेवाडांत आहेत. त्यांचा परंपरागत धंदा कापड रंगवणें व छापणें हा आहे.

भिल्लः—ही एक वन्य जात राजपुताना, माळवा, गुजराथ व वायव्य महाराष्ट्रभर पसरली आहे. कांहीं भिल्ल थेट औरंगाबाद जिल्ह्यापर्यंत महाराष्ट्राच्या मध्यापर्यंत पोंचलेले आहेत. मुंबई इलाख्यांत यांची वस्ती साडेपांच लाख आहे. पैकीं जवळ जवळ निम्मी गुजरातेंत आहे. अबू आणि आशिरगड ह्यांमधील डोंगरी प्रदेशांत भिल्ल मूळ रहात असावे व तेथून ते रजपुताना, मध्यभारत, गुजरात व महाराष्ट्रांत पसरलेले असावेत. सहाव्या शतकांत गुणाढयानें एका भिल्ल राजाचें वर्णन केलेलें आहे. भिल्लांनाच गुणाढय दस्यू असेंही म्हणतो आणि दस्यू तर आर्यांचे प्रतिस्पर्धी म्हणून ऋग्वेद काळापासून हिंदुस्थानच्या इतिहासांत माहीत आहेत. खानदेशांतील भिल्ल मामाच्या मुलीशीं लग्न करतात असें कळलें, पण गुजरातेंतील एका भिल्ल शिक्षकानें गुजरातेंत तो प्रघात भिल्लांमध्यें मुळींच नाहीं असें सांगितलें. पश्चिमेस सातपुडयांतून भिल्ल वसती कोरकू व गोंडांच्या जवळ येते. हिंदुस्थानच्या पश्चिम भागापासून ते थेट पूर्व भागापर्यंत मधली डोंगराळ पट्टी भिल्ल, कोरकू, गोंड, खोंड, मुंड, उराव वगैरे लोकांनीं व्यापलेली आहे. हे सर्व वन्य लोक एकाच मानव वंशाचे कीं मिश्र आहेत ? सर्व एकाच वेळीं हिंदुस्थानांत आले कीं अगदीं भिन्न भिन्न काळीं ? सर्व एकाच मार्गें आले कीं भिन्न मार्गें ? हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास कळण्यास अशा कितीतरी आवश्यक गोष्टी ह्या वन्य जमातींबद्दल अजून न कळलेल्या अशा आहेत. आदिमोंगोल, ऑस्ट्रेलीय व वेद्द अशा तीन वंशांचें मिश्रण त्यांच्यांत असावें असें वाटतें.

मावची भिल्ल स्वतःला श्रेष्ठ समजतात. एका बाजाराला त्यांचीं खूप मापें मिळालीं. म्हणून तीं निराळीं दाखविलीं आहेत. तडवी भिल्ल हे मुसलमान असून औरंगजेबाच्या फौजांतील शिपायांचे आम्ही वंशज म्हणून सांगतात.

मांगः—अस्पृश्य समजली गेलेली ही एक जात आहे. ह्यांच्यांत मांग

गारोडी म्हणून एक पोटजात आहे. ही सर्वत्र पसरलेली, पण कोठें एकत्र मोठ्या संख्येनें आढळत नाहीं. गांवाबाहेर मांगवाडा म्हणून त्यांची विशिष्ट वसती असते. महारांपेक्षां ही जात कनिष्ठ समजतात. बऱ्याच ठिकाणीं गुन्हेगार जात म्हणून ही ओळखली जाते. पैकीं मांग गारुडी यांचा समावेश मुंबई प्रांतांतील गुन्हेगार जातींत केलेला होता. ह्यांचे परंपरागत धंदे, दोर वळणें, टोपल्या करणें, वाजंत्री वाजवणें, व फांशीची किंवा मरणाची शिक्षा झालेल्या माणसाला फांशीं देणें वा शिर तोडणें असे आहेत. ते मद्यमांस भक्षण करतात. मृत मांसही खातात. मामाच्या व आतेच्या मुलीशीं लग्न होतें.

महारः—ही महाराष्ट्रभर पसरलेली जात आहे. महार नाहीं असें एकहि खेडें महाराष्ट्रांत नाहीं. ते सर्वत्र बलुतदार असतात. ते गांवाबाहेर राहतात म्हणून त्यांना वेसकर असेंही नांव आहे. पिढीजाद गांवकामगारांपैकीं ते आहेत. गस्त घालणें, दवंडी पिटवणें (तराळ), निरोप घेऊन जाणें, झाडलोट करणें, व गांवांतील गुन्हे हुडकून काढणें हीं त्यांचीं पिढीजाद कामें. गांव कामगारकीचें द्योतक एक काठी असते व ती गांवच्या महार घराण्यांत फिरती असते. महारांना सर्वांत कनिष्ठ स्थान, वस्ती मोठी, जमीन व बलुतें कमी, अशी परिस्थिती होती. पण नव्या यंत्रयुगाचा फायदा ह्या जमातीनें करून घेतला. मुंबईला गिरण्यांत फार मोठ्या प्रमाणांत महार मजूर आहेत. नागपूरला तर महार मजूरच बहुसंख्य आहेत. नगर जिल्ह्यांत साखर कारखान्यांतूनही महार मजूर पुष्कळ आहेत. त्यांच्यांत मामाच्या व आतेच्या मुलीशीं लग्न होतें. विधवाविवाह होतो, पण नवऱ्याच्या कुळांत नाहीं. मद्यमांस भक्षण होतें. मृत जनावरांचें मांस खाण्याची रीत होती. ह्यांचीं आडनांवें मराठ्यांसारखींच असतात. संख्या १५ लाखाच्या आसपास असावी.

बावने महार हे भंडारा जिल्ह्यांत रहाणारे वैनगंगेच्या खोऱ्यांतले बाव-

नथडीचे महार. एका हातीं बरींच मापें मिळालीं, म्हणून त्यांचा निराळा गट केला.

लेवाः—पूर्व खानदेशांत यावल, रावेर वगैरे भागांत विशेष आढळतात. नांवावरून गुजरातच्या लेवा पाटीदार जमातीशीं संबंध असावा असें वाटतें, पण तसें नसून लेवा ही उत्तरेकडच्या गुजरांपैकीं जात असावी असें दिसतें. गुजरांत रेवा गुजर, बड गुजर अशा पोटजाती आहेत. त्यांपैकींच लेवा एक मोठी जात असावी. लेवा वऱ्हाडांतही स्थायिक आहेत. म्हणजे बऱ्हाणपूरच्या मार्गानें येऊन पश्चिमेला तापी खोरें व पूर्वेकडे पूर्णा खोरें इकडे ते वळले असें दिसतें. शेतकीच्या बरोबरीनें दूधदुभत्याचाहि धंदा त्यांच्या बायका करतात. ह्या जमातीचें "मराठा" करण व मराठीकरण झपाट्यानें होत आहे. ही हुषार व कष्टाळू जमात आहे. चौधरी, महाजन वगैरे आडनांवें ह्यांच्यांत आढळातात.

वंजारी किंवा लंबाडी ( लमाणी ):—ही एक अति दूरवर पसरलेली जमात आहे. गुजरात, महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र ह्या ठिकाणीं, त्याचप्रमाणें मध्यभारत व राजपुताना येथेंही आढळते. ह्यांचा वंशपरंपरा धंदा म्हणजे बैलावर माल ( मुख्यत्वें धान्य, नारळ, खजूर वगैरे ) लादून देशोदेशीं तो नेऊन पोचवायचा हा. मोगल राजांच्या काळांत निरनिराळ्या फौजांना धान्य पुरविणारे मक्तेदार ते होते व मोगल राजांनीं त्यांना वंशपरंपरा किताब व जहागिरीहि दिल्या आहेत. ब्रिटिश अमदानींत त्यांचा हा धंदा अजिबात बसला व हल्लीं ती पशुपालन करणारी, थोडी शेती करणारी व कांहीं ठिकाणीं भटकी व गुन्हेगारी जमात म्हणून ओळखली जाते. पूर्वीं एकेकाळीं हजार—हजार बैलांचा तांडा घेऊन ते व्यापार करीत व स्वतःच्या बाहूंनीं तांड्याचें संरक्षण करीत. त्यांची देवी हिंगलाज माता आहे. त्यांच्या बाया कपड्यावर सुरेख भरतकाम करतात. पुरुष दारू गाळतात व मद्यपान फार प्रमाणावर करतात. वंजारी लोक

कोठून तरी बाहेरून हिंदुस्थानांत आले असावेत असें वाटतें. त्यांचीं नांवें रजपूत असून, लग्नाचे वगैरे विधीहि थोडेबहुत रजपुतांसारखे आहेत. मध्ययुगाच्या आरंभीं रजपुत, गुर्जर वगैरे ज्या जमाती हिंदुस्थानांत आल्या त्यांपैकींच ही असावी असें दिसतें. मामाच्या मुलीशीं लग्न होत नाहीं. विधवेचें दिराशीं लग्न होतें.

वाडवळ ( सोमवंशी क्षत्रिय ):–ही एक माळव करणारी लहानशी जात मुंबई ते माहीम ( केळवा ) ह्या विभागांत दिसते. हे लोक हुषार व कष्टाळू असून मुख्यत्वें पानमळे करतात.केळीच्या बागा व भातशेतीही करतात. त्यांचें शेतकाम वारली लोकांचे सहाय्यानें होतें. ह्यांच्यांत कुटुंबी असें आडनांव आढळतें. तें कुणबी शब्दाचें संस्कृतीकरण असावेंसें वाटतें. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. विधवेचें दिराशीं लग्न होत नाहीं.

वारली:–ही वन्य जात मुख्यत्वें ठाणें जिल्ह्यांत, पण तुरळक नाशिक खानदेश व सुरत जिल्ह्यांतही आहे. त्याच जिल्ह्यांत कातकरी व ठाकूर ह्या वन्य जमातींची पण वस्ती आहे. पण तिघांचीं रहाण्याचीं ठिकाणें अगदीं निरनिराळीं आहेत. ठाकूर पठारावर शेतकी करतात. कातकरी शेती मुळींच करीत नाहींत, फक्त जंगलाजवळ वस्ती करतात. वारली उत्तम भातशेती करतात. कातकऱ्यांच्या झोपडया अगदींच ओबडधोबड असतात तर वारली शक्य तेथें ऐसपैस मोठी झोपडी बांधतो. तीनही जातींत बायका ( कुमारी व लग्न झालेल्या कांहीं ) चोळीवरून पदर घेत नाहींत. ही चाल जुन्या काळीं कुमारिकेबाबत कोकणांतील ब्राह्मण, कुणबी, वगैरे सर्व जातींत होती. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. विधवाविवाह होतो, पण दिराशीं करण्याची परवानगी नाहीं.

**वैश्य वाणी:**—वैश्यवाणी ही पश्चिम महाराष्ट्रांतील एक व्यापारी जमात आहे. ह्या जातीचे लोक मुंबईपासून थेट मालवण-वेंगुर्ल्यापर्यंत व बेळगांव

जिल्ह्यांतहि आढळतात. मुंबई शहरांत यांची वस्ती पुष्कळ आहे. सध्यां ह्यांपैकीं थोडेच लोक प्रत्यक्ष व्यापार करतात. बरेच जण धंदा व नोकरी करतात. ह्यांच्यामध्यें बऱ्याच पोटजाती आहेत. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. घटस्फोट व विधवाविवाह होत नाहींत.

शिंपी:—महाराष्ट्रांत शिंप्यांच्या पुष्कळ पोटजाती आहेत. त्यांत " नामदेव शिंपी " सर्वांत श्रेष्ठ समजतात व त्यामुळेंच हल्लीं सर्व महाराष्ट्रांतील शिंपी आपल्याला नामदेव शिंपी म्हणवतात. बहुतेक आपला परंपरागत धंदा करतात. हल्लीं त्या धंद्यांत पैसा चांगला मिळत असल्यामुळें ब्राह्मण वगैरे इतर जातीहि हें काम करूं लागल्या आहेत, पण अर्थातच या नव्या लोकांत व जुन्यांत रोटीबेटी व्यवहार होत नाहीं. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. घटस्फोट व विधवाविवाह होतो. विधवेचें दिराशीं लग्न करण्याची चाल नाहीं.

साळी:—कोष्टयांप्रमाणेंच हीही एक विणकरांचा धंदा करणारी जात आहे. साळी जात तेलंगण, कर्नाटक, गुजरात वगैरे प्रांतांत आढळते. गुजरातेंतून साळी आणून त्यांना कर्नाटकांत बसवल्याचा उल्लेख ताम्रपटांत आहे. साळ्यांत पुष्कळ पोटजाती आहेत. इकडील साळ्यांचें कुलदैवत शाकंभरी देवी हें आहे. शाकंभरीचें मुख्य स्थान कर्नाटकांत आहे. हिलाच बनशंकरी असेंही म्हणतात. कर्नाटकांतही सर्व विणकरांची देवी शाकंभरी आहे. महाराष्ट्रांतील देवांग कोष्टी कर्नाटकांतून आलेले आहेत. त्यांचेंही कुलदैवत शाकंभरीच आहे. ह्यावरून हे साळीहि ( स्वकुळसाळी ) कर्नाटकांतून इकडे आलेले असावे असें दिसतें. यांच्यांत आत्याच्या किंवा मामाच्या मुलीशींहि लग्न होतें. ही चालहि कर्नाटकांतील आहे. घटस्फोट व विधवाविवाह होतो. विधवेनें नवऱ्याच्या कुळांत लग्न करतां कामा नये असा दंडक आहे.

**सोनारः**—सोनारांत पुष्कळ प्रादेशिक पोटजाती आहेत. त्यांपैकीं **अहिर सोनार** ही जात खानदेशांतील आहे. त्यांच्यांत मामेबहिणीशीं लग्न होतें. ही जात लहान आहे व खानदेशाच्या बाहेर फार पसरलेली नाहीं.

**दैवज्ञ सोनारः**—ज्योतिषाचा धंदा करीत असत असें दिसतें. ते स्वतःस ब्राह्मण म्हणवतात. त्यांची वस्ती मुख्यत्वें कोंकणांत व हल्लीं मुंबईत आहे. महाराष्ट्रांतील इतर मोठ्या गांवींहि त्यांची वस्ती थोडीबहुत आहे. यांच्यांतहिं मामाच्या मुलीशीं लग्न होतें.

इतर सोनारांचीं मापें महाराष्ट्रांतील निरनिराळ्या गांवीं घेतलेलीं आहेत. त्याच्यांत लाडवान, माळवी वगैरे निरनिराळ्या पोटजाती आहेत व बरेच महाराष्ट्रांत बाहेरून आलेले आहेत. ह्यांच्यांत मामाच्या मुलीशीं लग्न होत नाहीं.

**सोनकोळीः**—हा मुंबई व भोवतालचा प्रदेश येथील मच्छीमार करणारा वर्ग आहे. त्यांचें रूप, राहण्याची व नेसण्याची पद्धति वगैरे सर्वच इतकें वैशिष्टयपूर्ण आहे कीं, त्यामुळें बऱ्याच मानवशास्त्रज्ञांचें कुतूहल जागृत झालेलें आहे. ह्यांतील पुरुष रात्रभर मच्छीमार करतात व सकाळीं तारवें नांगरून टाकलीं कीं, मासे उतरून घेणें, निवडणें, बाजारांत नेऊन विकणें वगैरे सर्व कामें बायकाच करतात. मासे, कालवें, झिंगे वगैरे प्रकार निरनिराळे निवडून वाळविण्याचें कामहि बायकाच करतात. बायका हुशार, फाटक व अतिशय स्वतंत्र बाण्याच्या असतात. बोलणें मैत्रीचें असलें म्हणजे अति गोड असतें. एरवीं फटकून असतें. त्यांच्या मानानें पुरुष भोळसट व अबोल वाटतात. कांहीं कांहीं बायका रूपानें अप्रतिम सुरेख असतात. बांध्यानें सगळ्याच उत्तम असतात. ह्यांच्यांतील बरेच लोक ख्रिस्ती झाल्यामुळें मूळच्या एकसंघ समाजांत फूट पडली आहे. मुंबईचे कोळी पैसा चांगला मिळवतात व तो दारूंत, खाण्यापिण्यांत, लग्नकार्यांत खर्चीहि

खूप प्रमाणांत करून टाकतात. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. विधवेचें दिराशीं लग्न होत नाहीं.

हाळबी—किंवा हाळबा शेती व घरकाम करतात. यांची वस्ती मुख्यत्वें रायपूर, कांकर, बस्तार व भंडारा या प्रदेशांत आहे. १९११ मध्यें त्यांची संख्या सुमारें एक लक्ष होती. यांच्याबद्दल ग्रियरसन असें म्हणतो कीं, हे मूळचे वन्य लोक असून त्यांनीं हिंदु धर्म व आर्यभाषा यांचा स्वीकार केलेला दिसतो. यांची भाषा म्हणजे उडिया, छात्तिसगडी व मराठी या भाषांचें मिश्रण आहे. भंडारा जिल्ह्यांत हाळबी मराठी भाषा बोलतात तर बस्तारमध्यें तेलगूचें वळण भाषेला दिसतें. मापें घेतलेले सर्व लोक भंडारा जिल्ह्यांतील मराठी बोलणारे आहेत. हाळब्यांचा मूळ मुलुख सिहावाचें जंगल होतें व तेथून गोंड राजांनीं त्यांना बोलावून आणून सध्यांच्या प्रांतांत वसविलें व कांहींना जहागिरी दिल्या. गोंड मुलखांत अजूनही ठिकठिकाणीं हाळबी जमिनदार आहेत. यांच्यांतील कुळांचीं आडनांवें शेजारील सर्व जमातींच्या नांवाचीं आहेत. वरटी ( परीट ), भोयार ( भोई, भोयर हें आडनांव बारल्यांतहि आढळलें. भोई म्हणजे कोळी. म्हणजे कोळी मूळ वन्य जमातीपैकीं असून त्यांचें नांव सर्व जमातींत आढळतें, असें होतें ), रावत ( गोबारी ), बढई ( सुतार ), मालिया ( माळी ), परधान ( गोंडांतील एक जात ), मानकर ( मुंडांतील टोळ्यांचे मुख्य. यांना मानकी असें म्हणतात ), बाघेल ( एक रजपूत कूळ ), ऐलमा ( तेलंगी शेतकरी ), अशीं नांवें आहेत. रसेल म्हणतो कीं, त्या त्या जातींचें ह्यांच्यांत मिश्रण झालें असेल. पण त्या त्या जातींच्या लोकांकडे हे लोक कुळें किंवा मोलकरी राहिल्यामुळेंहि हीं आडनांवें घेतलीं असल्याचा संभव आहे. मामाच्या मुलीशीं लग्न होतें. पुरुषानें बहिणीच्या मुलाला नेहमीं पाया पडून मान देण्याची चाल यांच्यांत आहे. ( ही चाल तेलंगणांत व मराठवाड्यांतहि आढळली. ) भाच्याला नेहमीं

थोडाबहुत दायभाग मिळतोच. घटस्फोट होतो. विधवेचें लग्न विधुराशींच झालें पाहिजे असा दंडक आहे. दिराशीं लग्नाचा प्रघात नाहीं म्हणतात. ह्यांच्यातील सहा जहागिरी भंडाऱ्यांत आहेत. एक चांद्यांत आहे व एक दोन लहान जहागिरी रायपूर व द्रुग जिल्ह्यांत आहेत.

हाळबा कोष्टी—रसेलचें म्हणणें असें आहे कीं, हाळब्यांपैकीं ज्यांनीं विणकराचा धंदा उचलला ते हाळबा कोष्टी. पण त्यांच्या रूपावरून त्यांचें हाळब्यांशीं साम्य दिसत नाहीं. ते नागपूरच्या भोवतीं दहा पंधरा मैलांच्या प्रदेशांत रहातात. संख्येनें दोन तीन हजारांपेक्षां जास्त नसावे. एकंदर एकोणीस-वीस कुळें त्यांच्यांत आहेत. मामेबहिणीशीं लग्न होत नाहीं.

वर वर्णन केलेल्या जातींतील लोकांची तपासणी करतांना एकंदर १७ मापें घेतलीं. त्याचप्रमाणें प्रत्येक मापलेल्या माणसाचें थेंबभर रक्त घेऊन त्याची एक सोपी, वंशशास्त्रदृष्ट्या उपयुक्त अशी तपासणी केली. तसेंच डोळ्याचा रंग व आकार, केसांचा रंग व आकार वगैरेची नोंद केली आणि घेतलेल्या मापांपासून एकंदर १२ निरनिराळ्या सापेक्ष प्रमाणांचें गणित केलें. सामान्य वाचकाला हीं सर्व मापें कंटाळवाणीं वाटतील. पण ज्यांवरून वंशदृष्ट्या अनुमानें काढलीं आहेत त्यांपैकीं मुख्य मुख्य मापें तरी काय आहेत हें पहाण्याची उत्सुकता कांहींना होईल म्हणून कांहीं मोजकीं मापें खालीं दिलीं आहेत. डोक्याचा घेर मिलिमीटर मध्यें दिला आहे. (२५० मिलिमीटरचा एक इंच होतो). बाकीचीं दोन मापांचीं परस्परांशीं प्रमाणें असल्यामुळें इंच, मिलिमीटर वगैरे परिमाणांचा प्रश्नच येत नाहीं. ह्या आंकड्यांचा अर्थ पुढीलप्रमाणें आहे.

आगरी लोकांच्या मापाची व प्रमाणांची सरासरी दिली आहे त्यांत २ रा स्तंभ डोक्याच्या घेराबद्दल आहे तो प्रत्यक्ष किती तें मिलिमीटरमध्यें दिलें आहे. दुसरें माप ( मस्तकाचें सापेक्ष प्रमाण ) ७६·५६ दिलें आहे. त्याचा

अर्थ असा कीं या जातींत डोक्याची रुंदी लांबीचा शेकडा ७६·५६ असते. प्रत्यक्ष लांबी-रुंदीचीं मापें दिलेलीं नाहींत. ७६·५६ म्हणजे दीर्घमस्तक लोक. तिसरें माप नाकाच्या उंचीचें प्रमाण दाखवतें; दोन डोळ्यांच्या बाहेरच्या कडांमधील सरळ अंतर १०० असल्यास नाकावरून लवचीक पोलादी पट्टी ठेऊन तें १११·२३ भरतें. खत्री, कऱ्हाडे, पाठारे, मराठा वगैरे जातींत तें ११९-१२३ इतकें भरतें. म्हणजे आगरी जातीचीं नाकें साधारणपणें नकऱ्यांत जमा होतात. चौथें माप दाखवतें कीं नाकाची लांबी १०० असल्यास रुंदी ७७·४७ असते. पाठाऱ्यांत हें माप ७१ ते ७३ आहे. भिल्लांत ८७ आहे. हें पाहिल्यास आगऱ्यांचीं नाकें मध्यम रुंद आहेत हें समजतें. ( उत्तर युरोपीयांत हें प्रमाण ५० च्या आसपास असतें. त्यांचीं नाकें लांब व अरुंद असतात. नाकाची आकृति त्रिकोणानें दाखवावयाची म्हटल्यास हिंदुस्थानांतील लोकांच्या नाकाचा त्रिकोण रुंद पायाचा व आखूड भुजांचा येतो, तर युरोपीयांचा अरुंद पायाचा व लांब भुजांचा होतो. ). प्रमाण ५ वें चेहऱ्याचा आकार दर्शवतें. नाकाचें वरचें टोक, कपाळाच्या हाडाशीं जेथें मिळतें तेथपासून वरच्या मधल्या दाताची वरची कड ह्यांमधील अंतर व गालफडांमधील अंतर ह्यांचें प्रमाण ह्यांत सांगितलें आहे. चेहरा जितका लांब व गालफडें जितकीं कमी रुंद तितका हा आंकडा मोठा येतो. ( महाराष्ट्रांत मराठ्यांचा चेहरा लांब असतो. ह्या प्रमाणांत खालच्या जबड्याची उंची येत नाहीं. उत्तर युरोपीयांचें तोंड लांब असतें, मोंगोलीयांचें रुंद असतें हें मागें सांगितलें आहेच. ) सहावें प्रमाण डोक्याचें मानानें चेहरा किती रुंद आहे तें दर्शवतें. साधारणपणें डोक्याइतके रुंद चेहरे क्वचितच आढळतात. पण एकंदरीनें पहातां महाराष्ट्रीय लोक रुंद चेहऱ्याचे आहेत असें वरील मापावरून दिसतें.

खालील कोष्टकांत जातींचीं नांवें वर्णानुक्रमें देऊन पुढें सहा स्तंभांत सांगितलेलीं मापें व प्रमाणें दिलीं आहेत.

| क्रमांक | जात | डोक्याचा घेर | डोक्याचें सापेक्ष प्रमाण | नाकाच्या उंचीचें प्रमाण | नाकाच्या लांबी-रुंदीचें सापेक्ष प्रमाण | वरच्या जबड्याच्या लांबीचें प्रमाण | चेहरा व डोकें यांच्या रुंदीचें प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | आगरी | ५२९.०० | ७६.५६ | १११.२३ | ७७.४७ | ४३.२० | ९३.३२ |
| २ | आंध | ५२३.२९ | ७८.८० | ११२.९४ | ७९.७४ | ४४.३९ | ९३.९२ |
| ३ | कुणबी खैरे | ५२८.५७ | ७६.५८ | ११२.६३ | ७९.०७ | ४४.९७ | ९४.८४ |
| ४ | कुणबी तिरोळे | ५३४.५७ | ७७.०६ | ११३.८९ | ७७.३८ | ४६.२० | ९४.७८ |
| ५ | कुणबी धनोजे | ५३५.२० | ७८.१० | ११२.९० | ८१.२० | ४५.६० | ९४.४० |
| ६ | कुणबी माना | ५२४.०४ | ७५.७६ | ११०.६९ | ८१.२६ | ४४.९७ | ९४.७४ |
| ७ | कोलाम | ५२७.९० | ७६.१३ | १०८.५७ | ८६.४१ | ४५.३२ | ९५.८५ |
| ८ | कोळी | ५३२.२० | ७५.६८ | ११६.३० | ८०.२९ | ४५.३६ | ९६.१२ |
| ९ | कोळी (मल्हार) | ५२१.५० | ७६.०० | ११२.९० | ८५.७५ | ४५.१४ | ९४.७८ |
| १० | कोरकू | ५२६.५७ | ७७.३८ | १०८.९५ | ८९.२४ | ४७.३७ | ९४.१२ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ११ | कोहाळी | ५२६·०४ | ७५·२३ | ११४·६५ | ७६·४६ | ४४·४१ | ९५·०९ |
| १२ | खत्री | ५४२·२३ | ८०·१२ | १२०·१२ | ६९·४३ | ४५·६६ | ९०·१६ |
| १३ | गुजर | ५३३·८२ | ७६·४० | ११८·५७ | ७६·१२ | ४७·७४ | ९३·५५ |
| १४ | गुरव | ५३०·९२ | ८०·५८ | ११६·९० | ७६·०३ | ४२·५६ | ९२·३२ |
| १५ | गोंड | ५२८·६१ | ७६·३६ | ११०·८७ | ८३·८१ | ४५·९० | ९५·५४ |
| १६ | गोवारी | ५३०·१८ | ७५·७८ | ११२·२७ | ८३·२३ | ४४·६८ | ९५·५७ |
| १७ | चांभार | ५३१·३६ | ७८·६४ | ११५·४२ | ७९·३६ | ४३·६९ | ९३·३० |
| १८ | ठाकूर | ५१८·७२ | ७८·३६ | ११६·२० | ८२·८६ | ४२·९८ | ९२·७५ |
| १९ | तेली | ५३१·४७ | ७७·०५ | ११३·८७ | ८१·१३ | ४६·४६ | ९४·३९ |
| २० | त्वष्टाकासार | ५४०·९७ | ७८·११ | ११८·९० | ७४·२४ | ४४·४७ | ९१·१० |
| २१ | धनगर खुटेकर | ५२३·०६ | ७८·२९ | ११४·५७ | ७८·४२ | ४६·५६ | ९२·८६ |
| २२ | धनगर हटकर | ५३६·४६ | ७८·३६ | ११४·८८ | ७७·३५ | ४४·०१ | ९२·३७ |
| २३ | ढीवर | ५२५·३२ | ७५·५७ | ११२·८५ | ८८·४४ | ४५·८९ | ९४·७८ |
| २४ | न्हावी | ५२८·२८ | ७७·३३ | ११५·७० | ७७·८८ | ४४·३२ | ९३·१७ |
| २५ | परीट | ५२३·५४ | ७९·६५ | १०४·४२ | ७८·५९ | ४४·५९ | ९३·८४ |
| २६ | पाठारे क्षत्रिय | ५३८·१९ | ८१·८१ | ११८·०७ | ७३·६८ | ४४·२७ | ९०·१७ |

| क्रमांक | जात | डोक्याचा घेर | डोक्याचें सापेक्ष प्रमाण | नाकाच्या उंचीचें प्रमाण | नाकाच्या लांबी-रुंदीचें सापेक्ष प्रमाण | वरच्या जबड्याच्या लांबीचें प्रमाण | चेहरा व डोकें यांच्या रुंदीचें प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| २७ | पाठारे प्रभु | ५४६·१८ | ८१·०१ | ११८·७७ | ७१·७० | ४५·६२ | ८९·१७ |
| २८ | पोवार | ५३२·४८ | ७४·५० | ११३·५५ | ७६·७७ | ४४·९२ | ९५·१६ |
| २९ | प्रभु ( चां. का. ) | ५३७·४० | ७८·८३ | ११८·६४ | ७४·५१ | ४५·२१ | ९१·१० |
| ३० | फुलमाळी | ५३२·५८ | ७७·८४ | ११४·७३ | ७७·८२ | ४५·५४ | ९३·९८ |
| ३१ | बारी | ५३१·४१ | ७७·५८ | ११३·६१ | ७५·७८ | ४५·७६ | ९४·१२ |
| ३२ | बुरूड | ५३३·०० | ८०·६५ | ११७·१२ | ८०·०० | ४३·६१ | ९२·२६ |
| ३३ | ब्राह्मण देशस्थ ऋग्वेदी | ५३८·९६ | ७७·९३ | ११७·९३ | ७८·०५ | ४४·५५ | ९२·८८ |
| ३४ | ब्राह्मण कऱ्हाडे | ५४६·२० | ७६·९४ | ११९·२९ | ७५·६२ | ४३·७७ | ९१·६० |
| ३५ | ब्राह्मण चरक यजुर्वेदी | ५३२·१५ | ७९·१६ | ११३·५५ | ७७·७७ | ४२·७१ | ९२·४७ |
| ३६ | ब्राह्मण चित्पावन | ५४१·०५ | ७७·७४ | ११८·०७ | ७६·८८ | ४३·०० | ९२·०३ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३७ | ब्राह्मण सारस्वत | ५४३·५९ | ७९·०८ | ११८·२७ | ७२·३६ | ४४·२० | ९०·८५ |
| ३८ | भंडारी | ५३९·११ | ७९·६० | ११७·८५ | ८०·१६ | ४३·७९ | ९१·१७ |
| ३९ | भावसार | ५३२·०७ | ७८·९४ | ११५·६२ | ७८·७२ | ४४·२९ | ९१·८५ |
| ४० | भिल्ल तडवी | ५२१·०२ | ७७·५२ | ११५·०३ | ८१·८१ | ४६·४६ | ९४·२४ |
| ४१ | भिल्ल मावची | ५२१·७४ | ७७·७२ | १११·५७ | ८६·७५ | ४२·४२ | ९२·७५ |
| ४२ | भिल्ल इतर | ५२०·९७ | ७६·४६ | ११३·०८ | ८७·५६ | ४३·२२ | ९४·५६ |
| ४३ | मांग | ५२८·०१ | ७८·२१ | ११५·२२ | ७९·१३ | ४४·१८ | ९३·५८ |
| ४४ | महार | ५३३·११ | ७७·९७ | ११४·६६ | ७९·५२ | ४४·३१ | ९३·९२ |
| ४५ | महार बावने | ५२५·१६ | ७६·५१ | ११२·४९ | ७६·९९ | ४५·११ | ९४·६० |
| ४६ | लेवा | ५३७·४३ | ७४·५० | ११९·२३ | ७६·९८ | ७७·२५ | ९६·२२ |
| ४७ | वंजारी | ५३०·४५ | ७७·२६ | ११७·४६ | ७४·२७ | ४६·८६ | ९४·०८ |
| ४८ | वाडवळ (सोमवंशीय क्षत्रिय) | ५३४·०८ | ७७·७८ | ११४·५० | ७४·७५ | ४४·०८ | ९२·०७ |
| ४९ | वारली | ५२१·१६ | ७६·७० | ११३·२८ | ८४·७६ | ४४·९२ | ९३·०४ |
| ५० | वैश्यवाणी | ५३९·२० | ७७·५६ | ११९·७१ | ७४·१८ | ४४·६८ | ८९·८४ |
| ५१ | शिंपी | ५२७·२२ | ७८·६९ | ११५·५५ | ७४·०४ | ४४·२३ | ९३·६४ |

| क्रमांक | जात | डोक्याचा घेर | डोक्याचें सापेक्ष प्रमाण | नाकाच्या उंचीचें प्रमाण | नाकाच्या लांबी-रुंदीचें सापेक्ष प्रमाण | वरच्या जबड्याच्या लांबीचें प्रमाण | चेहरा व डोकें यांच्या रुंदीचें प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ५२ | साळी | ५२९·८५ | ७९·८२ | ११५·९३ | ७४·५९ | ४४·३३ | ९२·९५ |
| ५३ | सोनार अहिर | ५२९·९५ | ७७·४८ | ११७·९४ | ७८·९५ | ४९·१० | ९२·७२ |
| ५४ | सोनार दैवज्ञ | ५३५·६४ | ७९·८७ | ११९·२२ | ७६·३३ | ४३·३४ | ९१·२० |
| ५५ | सोनार इतर | ५२७·०७ | ७८·२३ | ११४·७७ | ८०·६६ | ४३·४५ | ९३·०७ |
| ५६ | सोनकोळी | ५३९·४४ | ७९·६१ | ११६·७३ | ७९·८१ | ४३·७८ | ९१·९२ |
| ५७ | हळबी | ५२६·२१ | ७५·९९ | १११·०३ | ८५·७३ | ४३·५४ | ९३·६८ |
| ५८ | हळबी कोष्टी | ५३९·६४ | ७७·१२ | ११२·१० | ८१·४२ | ४५·६१ | ९४·३६ |
| ५९ | माध्यंदिन अमरावती | | ७६·४८ | ११८·०० | ७९·७० | ४५·५२ | ९०·३८ |
| ६० | माध्यंदिन नागपूर | | ७७·१५ | १२१·१९ | ७८·५४ | ४४·३२ | ९१·५३ |
| ६१ | माध्यंदिन जळगांव | | ७७·२० | ११९·३४ | ७६·३६ | ४६·५७ | ९३·०४ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ६२ | माध्यंदिन बार्शी | | ७९·६९ | ११६·१६ | ७६·४८ | ४७·२६ | ९१·४५ |
| ६३ | माध्यंदिन औरंगाबाद | | ७९·२५ | १२०·९३ | ७३·२३ | ४७·७६ | ९२·५७ |
| ६४ | माध्यंदिन जालना | | ८०·१९ | १२०·३१ | ७१·८० | ४६·६९ | ९२·१७ |
| ६५ | माध्यंदिन परभणी | | ७७·४७ | १२०·२० | ७५·१७ | ४७·८५ | ९२·८६ |
| ६६ | माध्यंदिन नाशिक | | ७७·६१ | १२०·४६ | ७६·३० | ४५·३० | ९२·४८ |
| ६७ | माध्यंदिन पुणें | | ७७·२३ | ११९·९३ | ७५·०३ | ४७·१७ | ९१·०६ |
| ६८ | **मराठा** | ५३४·३६ | ७७·७६ | १२३·५१ | ७४·७७ | ४९·५५ | ९३·२७ |
| ६९ | ,, पश्चिम खानदेश | ५३२·८७ | ७९·४७ | १२१·३५ | ७१·६९ | ४७·९४ | ९३·२३ |
| ७० | ,, पूर्व खानदेश (अ) | ५२७·५६ | ७८·३१ | १२४·३४ | ७२·६७ | ४९·५४ | ९३·९७ |
| ७१ | ,, पूर्व खानदेश (ब) | ५३१·०१ | ७६·५७ | १२०·३२ | ७४·८२ | ४९·७० | ९४·१४ |
| ७२ | ,, पुणें–पश्चिम (अ) | ५३५·४८ | ७८·०८ | १२३·१६ | ७२·०२ | ४९·३० | ९३·०८ |
| ७३ | ,, पुणें–पश्चिम (ब) | ५३०·५२ | ७९·९५ | १२२·१४ | ७५·६५ | ४८·५७ | ९३·०५ |
| ७४ | ,, सातारा, कोल्हापूर पश्चिम (अ) | ५३४·०३ | ७६·८० | १२१·८३ | ७२·०६ | ४९·३० | ९४·२९ |
| ७५ | ,, सातारा, पश्चिम (ब) | ५३३·३४ | ७८·३८ | ११९·०० | ७४·७९ | ४९·८० | ९३·९४ |
| ७६ | ,, सातारा, पूर्व | ५३०·३१ | ७८·९० | १२१·२३ | ७५·९८ | ४९·१२ | ९३·७६ |

| क्रमांक | जात | डोक्याचा घेर | डोक्याचें सापेक्ष प्रमाण | नाकाच्या उंचीचें प्रमाण | नाकाच्या लांबी-रुंदीचें सापेक्ष प्रमाण | वरच्या जबड्याच्या लांबीचें प्रमाण | चेहेरा व डोकें यांच्या रुंदीचें प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ७७ | मराठा पुणें–पूर्व | ५३६·८२ | ८०·७१ | १२०·२९ | ७४·८१ | ४७·९५ | ९३·३० |
| ७८ | ,, मिरज आणि सांगली | ५३१·५६ | ७९·२७ | १२०·३४ | ७५·११ | ४८·९७ | ९३·७६ |
| ७९ | ,, कोल्हापूर–पूर्व | ५३३·७६ | ७८·४१ | १२२·४३ | ७४·८३ | ४८·७१ | ९३·०५ |
| ८० | ,, अहमदनगर (अ) | ५२७·९७ | ७९·१८ | ११८·८३ | ७६·३५ | ४८·३० | ९३·९७ |
| ८१ | ,, अहमदनगर (ब) | ५२९·५९ | ८०·१५ | ११९·५७ | ७५·४४ | ४७·९३ | ९३·२० |
| ८२ | ,, हैद्राबाद दक्षिण | ५२८·२३ | ७८·५५ | ११८·३६ | ७६·२७ | ४६·६१ | ९३·८० |
| ८३ | ,, कोंकण (अ) | ५३२·५१ | ७६·५३ | ११८·५६ | ७८·५३ | ४९·६१ | ९३·५७ |
| ८४ | ,, कोंकण (ब) | ५३३·०५ | ७५·२० | १२०·१५ | ७७·७७ | ४९·०३ | ९४·७४ |
| ८५ | ,, कोंकण (क) | ५३८·०८ | ७६·०० | ११८·८४ | ७८·७९ | ४७·९२ | ९४·३८ |
| ८६ | ,, कर्नाटक | ५३६·५३ | ७७·०६ | ११७·७१ | ७६·७७ | ४९·९४ | ९५·७५ |

महाराष्ट्रांतील ह्या निरनिराळ्या जातींची एकमेकाशीं तुलना करण्याआधीं महाराष्ट्रांतील जातींची व हिंदुस्थानांतील इतर प्रांतांतील जातींची तुलना करणें महत्वाचें आहे. एकेका प्रदेशांतील बऱ्याच जाती घेऊन अशा तऱ्हेचा अभ्यास लखनौ विद्यापीठांतील प्राध्यापक डॉ. धीरेंद्र मुजुमदार ह्यांनीं गुजरात व उत्तर प्रदेश ह्या दोन प्रांतांचा केला आहे. आम्हीं (पुण्याचे प्रा. वि म. दांडेकर व मीं) घेतलेलीं सर्वच मापें त्यांनीं घेतलेलीं नाहींत. पण जीं कांहीं तिन्ही संशोधनांत सामान्य आहेत तीं घेऊन तुलना केली तर असें दिसून येतें कीं—

मस्तकाची लांबी




मस्तकाचे प्रमाण




मस्तकाची रुंदी




———— महाराष्ट्र
- - - - - उत्तर प्रदेश
—·— गुजरात

आकृति १०

उत्तर प्रदेशांतील सर्व जातींची डोक्याची लांबी व रुंदी अनुक्रमें १८६ ते १९२ मिलिमिटर व १३५ ते १४४ मिलिमिटर आहे. महाराष्ट्रांत तींच मापें १७७ ते १८८ आणि १३८ ते १४८ आहेत. म्हणजे उत्तर प्रदेशांतील लोकांचें डोकें लांब व अरुंद आहे आणि मराठी लोकांचें आंखूड व रुंद आहे. हा फरक कपालाच्या सापेक्ष प्रमाणावरून जास्त स्पष्ट होईल. उत्तर प्रदेशांत हा आंकडा ७२ ते ७५ आहे. म्हणजे ते लोक दीर्घ व अतिदीर्घकपाल आहेत. ह्या उलट महाराष्ट्रांत हा आंकडा ७५ ते ८० आहे. म्हणजे महाराष्ट्रांतील बहुसंख्य लोक मध्यमकपाल आहेत.

गुजरातेंत डोक्याची लांबी व रुंदी अनुक्रमें १८० ते १८५ व १३५ ते १५० मिलिमिटर आहे व सापेक्ष कपालप्रमाण ७५ ते ८३ भरतें. सर्वच मापें महाराष्ट्राच्या जवळ आहेत हें स्पष्टच आहे. त्यांतहि विशेष गोष्ट म्हणजे एक पारशी वगळून दक्षिण गुजरातचें कपाल प्रमाण ८० च्या वर नाहीं. म्हणजे महाराष्ट्राच्या फारच जवळ आहे. व जसजसें उत्तर गुजरातेंत जावें तसतशी डोक्याची रुंदी वाढत जाते. तरीहि महाराष्ट्राच्या मानानें गुजरातमध्यें रुंद डोक्याचें प्रमाण एकंदरीनें जास्त दिसतें (आकृति १०)







आकृति ११

डोक्याचें परिमाण ( घेर ) पाहिल्यास असें दिसतें कीं, तीनहि प्रांतांत तें जवळ जवळ सारखेंच आहे.

नाकाची लांबीरुंदी पाहिल्यास उत्तर प्रदेशांतील लोकांचें नाक जास्त लांब व जास्त रुंद आहे. गुजरातेंतील लोकांचें तितकेंच लांब पण अरुंद आहे. महाराष्ट्रीयांच्या मानानें गुजरात्यांचें नाक जास्त पातळ व वरधरीत आहे. ( आकृति ११ ) चेहऱ्याचा आकार पाहिला तर उत्तर प्रदेशांतील लोकांचे चेहरे लांब आहेत. मराठी लोकांचे रुंद आहेत. गुजरात्यांचे

महाराष्ट्रीयांच्या जवळ असले तरी थोडे जास्त लांबट आहेत. ( आकृति १२ ) म्हणजे डोक्याचा आकार व चेहऱ्याचा आकार ह्या बाबतींत महाराष्ट्र व उत्तर प्रदेश इतके भिन्न आहेत कीं, त्यांना युरोपीय वंशाच्या दोन निरनिराळ्या उपशाखांत घालावें लागेल. महाराष्ट्र व गुजरात, विशेषेंकरून दाक्षिणगुजरात, एकमेकांना इतके जवळ आहेत कीं, कदाचित् त्यांना एकाच शाखेंत घालावें लागेल. महाराष्ट्र व गुजरातमध्यें एक फरक म्हणजे महाराष्ट्रांत डोकें, नाक व चेहरा ह्यांच्या मापांत निरनिराळ्या

सबंध चेहरा




चेहऱ्याचा वरचा भाग




आकृति १२

जातींत फार अंतर आहे. गुजरातेंत तें तसें नाहीं. गुजरातेंत १८ जातींची पाहणी झाली आहे. त्यांत सध्यां हातीं आलेल्या माहितीवरून तरी असें दिसतें कीं, गुजरातेंतील मानवता जास्त एकसंध आहे व महाराष्ट्रांत निरनिराळ्या वंशांचें मिश्रण झालेलें आहे. महाराष्ट्राचें भौगोलिक स्थान व इतिहास लक्षांत घेतां यांत नवल वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. उलट इतके निरनिराळे मानवप्रकार एकत्र आणण्याचें कार्य ज्या संस्कृतीनें केलें तिच्या लोकसंग्रहाचें नवल वाटतें.

दक्षिण हिंदुस्थानांतही, विशेषतः तामीळनाड, केरळ व तेलंगण येथील लोक दीर्घकपाल आहेत. कर्नाटकांत महाराष्ट्राप्रमाणेंच मध्यम कपाल लोक बऱ्याच जमातींत आढळतात. ह्याचा अर्थ असा कीं, बव्हंशीं दीर्घकपाल अशा भारताच्या वस्तींत गुजरातचे पृथुकपाल लोक व महाराष्ट्राचे मध्यम-कपाल लोक निराळे पडतात. त्यांच्या भौगोलिक स्थानाकडे पाहिल्यास असें वाटतें कीं, मूळच्या दीर्घकपाल लोकांच्या वस्तींत बाहेरून आलेल्या साधारण रुंद डोक्याच्या लोकांनीं येऊन पाचर मारलेली आहे व हे बाहेरचे लोक कोठून तरी पश्चिमेकडून किंवा वायव्येकडून आले असले पाहिजेत. हे कोण ह्याविषयीं कांहीं तर्क करण्याआधीं महाराष्ट्रांतल्या जमातींची एक-मेकांशीं तुलना करून आंतल्या आंत कांहीं फरक आहेत कां तें पहाणें सोयीचें होईल.

पृष्ठ १३६ ते १४२ वर निरनिराळ्या मराठी जातींचीं मुख्य मुख्य मापें दिलीं आहेत तीं एकामागून एक तुलनेसाठीं घेऊं.

पहिलें माप डोक्याच्या घेराचें आहे. त्यावरून मस्तकाचा लहानमोठे-पणा आपणांस कळतो. ह्या मापावरून मराठी समाजाचे तीन गट पडतात. लहान डोक्याच्या जाती, मध्यम डोक्याच्या जाती व मोठ्या डोक्याच्या जाती.

**अति लहान डोकीं**:—घेर ५१८–५२५ मिलिमीटर—भिल्ल, बावने महार, आंध, माना, ठाकूर, खुटेकर-धनगर, मल्हार-कोळी, परीट, वारली.

**लहान डोकीं**:—घेर ५२६–५३२. आगरी, खैरे कुणबी, कोलाम, कोळी, कोरकू, कोहाळी, हाळबी, गोंड, गोवारी, तेली, ढीवर, चांभार, महार, मांग, गुरव, बारी, न्हावी, इतर सोनार, शिंपी, साळी, वंजारी, हाटकर–धनगर, भावसार, कांहीं मराठे.

**मध्यम डोकीं**:—घेर ५३२–५२९. तिरोळे, बहुसंख्य मराठे, गुजर, धनोजे, पोवार, कायस्थ प्रभु, पाठारे क्षत्रिय, वाडवळ, लेवा, फुलमाळी, चरक ब्राह्मण, बुरूड, देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण.

**मोठी डोकीं**:— घेर ५३९–५४६. भंडारी, वैश्यवाणी, दैवज्ञ सोनार, सोनकोळी, हळबी–कोष्टी, खत्री, त्वष्टाकासार, पाठारे, प्रभू, कऱ्हाडे, चित्पावन, सारस्वत.

ही यादी पाहिल्यास असें दिसून येतें कीं, पश्चिमेकडील सर्व वन्य जमाती म्हणजे वारली, मल्हार कोळी, सर्व भिल्ल व ठाकूर पहिल्या गटांत येतात. आंधांचें व मान्यांचें स्थान आदिवासींच्या फार जवळ आहे. बावने महारांतही आदिवासींचें मिश्रण असावें असें दिसतें. परीट व खुटेकर धनगर हे दोनच बाहेरचे गट ह्यांत येतात.

दुसऱ्या गटांत शेतकऱ्यांतील जरा कमी श्रेष्ठ समजल्या जाणाऱ्या कांहीं जाती ( आगरी, खैरे ), कांहीं पूर्वेकडील वन्य व तत्सम जाती, ( उदा. गोंड, गोवारी, हळबी, कोलाम, कोरकू ), अस्पृश्य, बलुतदार ( महार, मांग, चांभार ), इतर बलुतदार ( न्हावी, गुरव ), व कांहीं कारागीर जाती ( शिंपी, साळी, भावसार व इतर, ) वंजारी, हटकर-धनगर व कांहीं मराठे अशा जाती येतात. पूर्वेकडच्या गोंडांनीं राज्यें स्थापिल्याचें वर लिहिलेंच आहे. पूर्वेकडील वन्य लोक व इतर कारू जाती ह्यांचें स्थान पश्चिमेकडील वन्य व मुख्य शेतकरी ह्यांचेमध्यें आहे तें योग्यच वाटतें. हा सबंध गट वन्यांशीं मिश्र असावा असें वाटतें व हळूं हळूं गांवगाड्यांत त्यांना स्थान मिळालें असावें.

तिसऱ्या गटांत महाराष्ट्रांतील प्रमुख शेतकरी जाती व माळी ( मराठे, तिरोळे, गुजर, धनोजे, पोवार, लेवा, फुलमाळी, वाडवळ ), कांहीं धंदेवाईक जाती ( कायस्थ प्रभू व पाठारे क्षत्रिय ) व कांहीं ब्राह्मण ( चरक, देशस्थ ऋग्वेदी व माध्यंदिन ) हे येतात. ह्या गटांत समाजांतील स्थानाच्या दृष्टीनें बुरूडच जरा निराळे पडतात. मुख्य शेतकरी व त्याचे वंशपरंपरा भट आणि मुलकी काम करणारे कायस्थ हे एका गटांत पडलेले आहेत. शेवटच्या गटांत मुंबई किनाऱ्याच्या सर्व नागर जाती व भंडारी व सोन-कोळी येतात. ह्या दोनहि जाती शेतकी करणाऱ्या नव्हत व धंद्यानें नव्हे तरी प्रादेशिक दृष्ट्या त्या इतर जातींबरोबरच रहातात. फक्त अतिपूर्वेकडील हाळबी कोष्टी मात्र ह्या गटांत सर्वस्वीं विसंगत वाटतात.

डोक्याच्या आकृतीच्या दृष्टीनें दीर्घकपाल ( सापेक्ष कपालप्रमाण ७५–७७) व मध्यम कपाल ( ७७ ते ८० ) असे दोनच गट महाराष्ट्रांत पडतात. पैकीं दीर्घकपाल गटांत—खैरे व माना कुणबी, कोलाम, गोंड,

गोवारी, कोहाळी, गुजर, तेली, ढीवर, पोवार, बावने महार व हाळबी कोष्टी ह्या जवळ जवळ सर्व ( तिरोळे, कुणबी व ब्राह्मण ह्यांखेरीज ) अतिपूर्व महाराष्ट्रांतील जाती येतात. खानदेशांतील लेवा ह्यांतच येतात. पश्चिमेकडील जातींपैकीं सर्व भिल्ल, कोळी, आगरी, मल्हार कोळी, वारली न्हावी व कोकणाचे मराठे ह्यांत येतात.

बाकी उरलेल्या सर्व जाती, म्हणजे मुंबईच्या नागर जाती व मध्यमहाराष्ट्रांतील सर्व शेतकरी, ब्राह्मण व इतर जाती रुंदट डोक्याच्या म्हणजे मध्यमकपाल आहेत.

दीर्घकपाल जातींत—पोवार, लेवा, कोहाळी, वगैरे जाती उत्तरेकडच्या आहेत. बाकीच्या कांहीं वन्य व कांहीं शेतकरी जाती महाराष्ट्रांतील मूळ दीर्घकपाल जातींपैकीं असाव्यात, ( त्यांचें साधर्म्य उत्तरेकडील जातींशीं आहे, कीं दक्षिणेकडील हा प्रश्न सध्या येथेंच सोडूं. ) व मध्यमकपाल जातींनीं त्यांच्यांत पाचर मारून त्यांचे पूर्वेकडील व पश्चिमेकडील असे दोन विभाग करून सबंध मध्यमहाराष्ट्राचें पठार आत्मसात् केलेलें दिसतें.

तिसऱ्या व चवथ्या स्तंभांतील आंकड्यांवरून नाकाचा आकार कळतो. तिसऱ्या स्तंभांतील आंकडा जितका मोठा, तितकें नासिकामूल उंच असें आहे. दोन डोळ्यांच्या बाहेरच्या कोनांमधलें कंपासानें घेतलेलें अंतर व नाकाच्या वरून वाकणारी अरुंद पोलादी पट्टी ठेवून घेतलेलें अंतर ह्यांचें प्रमाण ह्या आंकड्यांनीं दिलेलें आहे. ह्यावरून असें दिसतें कीं, महाराष्ट्रांत सर्वांत उंच नाक मराठा जातींतील लोकांचें, विशेषतः घाटावरील मराठा जातींत आढळून येतें. माध्यंदिन ब्राह्मण व लेवा ह्या गटांतच येतात. त्यांच्या खालीं मुंबईच्या नागर जाती व पश्चिमेकडील ब्राह्मण व देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण येतात. नंतर माळी, बारी, त्यानंतर शिंपी, साळी, न्हावी, चांभार, वगैरे सर्व कारू जाती येतात व अगदीं शेवटीं वारली, मल्हार, कोळी, भिल्ल, गोंड, कोलाम, कोरकू, आंध, ठाकूर वगैरे वन्य जाती येतात. चवथ्या स्तंभांत नाकाच्या लांबीरुंदीचें प्रमाण दिलें आहे. त्यावरूनही नाकाच्या लांबीवरून वर्गवारी केल्यास वरील प्रमाणेंच वर्ग पडतात असें दिसून येईल.

पांचव्या स्तंभांत नासिकामूलापासून वरच्या दातांपर्यंतच्या उंचीचें प्रमाण दिलें आहे. हें प्रमाण नाकाच्या लांबीच्या प्रमाणाशीं फार मिळतें आहे. तरीही नाकाच्या लांबीच्या प्रमाणावरून जितके स्पष्ट गट पडतात तितके ह्या प्रमाणावरून पडत नाहींत. ह्या प्रमाणाचा मुख्य उपयोग म्हणजे ह्यामुळें समस्त मराठा जात इतर जातींहून निराळी पडते. कांहीं थोड्या अंशानें त्यांच्या तोंडाचा वरचा भाग इतर सर्व जातींहून लांबट आहे, म्हणजे तोंड उभट आहे.

उंचीच्या बाबतींत सर्व महाराष्ट्र मध्यम उंच (५ फूट ४ इंच) आहे. वन्य जातींच्या उंचीचें प्रमाण कमी आहे.

चेहेऱ्याची रुंदी व डोळ्याची रुंदी यांचें प्रमाण पाहिल्यास निरानिराळे गट स्पष्ट निरानिराळे पडत नाहींत. पण एक चटकन् लक्षांत येण्यासारखी गोष्ट म्हणजे कांहीं मोठ्या डोक्याच्या जमातीचे चेहेरे डोक्याच्या मानानें अरुंद आहेत. उदा. पाठारे क्षत्रिय, पाठारे प्रभू, कायस्थ, कऱ्हाडे, चित्पावन, सारस्वत, भंडारी, सोनकोळी, वगैरे पश्चिमेकडील जाती व माध्यंदिन, ऋग्वेदी, चरक वगैरे जातींत चेहेऱ्याची शेकडा रुंदी ( डोक्याच्या रुंदीच्या प्रमाणांत ) ८९ ते ९२ च्या आसपास आहे; व लांब डोक्याचे कोहाळी, गोंड, लेवा, बंजारी माना, खैरे वगैरे लोकांचा चेहरा डोक्याचे मानानें रुंद म्हणजे ९४ वर आहे. वऱ्हाडांतील तिरोळे, तेली, ढीवर, बारी हेही त्यांतच येतात. मराठा ह्या दोन्हींच्या मध्यें बसतात.

ह्या सर्व मापांचा एकत्र विचार केला तर असें दिसून येतें कीं, महाराष्ट्रांतील मानवांचे खालीलप्रमाणें वर्ग पडतात.

महाराष्ट्राच्या उत्तर सीमेवर, वायव्य कोपऱ्यांत व मधल्या डोंगरांच्या रांगांत राहणारे वन्य लोक इतर सर्व महाराष्ट्रीय जनतेपासून वेगळे पडतात. त्यांची उंची लहान, डोकीं लहान व लांब, नाकें रुंद व बसकीं असे हे लोक आहेत. ह्यांतही वारली, भिल्ल आदिकरून लोकांचीं डोकीं विशेष लहान व नाकें विशेष रुंद आहेत आणि पूर्वेकडील गोंड, गोवारी जरा वेगळ्या श्रेणींत बसतात. ह्यांतही कोरकू सर्वांत भिन्न आहेत. त्यांचें नाक जितकें लांब तितकेंच जवळ जवळ रुंद आहे, हे पूर्वेकडील खोंड वगैरे

वन्य जमातींपैकीं असावेत असा तर्क आहे. भिल्ल, वारली, गोंड वगैरे वन्य जमाती बहुधा मध्य हिंदुस्थानच्या अरण्यांतील मूळच्या रहिवासी असाव्यात. एकेकाळीं कदाचित् ते हिंदुस्थानभर पसरलेले असतील व जसजशी शेतकीप्रधान लोकांनीं जंगलांची तोड केली तसतसे ते उत्तरेकडून व दक्षिणेकडून मध्य हिंदुस्थानांतील निबिड अरण्यांत शिरले असावे असें वाटतें. निषाद, किरात वगैरे वन्य जातींचे उल्लेख अतिप्राचीन काळापासून संस्कृत व पाली वाङ्मयांत येतात. हे लोक सर्व एकाच मानववंशाचे होते व एकच भाषा बोलत होते कीं काय हें समजत नाहीं. सध्यां ते ज्या प्रदेशांत असतील तेथील प्रादेशिक भाषा बोलतात व तेथले रीतीरिवाज उचलतात. भारतांतील अतिप्राचीन वसाहतकार ते असावे असें दिसतें व त्यांचा अभ्यास वंशशास्त्रदृष्टया व समाजशास्त्रदृष्टया होणें फार निकडीचें व महत्त्वाचें काम आहे. सध्यां एवढेंच सांगतां येईल कीं, वर उल्लेखिलेल्या सर्व जमाती वंशशास्त्रदृष्टया ऑस्ट्रेलीय वा वेद्दीय वंशांत बसतात. ऑस्ट्रेलियापेक्षांहि वेद्दीय वंश त्यांच्यांत जास्त असावा असें वाटतें, कारण ऑस्ट्रेलियांत आढळणारें केसांचें विपुलत्व फारच थोड्या वन्य जमातींत दिसून येतें. कांहीं कांहीं व्यक्तींना केस ( दाढी, मिशा ) इतक्या कमी प्रमाणांत दिसतात कीं, आद्य मोंगोलीय वंशाचें मिश्रण त्यांत झालें असण्याचाही संभव आहे. मोंगोल वंशापैकीं आद्य मोंगोलियांत तिरके डोळे आढळतातच असें नाहीं. उदा. आसामांतील मोंगोल वंशीय खासी लोकांचे डोळे सरळच आहेत. विशेषतः वन्य स्त्रियांचीं गालफडें रुंद व हनुवटी फार चिंचोळी असते व त्यावरून आद्य मोंगोलीय मिश्रण अति प्राचीन काळीं झालें असावें असें वाटतें. पण ह्याव्यातिरिक्त शरीराच्या मापांत केवळ मोंगोलीय असें कांहीं दिसून येत नाहीं. नीग्रोसम प्रमाणें तर मुळींच नाहींत. ह्या वन्य जाती महाराष्ट्राच्या सीमेवर आहेत पण महाराष्ट्रीय जातींत त्यांचें मिश्रण झालें असावें इतका पुरावा आपल्या मापांवरून दिसून येतो आणि तो म्हणजे कांहीं शेती करणाऱ्या माना, खैरे वगैरे जमातींत आढळून येणारीं नाकाचीं प्रमाणें होत. ह्याच जातींच्या बरोबरीनें कांहीं कारागीर व हुन्नरी जाती व गांवकामगारहि आहेत. आज ज्या सामाजिक क्रिया प्रतिक्रिया चालल्या आहेत त्या पूर्वीही चालत

असल्या पाहिजेत. मुंबईच्या उत्तरेला केळवा माहीम, वसई, मनोर वगैरे पट्टयांतून वाडवळ अति हुशार बागाइतदार आहेत. त्यांच्या हाताखालीं पानमळे, केळींच्या बागा व भातशेतींत "वारली" राबतात व आतां ते सर्व बागाइतीचीं व भातशेती कामें उत्तम शिकले आहेत. वारली ही वन्य जात हळूंहळूं शेतकरी, नव्हे शेतमजूर, बनली आहे. हाळबी, माना, खैरे वगैरे जमातींचा असाच इतिहास आहे. पूर्वी शेतकरी येऊन नदीच्या खोऱ्यांतून जंगल काढून जमीन कसून गांवें वसवूं लागले तेव्हां बऱ्याच जंगली जमाती त्यांच्याकडे काम करूं लागल्या असतील, त्यांच्या स्त्रियांशीं शेतकऱ्यांचा संबंध आला असेल व शेतकऱ्यांना लागणाऱ्या अठरापगड जातींपैकीं कांहीं त्या मिश्र संततींतून निर्माण झाल्या असतील. हल्लींच्या सर्व जातींमध्यें (शेतकरी, ब्राह्मण, कारागीर वगैरे) अल्प प्रमाणांत वन्य जातींचें मिश्रण आढळतें. सबंध पूर्व महाराष्ट्रांत वन्य जातींचें प्राबल्य आढळतें व त्यामुळें तेथील इतर जातींत वन्य जातींचें मिश्रणही जास्त प्रमाणांत झालेलें दिसतें.

दुसऱ्या गटांत मुख्यत्वें शेतकरी येतात. ह्या शेतकऱ्यांत कांहीं दीर्घकपाल आहेत. ते पूर्वेकडे व पश्चिमेकडे आहेत. पूर्वेकडचे दीर्घकपाल कांहीं उत्तरेकडून आलेले दिसतात. कांहीं मूळचे असावेत. पश्चिमेकडचे मूळचे असावेत असें वाटतें. आगरी, कोंकण मराठा व कुणबी व कांहीं वाडवळ कोठून आले तें समजत नाहीं. पण तेहि मूळचे पश्चिम किनाऱ्यावरील रहिवासीच असावेतसें दिसतें.

मध्यमहाराष्ट्रांतील बलाढ्य शेतकरी जात मात्र मध्यमकपाल, उंच नाकाची अशी आहे. तिचें नांव मराठा. तिरोळे मध्यमकपालकत्वाच्या सीमेवर आहेत. नाकें मराठ्यांच्या मानानें रुंद आहेत. यावरून असें वाटतें कीं, तिरोळे वंशानें मराठ्यांपैकींच असावेत, मात्र पूर्व महाराष्ट्रांत त्यांचें तद्देशीय दीर्घकपाल व पृथुनास अशा वन्यांबरोबर मिश्रण झालेलें असावें. माध्यंदिन हा बहुसंख्य ब्राम्हणवर्ग सर्वस्वी मराठ्यांसारखाच आहे.

या वर्गाशीं संलग्न पण जरा मोठीं व जास्त रुंद (पण वंशशास्त्रदृष्ट्या मध्यमकपालत्वाच्या सीमेंतच बसणारीं) डोकीं असलेला असा एक,

शेतकरी नसलेला, निरनिराळ्या जातींचा अंतर्भाव झालेला, संमिश्र प्रादेशिक गट पश्चिमेकडे आहे. तोही मूळ मराठ्यांपैकींच असावा, पण मराठे महाराष्ट्रांत आंतवर पोचल्यामुळें, मूळच्या लोकांशीं मिश्रण झाल्यामुळें जरा निराळे झाले असतील. किंवा मराठ्यांमध्यें मूळच्या लोकांचें नव्हे, तर मागाहून आलेल्या रजपूतांपैकीं कांहीं गट समावल्यामुळें वा मिश्रण झाल्यामुळें त्यांचीं डोकीं किंचित् कमी रुंद व नाकें धरधरीत झालीं असतील व ह्या नागर गट तसाच राहिला असेल.

इतर जाती ह्या तीन गटांच्या मध्यें बसतात व त्यांचें स्थानही समाजशास्त्रदृष्ट्या युक्तच दिसतें. वन्य जातींच्या अगदीं जवळ आगरी, खैरे, माना वगैरे गट आहेत. महार चांभार व मांग एकमेकांच्या अगदीं जवळ व मराठा आणि वन्य ह्यांच्यामध्यें बसतात. माळी, तिरोळे, लेवा वगैरे जाती मराठ्यांच्या अगदीं जवळ आहेत. चरकांचें स्थान वन्य व मराठे ह्यांच्यामधलें आहे. माध्यंदिन मराठ्यांपासून जवळ जवळ अविभक्त आहेत, तर देशस्थ ऋग्वेदी हे वैश्य वाणी, मुंबई गट व मराठे ह्यांच्या दरम्यान आहेत.

ह्याचा अर्थ असा कीं, मराठा, तिरोळे, कायस्थ, पाठारे, जवळ जवळ सर्व ब्राम्हण ह्या जातींचें एकमेकांशीं शारीरिकदृष्ट्या इतकें साधर्म्य आहे कीं, ह्या सर्व जाती एका गटांत घालाव्या लागतील. ह्या जातींचें मूळच्या दीर्घमस्तक जातींशीं व कांहीं वन्य जातींशीं निरनिराळ्या प्रमाणांत मिश्रण होऊन इतर जाती झालेल्या दिसतात. कांहीं जाती अर्वाचीन काळांत उत्तरेकडून येऊन स्थायिक झालेल्या दिसतात. वंशदृष्ट्या जातींचे गट सामाजिक स्थानाप्रमाणें न पडतां साधारणपणें प्रादेशिक तत्वावर पडतात. मध्य महाराष्ट्राचें पठार, पूर्णा–वैनगंगेचें खोरें, कोंकण, मुंबईच्या नागर जाती व डोंगरी विभाग असे हे स्वाभाविक गट पडतात. डोक्याचें आकारमान पाहिलें तर मुंबईहून जसजसें पूर्वेकडे जावें तसतसें लांब डोक्याचें प्रमाण वाढत जातें, मुंबईच्या दक्षिणेस शेतकरी जातीहि दीर्घकपाल आहेत हें पाहिलें म्हणजे मध्यमकपाल लोक महाराष्ट्रांत कोठून घुसले तें लक्षांत येतें. आक्रमणाच्या ह्या विशिष्ट दिशेमुळेंच वर सांगित-

लेले मोठमोठे प्रादेशिक गट निर्माण झाले व ह्या तीन मुख्य गटांच्या-मध्यें इतर जातींची जी वर्गवारी आहे ती ह्या मुख्य गटाशीं त्या जातींचे असलेले जे सामाजिक संबंध आहेत त्यांवर अवलंबून आहे असें दिसतें. हे संबंध सामाजिक रचनेवर आधारलेले आहेत.

रजपूत लोक दीर्घमस्तक आहेत असें निरनिराळ्या संशोधकांच्या मापावरून दिसतें; त्या अर्थी मराठे रजपूत खासच नव्हेत असें आमच्या मापांनीं सिद्ध होतें. मग मराठे व इतर मराठी जाती आल्या कोठून हा प्रश्न शिल्लक रहातोच. मध्ययुगाच्या सुरवातीस रजपुतांचें नांव प्रथम ऐकूं येतें. नंतर गुर्जरांचें ऐकूं येतें व गुर्जर रजपुतांपैकींच एक टोळी असावी असें दिसतें. पण त्याच्याहि आधीं महाराष्ट्राच्या इतिहासांत अति प्राचीन काळीं महाराष्ट्राचे पहिले राजे जे शातवाहन ते पश्चिमेकडून येणाऱ्या शकांच्या आक्रमणाला तोंड देत होते असा इतिहास आहे. आर्यांच्या टोळ्या उत्तरेकडून दक्षिणेकडे ज्याप्रमाणें शतकेंच्या शतकें येत होत्या व जुन्या स्थायिक आर्यांचें जसें नव्यांशीं युद्ध होत होतें तसेंच शकांच्या बाबतींत झालें असणार. शक लोक उत्तरेकडून येऊन गुजरातेंतून महाराष्ट्रांत शिरले, ते एका लहानशा कालखंडांत नसून त्यांचें वांशिक आक्रमण कित्येक शतकें चाललेलें असण्याचा संभव आहे. ह्या शकांपैकींच अगोदर आलेल्या वंशांतील शातवाहन राजे असावेत असें दिसतें. ह्या राजांचें राज्य जरी प्रतिष्ठानीं होतें तरी सर्व महत्त्वाचे शिलालेख पश्चिमपट्टींत आहेत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे, व त्या शिलालेखांत स्वतःस महारठी व महारठिणी म्हणवणारे लोक, म्हणजेच मराठे असावे असा कयास करण्याजोगा आहे. रजपूत लोक हिंदुस्थानांत येण्याच्या आधीं कित्येक शतकें मराठी लोक महाराष्ट्रांत स्थाईक होऊन, राज्यें स्थापून, राहिले होते व ते इतिहासांत प्रसिद्धी पावलेल्या शक वंशापैकीं अगदीं पहिल्यानें आलेले वसाहतकार असावे असा तर्क करण्यास सध्यां हरकत दिसत नाहीं. शातवाहनकालीन उत्खननांत कांहीं सांगाडे व मनुष्याच्या डोक्याच्या कवट्या सांपडून त्यांचीं मापें घेतां आलीं तर हा प्रश्न संशय न उरतां सुटेल. पण शातवाहनकालींही लोक मृतांना जाळीत असत असें आतां-

पर्यंतच्या उत्खननांवरून दिसतें व म्हणून सांगाडे मिळण्याची आशा दुरावते. पण कधीं त्यावेळचे मानव–अवशेष सांपडणारच नाहींत असेंहि नक्की नाहीं व ते सांपडेपर्यंत हल्लींच्या तर्कावरच समाधान मानण्याखेरीज गत्यंतर दिसत नाहीं.



५

## मराठी कुटुंब

कुठल्याही समाजांतील कुटुंबव्यवस्था समजण्यासाठीं खालील गोष्टी कळ-ण्याची आवश्यकता आहे. कुटुंबांत कोणकोणत्या व्यक्तींचा समावेश होतो? निकटवर्ती कुटुंबीय कोण व दूरचे कुटुंबीय कोण ? व्यक्ती कुटुंबांत कशा येतात ? एकंदर नातेवाईक मंडळींचे एकमेकांशीं संबंध कशा तऱ्हेचे असतात ? नातेवाचक शब्द काय असतात ?

### इंग्रजी कुटुंबपद्धति

इंग्रज लोकांची कुटुंब व्यवस्था व नातेवाचक शब्द आपल्याकडच्या मानानें सुटसुटीत व समजावयास सोपे आहेत. सुरुवातीला तिचें स्वरूप थोडक्यांत सांगितलें म्हणजे भारतांतील कुटुंबाची रचना समजावयाला मदत होईल. इंग्लंडमध्यें सध्यां कुटुंब म्हटलें म्हणजे आई, बाप व लग्न न झालेलीं व स्वतः मिळवूं न लागलेलीं मुलें एवढींच एका घरांत दिसून येतात. वयांत आलेलीं व स्वतः मिळवूं लागलेलीं मुलेंसुद्धां लग्न होण्याचे आधीं सुद्धां शक्य तर नवें बिऱ्हाड करतात. जागेच्या अभावीं किंवा पैशाच्या टंचाईमुळें एखादें मूल लग्नानंतरही आई-बापांकडे रहाणें शक्य आहे पण एकंदरीनें तो अपवादच. त्या कुटुंबांत फादर ( बाप ), मदर ( आई ), सन् ( मुलगा ), डॉटर ( मुलगी ), ब्रदर ( भाऊ ), सिस्टर ( बहीण ), हस्बंड ( नवरा ) व वाइफ ( बायको ) एवढीं नातीं व स्वतंत्र नातेवाचक शब्द आढळतात. नवऱ्याचे किंवा बायकोचे इतर नातेवाईक घरांत नस-

त्यामुळें पुरुषानें लग्न करून नवरी घरीं आणली का बाईनें लग्न करून नवरा घरीं आणला हा प्रश्न पडतो. पण पुरुषानें लग्न करून आपल्या घरीं नवरी आणली हेंच म्हणणें सयुक्तिक आहे, कारण बाई लग्नानंतर पुरुषाचें आडनांव लावते, मुलें बापाचें आडनांव लावतात व मुलांचा पोशिंदा बहुधा पुरूष असतो. आईचे आईबाप, भावंडें व त्यांचीं मुलें आणि बापाचे आईबाप, भावंडें व त्यांचीं मुलें हीं नात्याचीं माणसें समजलीं जातात व त्यांची घरांत आवक जावक असते. आईच्या व बापाच्या वडिलांना फादर पासूनच साधलेला ग्रॅण्डफादर ( मोठा बाप ) व त्यांच्या आईला ग्रॅण्डमदर ( मोठी आई ) असे शब्द आहेत. बापाचा भाऊ व आईचा भाऊ ह्यांना अंकल म्हणतात व आईच्या भावांचीं व बहिणींचीं मुलें आणि बापाच्या भावांचीं व बहिणींचीं मुलें ( मुलगे व मुली दोन्हीही ) ह्यांना कझिन असा एकच शब्द आहे. भावाच्या व बहिणीच्या मुलाला नेव्ह्यू व मुलीला नीस म्हणतात. मुलाच्या व मुलीच्या मुलग्याला व मुलीला अनुक्रमें ग्रॅण्ड-सन् ( मोठा मुलगा ) व ग्रॅंड डॉटर ( मोठी मुलगी ) असे सन् ( मुलगा ) व डॉटर ( मुलगी ) ह्यांपासूनच साधलेले शब्द उपयोगितात. लग्नानें जडलेल्या नात्यांचे शब्द मूळच्या आई, बाप, भाऊ वगैरे शब्दांपासून पुढें " इन लॉ " ( कायद्यानें ) असा प्रत्यय लावून साधतात. उदा. डॉटर इन्–लॉ ( सून ), सन्–इन्–लॉ ( जांवई ), फादर-इन्-लॉ ( सासरा ), सिस्टर-इन्-लॉ ( भावाची बायको, नवऱ्याच्या भावाची बायको, बायकोची बहिण, नवऱ्याची बहीण ) ब्रदर-इन्-लॉ ( बहिणीचा नवरा, बायकोचा भाऊ, नवऱ्याचा भाऊ ) वगैरे.

वरील वर्णनावरून असें दिसून येईल कीं, नातेवाचक शब्द प्रत्यक्ष नात्यांच्यापेक्षां कमी आहेत. सर्वच भाषांतून असें आढळून येईल कीं, जेवढीं नातीं तेवढे शब्द कधींच नसतात. नात्यांच्या माणसांचे गट केलेले असतात व एकेका गटाला मिळून एक शब्द असतो. हे गट करण्याच्या पद्धति निरानिराळ्या समाजांत भिन्न भिन्न असतात. निरनिराळ्या पिढ्यां-प्रमाणें गट पडतात. उदा. पितरांची ( पितरौ = आईबाप ) पिढी. ह्यांत आई, बाप व त्यांचीं भावंडें येतात. ह्यांतहि आई व बाप ह्यांना

त्यांच्या भावंडांतून वेगळें केलेलें आहे. फादर व मदर आणि अंकल् व आन्ट् असा फरक केलेला आहे. कांहीं भाषांत हा फरक नसतो. साधारणपणें स्त्री नातेवाईक व पुरुष नातेवाईक ह्यांतही फरक असतो. उदा. अंकल्–आन्ट, ब्रदर–सिस्टर, पण सगळीकडे तो असतोच असें नाहीं. उदा. कझिन्. कझिन स्त्री किंवा पुरुष कोणीहि असूं शकेल. कझिन् हा शब्द इतक्या ठिकाणीं उपयोगितात कीं, साधारणपणें कोणीही लांबचें नातेवाईक म्हणजे कझिन् असा त्या शब्दाचा अर्थ झाला आहे. स्वतःच्या खालच्या पिढींत स्वतःचीं मुलें व भावाबहिणींचीं मुलें ह्यांत फरक केला आहे. कांहीं भाषांतून हा फरक मुळींच सांपडत नाहीं, तर कांहींत भावाचीं मुलें व बहिणीचीं मुलें असा भेदही दाखविणारे शब्द आहेत. निरनिराळ्या पिढ्यांतील नातेवाइकांना निरनिराळे शब्द असतात, एवढेंच नव्हे तर आपल्याच पिढींतील पण आपल्यापेक्षां वडील किंवा आपल्या-पेक्षां लहान नातेवाईक असल्यास त्यासाठींहि निरनिराळे शब्द असतात. ह्याशिवाय रक्ताचा संबंध व लग्नाचा संबंध वर दिलेल्या उदाहरणांत स्पष्ट दाखवलेला आहे. कांहीं ठिकाणीं असा भेद नातेवाचक शब्दांत दिसून येत नाहीं, तर कांहीं ठिकाणीं सूक्ष्मतर भेद दिसून येतात. भारतांतील जीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत त्यावरून हे सर्व फरक स्पष्ट होतील व इंग्रजी नातेवाचक शब्द किती थोडे आहेत तेंही लक्षांत येईल.

मराठीची आई जी संस्कृत त्यांतील वाङ्मय कित्येक शतकांचें आहे. आणि निरनिराळ्या काळच्या वाङ्मयांत निरनिराळे नातेवाचक शब्द व कुटुंबव्यवस्था आढळते. महाभारताच्या संशोधित आवृत्तींतील ( भीष्म पर्वापर्यंत ) शब्द पाहिल्यास खालील प्रकार दिसून येतात. ह्या शब्दांचे अर्थ कांहीं बाबतींत महाभारताव्यतिरिक्त इतर वाङ्मयाच्या साहाय्यानें विशद केलेले आहेत.

## महाभारतांतील कुटुंबपद्धति

आई ( मातृ ), बाप (पितृ), नवरा ( भर्तृ, पति ), बायको ( पत्नी, जाया ), मुलगा ( पुत्र ), मुलगी ( दुहितृ, पुत्री ), भाऊ ( भ्रातृ ), बहीण ( स्वसृ, भगिनी ) असे शब्द अत्यंत निकटवर्ती आप्तजनांसाठीं

सांपडतात. आईच्या बापाला मातामह व बापाच्या बापाला पितामह असे शब्द आहेत. आईच्या आईला व बापाच्या आईला ह्या दोन शब्दांचेंच स्त्रीलिंगी रूप त्यावेळीं रूढ असेल असें धरून चालण्यास हरकत नाहीं. ऋग्वेदांत महापिता म्हणजे इंग्रजींतल्या ग्रॅन्ड् फादरच्या धर्तीवर शब्द आढळतो. पितामहाच्या बापाला प्रपितामह असा शब्द आहे. पितामह आणि प्रपितामह हे दोन्ही शब्द अनेकवचनी किंवा एकवचनी " पूर्वज " ह्या अर्थींही आढळतात. पितामह हा शब्द बापाच्या चुलत्याला लावलेला ठिकठिकाणीं दिसतो. उदा. दुर्योधनादि धार्तराष्ट्र व धर्मार्जुनादि पांडव सर्वच भीष्माला पितामह म्हणतात. म्हणजे पितामह शब्द बापाचा बाप व त्याचीं भावंडें किंवा त्या किंवा वरच्या पिढीचा कोणीही नातेवाईक पुरुष एवढ्या सर्वांना लावीत. आईचे वडील व बापाचे वडील ह्यांत फरक केलेला दिसतो. चरियापिटक ह्या पाली ग्रंथांत महापिता हा शब्द बापाच्या थोरल्या भावाला उद्देशून वापरलेला एका ठिकाणीं आढळतो.

आईच्या भावाला मातुल हा शब्द आढळतो. पंचतंत्रांत बारंवार येणारा जास्त ग्रामीण शब्द ' माम ' किंवा ' मामक ' कोठेंही आढळत नाहीं. बापाच्या भावाला स्वतंत्र शब्द फक्त एकदांच द्रोणपर्वांत आला आहे. तो म्हणजे पितृव्य. पण महाभारतांत पांडव–धृतराष्ट्र ह्यांचें एकमेकांशीं व एकमेकांबद्दल संभाषण कित्येक वेळां येऊनहि चुलत्याला शब्द कोठें येत नाहीं. दर वेळीं पांडव धृतराष्ट्राला ' तात ' (पिता) अशा पितृवाचक नांवानें संबोधतात. व तीच जुनी पद्धत असावी असें वाटतें. वेदसंहितांतूनहि चुलत्याला शब्द नाहीं. मामीला शब्द नाहीं पण मातुलावरून स्त्रीलिंगी रूप प्रचारांत असावें असें धरावयास हरकत नाहीं. चुलत्याला जसा शब्द नाहीं तसा चुलतीलाहि नाहीं. पांडव गांधारीला 'मातर' अशीच हांक मारतांना दिसतात. आईच्या बहिणीला मातृष्वसा असा सामासिक शब्द व मातुर्भगिनी असा षष्ठी विभक्ती योजून केलेला शब्द व तसेच दोन शब्द पितृष्वसा व पितुःष्वसा असे बापाच्या बहिणीला आढळतात. म्हणजे इंग्रजींतील अंकल व आन्ट ह्या दोन शब्दांऐवजीं निरनिराळे पांच सहा शब्द महाभारतांत सांपडतात. मामाचा मुलगा व चुलत्याचा

मुलगा ह्यांना भ्रातृ म्हणजे भाऊ असाच शब्द आहे. भारतीय युद्धाला ' अस्मिन् भ्रातृणां विग्रहे देवगुह्ये ' असें म्हटलें आहे. दुर्योधनादि बंधु व पांडव एकमेकांना भ्रातृच म्हणतात. म्हणजे ब्रदर व कझिन् असे दोन शब्द आढळत नाहींत. चुलत्याला पितृवाचक शब्द आहेत हें पाहिलें म्हणजे चुलतभावाला भ्रातृवाचकच शब्द असावेत हें योग्यच आहे. मातुलाच्या मुलालाही भ्रातृ शब्द योजला आहे. मावशीच्या मुलीला मातृ-ष्वसेया असा शब्द आढळतो. आत्याच्या मुलाला पैतृष्वसेय असा शब्द आहे.

बहिणीच्या मुलीला स्वसेय व भागिनेय असे शब्द आहेत. भावाच्या मुलाला ( पुरुष बोलतांना ) पुत्रवाचक शब्द आहेत. धृतराष्ट्र पांडवांना प्रत्येक ठिकाणीं पुत्राः, पुत्रकाः असेच शब्द लावतो. स्वतःचा मुलगा व भावाचा मुलगा हे पुरुषाला समान आहेत. तसेंच बाप व चुलता ह्यांना समान शब्द आहेत. व सहोदर व चुलत भाऊ ह्यांनाही समान शब्द आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

त्याचप्रमाणें आईबाप व मुलें एवढेंच कुटुंब नसून कुटुंबीय मंडळींत पितृकुलांतील निरनिराळ्या पिढीचे पुरुष, त्यांच्या बायका व संतति असें मोठें कुटुंब होतें. मुली लग्न करून बाहेर जात. एकही मुलगा दत्तक दिल्याचें उदाहरण नाहीं, पण कुंतीला लहानपणींच नातेवाईक राजाला दिल्याचें उदाहरण आहे.

लग्नामुळें जडलेल्या नात्यांत मुख्य नातीं खालीलप्रमाणें आहेत. पति, पत्नी, स्नुषा ( सून ), वधू ( सून किंवा बायको ), ज्ञातिभार्या, श्वशुर, श्वश्रू, देवृ, ननान्द ( दीर व नणंद ), भ्रातृजाया–दारा ( भावाची बायको ), जामातृ ( जांवई ), स्याल ( बायकोचा भाऊ ), गुरु ( वडील—कोणीही वडील नातेवाईक ). ह्या नात्यांबद्दल कांहीं गोष्टी लक्षांत ठेवण्या-सारख्या आहेत. स्नुषा शब्द फक्त सून ह्या अर्थी आहे. वधू शब्द सून, बायको किंवा सासुरवाशीण ह्या अर्थी आहे. विशेषतः अनेकवचनांत सासुरवाशिणी असा अर्थ स्पष्ट दिसतो व म्हणून वधूजन किंवा वध्वः हा शब्द एका कुळांत बाहेरून आलेल्या, लग्नामुळें कुलांत आलेल्या, बायका

ह्या अर्थी वापरलेला आहे. ज्ञातिभार्या हा शब्द असाच आहे. ज्ञाति म्हणजे पितृकुलांतील पुरुष व त्यांपैकीं कोणाचीही बायको ती ज्ञातिभार्या. द्रौपदीला दासी म्हणून सभेंत आणलें त्याला उद्देशून "ज्ञातिभार्येला" कुणी असें वागवील कां असा प्रश्न ती विचारते. देवृ हा शब्द नवऱ्याच्या धाकट्या भावासाठीं उपयोजिला आहे. थोरल्याला संदर्भानें "गुरु" असा शब्द एक ठिकाणीं आहे व तें वचनही महत्त्वाचें आहे. धर्मराज म्हणतो कीं, ( महाभारत १-२०५-२७ ).

गुरोरनुप्रवेशो हि नोपघातो यवीयसः । यवीयसोनुप्रवेशो ज्येष्ठस्य विधिलोपकः ॥

धाकट्यानें थोरल्याच्या माघून स्त्रीला भोगण्यानें थोरल्याची प्रतिष्ठा कमी होत नाहीं. पण धाकट्याच्या मागून थोरल्यानें तसें करणें विधीला धरून नाहीं.

सुन्दोपसुन्दाख्यानांत एक वाक्य असें आहे. सुन्द ( थोरला भाऊ ) म्हणतो, "ही ( तिलोत्तमा ) माझी बायको व तुझी गुरु आहे." उपसुन्द म्हणतो, "( छे ) ही माझी बायको व तुझी सून आहे."

द्रौपदीला अर्जुनानें जिंकलें म्हणून त्याच्याशीं तिचें लग्न व्हावयाचें. धर्माचें मत असें कीं, ती सर्वांची बायको झाली पाहिजे. धृष्टद्युम्न ह्या प्रसंगीं म्हणतो कीं,—धाकट्याच्या बायकोकडे थोरला सद्वृत्त भाऊ कसा जाणार ? ह्यावर तोड म्हणून तिचें लग्न प्रथम धर्माशीं होतें. ( यवीयसः कथम् भार्यां ज्येष्ठो द्विजर्षभ भ्राह्मन् समभिवर्तेत सद्वृत्तः सन् तपोनिधे ) ह्यावरून असें दिसतें कीं, थोरल्या भावाच्या बायकोवर धाकट्याचा हक्क असे, पण धाकट्याच्या बायकोवर थोरल्याचा नसे. महाभारतांतील कांहीं उदाहरणांवरून असेंही दिसतें कीं, थोरल्या भावाला धाकट्या भावाची बायको क्वचित् प्रसंगीं मिळण्याचाही संभव होता. व्यासानें विचित्र-वीर्याच्या स्त्रियांशीं गर्भधारणेसाठीं संबंध ठेवला. कृष्णानें कर्णाला पांडवांच्या बाजूला मिळण्यासाठीं जीं नाना आमिषें दाखविलीं त्यांत द्रौपदीचा तूं सहावा नवरा होशील हेंही एक आमिष होतें. थोरल्या भावाआधीं लहानाचें लग्न होतां नये हा ऋग्वेदकालापासून आलेला दंडक, संपत्तीची वांटणी न होतां थोरल्यानें धाकट्यांचें एका कुटुंबांत पालन करण्याचा

प्रघात, थोरल्याच्या बायकोवर धाकट्यांचा हक्क, चुलता पुतण्या, चुलत-भाऊ ह्यांना स्वतंत्र नातेवाचक शब्दांचा अभाव व इतिहास पुराणांत सांपडणारीं आणखीं कांहीं विधानें ह्यांवरून मी असा कयास बांधला कीं, प्राचीन काळीं कुटुंबांत फक्त थोरल्या मुलानें लग्न करावयाचें व संपत्ती त्याच्याकडेच जावयाची, अशी पद्धति असावी व मागून कुटुंब संस्था उत्क्रान्त होऊन प्रत्येकाचें स्वतंत्र लग्न व प्रत्येकाला संपत्तींत स्वतंत्र वाटा अशी पद्धत आली. स्वतंत्र लग्नपद्धति कधीं आली ह्याचा अभ्यास होणें आवश्यक आहे. स्वतंत्र वांटा प्रथम मनूनें दिला. ( मनुः पुत्रेभ्यः दायं व्यभजत् ) असें दिसतें. तरीही महाभारतांत दायभागासाठीं भांडणाऱ्या भावांचा ठिकठिकाणीं निषेध केला आहे. फक्त थोरल्या भावाचें लग्न व्हावयाचें अशी पद्धत असेल तर देवृ शब्दाचा अर्थ " नवऱ्याचा धाकटा भाऊ " असाच असावा असें दिसतें. किंवा " नवऱ्याचा भाऊ " असाच अर्थ असला तरी नवरा सर्वांत थोरला असल्यामुळें इतर भाऊ धाकटेच असणार हें उघड आहे.

पितापुत्रांचें नातें केवळ सामाजिक संकेतावर उभारलेलें होतें. "पाणि-ग्रहस्य तनयः " ( १, ९८, ८ महाभारत ) म्हणजे ज्याच्याशीं लग्न झालें असेल त्याचा मुलगा ह्याच न्यायानें व्यासाचे मुलगे विचित्रवीर्याचे ठरले. निरनिराळ्या देवतांपासून झालेले कुंतीमाद्रीचे मुलगे पंडूचे ठरले. एवढेंच काय पण कुंवारपणीं झालेलें मूल, लग्नांतच गर्भवती असून मग लग्न झाल्यावर निपजलेलें मूल, लग्नाच्या बायकोला जारापासून झालेलें मूल हीं सर्व नवऱ्याचीं मुलें गणलीं जात. ह्यालाच " बीजक्षेत्र " न्याय म्हणतात. ज्याचें बीज त्याचें मूल असाही एक अत्यंत जुना दंडक दिसतो. पण त्याचा उपयोग लग्नाचे स्त्रीचे बाबतींत नसून लग्न न करतां एखाद्या बाईला मूल झालें तर तिच्या मुलाच्या बाबतींत करीत असें दिसतें त्याला ' अंगज न्याय ' म्हटल्यास चालेल. ' भस्त्रा माता पितुः पुत्रः येन जातः स एव सः "—आई म्हणजे एक पिशवी ( तिचें काम केवळ धारणेचें ). मुलगा बापाचाच. ज्यापासून उत्पन्न झाला तोच तो. ( आत्मा वै पुत्र नामासि ) ह्या न्यायानें शकुंतलेचा मुलगा दुष्यंताचा, शर्मिष्ठेचीं मुलें यया-तीचीं व वेश्यापुत्र युयुत्सु धृतराष्ट्राचा.

प्राचीन भारतीय कुटुंब व भारतीय नातेवाचक शब्द ह्यांवरून असें दिसतें कीं, रक्ताचीं नातीं व लग्नाचीं नातीं ह्यांना स्वतंत्र शब्द आहेत. मातृ, पितृ, स्वसृ वगैरे मूळ शब्दांपासून ते बनवलेले नाहींत. एकंदर पुरुष नातेवाइकांना जास्त शब्द आहेत.

विंध्योत्तर भारतांतील कुटुंबपद्धति

आज सबंध उत्तर हिंदुस्थानांतून जी कुटुंबव्यवस्था दिसते ती वर वर्णन केलेल्या प्राचीन भारतीय कुटुंबपद्धतींतूनच उत्क्रान्त झालेली आहे. नातेवाचक शब्द बहुतेक महाभारतांत सांपडतात तसे व कांहीं नवे बनवलेले आहेत. जे नवे आहेत, त्यांवरून पूर्वीच्या कुटुंबपद्धतींतील कांहीं गोष्टींवर प्रकाश पडतो. विन्ध्योत्तर भारतांतच गुजरातचा समावेश ह्या बाबतींत होतो.

उत्तर भारतांतील नातेवाचक शब्द खालीलप्रमाणें आहेत.

पिता ( पितृ ), माई ( मातृ ), पूत, बेटा ( पुत्र ), धुवा, बेटी ( मुलगी ), भाई ( भ्रातृ ), बेहेन ( भगिनी ), वर, मालिक ( नवरा ), जोरू, औरत, तीय ( बायको ). पती व पत्नी असेही शब्द पुस्तकांत आढळतात, बोलण्यांत आढळत नाहींत. ह्यांतील बहुतेक शब्द संस्कृतोद्भव आहेत. जोरू, मालिक हे शब्द अन्य भाषेंतील आहेत. बापाच्या भावाला स्वतंत्र असा एक शब्द नाहीं. थोरल्या भावाला ताउ ( तात ) व धाकट्याला चाचा ( काका ) असे शब्द आहेत. ताउ संस्कृतोद्भव असून बापाच्या समानार्थी आहे. चाचा व काका मूळचे भारतीय शब्द नाहींत, तुर्की आहेत, असें भाषाशास्त्रज्ञांचें मत आहे. हे दोनही शब्द मुसलमान हिंदुस्थानांत येण्याच्या आधींच्या वाङ्मयांत सांपडत नाहींत. आईच्या भावाला मामा म्हणतात. बापाच्या बहिणीला फुई ( पितृष्वसा-पिउच्छा-फुवा-ई ) व आईच्या बहिणीला मौसी ( मातृश्वसा-माउच्छा-मौसी ) असे शब्द आहेत. ताउची बायको ताई, चाचाची चाची, मामाची मामी, फुइचा नवरा बुवा उर्फ फुआ व मावशीचा नवरा मौसा होतो. म्हणजे इंग्रजींतील अंकल व आंट् ह्या शब्दांऐवजीं आठ शब्द

झाले. ज्यांत रक्ताच्या आंट्ला व लग्नानें झालेल्या आंटला निरानिराळे शब्द आहेत अशा हिंदी व तत्सम भाषांतच आपल्याकडील नेहमींचा विनोद " तुझ्या मामीचें लग्न झालें आहे का रे ? " शक्य आहे. वरच्या पिढीला दादा ( बापाचा बाप ), नाना ( आईचा बाप ) दादी व नानी ( त्यांच्या बायका ) अशीं नांवें आढळतात. मामा, चुलता, फुई व मौसी ह्यांच्या मुलांना भाई व बेहेन अशी भ्रातृ-भगिनीवाचकच नांवें आहेत. भावाच्या मुलांमुलींना भतीजा-भतीजी व बहिणीच्या मुलांमुलींना भाणेज व भाणजी अशीं नांवें आहेत. मुलीच्या मुलांमुलींना ढोटा-ढोटी ( दौहित्य-त्री ), मुलाच्या मुलांमुलींना पोता पोती ( पौत्र-त्री ) अशीं नांवें आहेत.

बायकोला व सुनेला वहू असें म्हणतात. गुजराती, बंगाली, हिंदी, राजस्तानी वगैरे भाषेंतून संस्कृतांतील स्नुषा शब्दाचा अजिबात लोप झाला आहे. पतोहू ( पुत्रवधू ) हाही शब्द लोकगीतांत आढळतो. मैथिलींत नुहा वा न्हू ( स्नुषा ) व पंजाबींत आणि सिंधींतहि नुहा असें रूप आढळतें. ससुर-सास ( सासरा व सासू ) असे शब्द आहेत. नवऱ्याच्या बहिणीला ननदी शब्द आहे, नवऱ्याच्या थोरल्या भावाला जेठ व धाकट्याला देवर असा शब्द आहे. जेठाची बायको ती जेठाणी व देवराची ती देवराणी. पुरुष थोरल्या भावाच्या बायकोला भौजाई अथवा भाभी म्हणतो. धाकट्या भावाच्या बायकोला भैहू ( भ्रातृ-वधू )-सुनेसारखी असलेली धाकट्याची बायको-असें नांव आहे व तें वर सांगितेल्या सुंदोपसुंद संवादाशीं जुळतें आहे. मैथिलींत व बंगालींत जेठ शब्दाला भासुर ( भ्रातृ-श्वशुर ) असा आणखी एक प्रतिशब्द आहे. नवऱ्याचा थोरला भाऊ हा सासऱ्यासारखा आहे असा त्याचा अर्थ होतो. संस्कृतांतील देवृ शब्द नवऱ्याच्या धाकट्या भावासाठीं उपयोगावा हें परंपरेला धरूनच आहे. त्याचप्रमाणें बापाच्या भावाला पितृवाचक शब्द असणें हेंही महाभारताप्रमाणेंच आहे. प्रत्येक भावाचें लग्न स्वतंत्रपणें होत असल्यामुळें नवऱ्याच्या जिवंतपणीं बाईला दिराशीं स्वतंत्रपणें संबंध ठेवतां येत नाहीं, पण दीर भावजईचें नातें तशा संबंधाचें असावें ह्याबद्दल पुष्कळ पुरावे

आढळतात. आजही विधवेचें लग्न दिराशीं व्हावें असा दंडक बऱ्याच जातींत आढळतो. " गरीबकी जोरु सबकी भाभी " ही म्हण बहुतेक सर्व उत्तरेकडच्या भाषांतून आढळते. "गरिबाची बायको बिचारी लाचार असते, कोणीही तिच्याशीं चेष्टा कराव्या, डोळे मोडावे " असा ह्या म्हणीचा अर्थ आहे. भाभी हा शब्द हल्लीं जरी आदरार्थी वापरतात तरी मध्ययुगांत तो तसा नव्हता. काठीआवाडनी जुनी वार्ताओ ( भाग २, हरगोविंद प्रेमशंकर त्रिवेदी ) ह्या पुस्तकांत जुन्या चारणगीतांच्या आधारावरून घेतलेली ' लाखण शीयडा ' नांवाची गोष्ट आहे. लाखण नांवाच्या राजानें एका सुंदर चारणीच्या रूपाला भुलून ' भाभी, माझा भाऊ, तुझा नवरा, कोठें आहे ? ' असा प्रश्न तिला विचारला. हें जहरी वचन ऐकतांच सतीला मूर्च्छा आली. ती म्हणाली, 'अरे, ज्या तुला आम्हीं चारणी म्हणजे आया–बहिणींसारख्या, त्यांना निर्लज्जासारखा भाभी म्हणतोस काय ! छे, ही विटंबना सहन करणें शक्य नाहीं.' असें बोलून तिनें आपले स्तन कापून राजाला पाठविले, स्वतःला जाळून घेतलें व राजाच्या सर्व कुळाला शापाग्नीनें जाळून टाकलें.* हिंदू हरपाळ (गुजरात तथा काठिआवाड देशनी वारता भा. ३ ) ह्या कथेंत हरपाळावर त्याच्या सावत्र आईचें, लीलावतीचें, प्रेम आहे असें दाखविलें आहे. तो राजधानींत आल्यावर लीलावतीनें दोन ' साकर लाडू ' करून आणले व हरपाळला म्हटलें कीं, एक लाडू तू मला भरव, दुसरा मी तुला भरवतें. हरपाळ उत्तरला, ' छी, आई हा व्यवहार मातापुत्राला उचित नाहीं. एकमेकांना घास भरवायचा तर दीयेरभाभी किंवा वरवधू भरवतील. ' वरवधूचें जें वर्तन तेंच दियेर–भाभीचें हें यावरून सिद्ध होतें. गुजरातेंत अगदीं ग्राम्य शिवी पुरुषाला देणें असल्यास ' दियोर ' असा शब्द उपयोगितात. उत्तर हिंदुस्था-

* स्तन उपटून काढून तो फेकावयाचा व त्यामुळें आग लागावयाची असा प्रकार " सीलपडिक्कारम् " ह्या जुन्या तामील काव्यांत वर्णिलेला आहे. हें काव्य ख्रिस्ती शकाच्या सुरवातीचें समजतात.

नांत होळी पूर्णिमेला वर्ष संपून रंगपंचमी चैत्रांत म्हणजे वसंतांत येते व तो दिवस वसंतोत्सव वा काममहोत्सव म्हणून साजरा करतात. स्त्रिया व पुरुष रंग खेळतात, सून व सासरा, जेठ व देवराणी ह्यांनीं कधींहि एकमेकांवर रंग उडवितां कामा नये, पण नवरा बायको आणि भाभी व देवर ह्यांनीं रंग खेळावा व अश्लील गाणीं म्हणावीं, असा प्रघात आहे. ह्या सर्वांवरून असें दिसून येतें कीं, उत्तरेच्या समाजांत जुनी कुटुंबव्यवस्था बऱ्याच अंशानें कायम आहे व कांहीं प्रघात जरी लोपले असले तरी त्यांचें स्वरूप कांहीं चालीरीतींत शिल्लक आहे.

' कुले कन्या प्रदानं च ' असें वाक्य कलिवर्ज्य प्रकरणांत आढळतें. कलियुगाआधीं ज्या चालीरीतींना समाजांत मान्यता होती त्यांपैकीं कांहीं कलियुगांत निषिद्ध आहेत. त्यांच्या यादींत ज्या निरनिराळ्या गोष्टी दिल्या आहेत. त्यांत ' कुले कन्या प्रदानं ', कुळांत मुलगी देणें, ही आहे. कुळांत मुलगी देणें, ह्याचा अर्थ वरील विवेचनावरून लक्षांत आला असेलच. मुलगी द्यावयाची ती अमक्या विशिष्ट मनुष्याची बायको म्हणून न देतां सर्व कुलाची वधू–भावांची मिळून बायको–म्हणून देणें असा ह्या वचनाचा अर्थ दिसतो. पूर्वीं अशी चाल होती व कलियुगांत हा प्रकार निषिद्ध आहे असा निष्कर्ष निघतो. उत्तर प्रांतांत हिमालयांतील कांहीं डोंगरी जाती वगळल्यास सर्व भावांची मिळून एक बायको करण्याचा प्रघात कोठेंही नाहीं. पण दियेर वट्टू ( विधवेचें दिराशीं लग्न ) मात्र बऱ्याच जातींत आढळतें. मागील प्रकरणांत निरनिराळ्या जातींबद्दल दिलेल्या टिपणांवरून असें आढळेल कीं, दियेरवट्टूंची चाल पूर्व महाराष्ट्रांतील जवळ जवळ सर्व अब्राह्मण जातींत दिसून येते.

उत्तरेकडे मामा, आत्या, मावशी व चुलता ह्यांच्या अपत्यांशीं लग्न करण्याचा प्रघात नाहीं. मामाच्या मुलीशीं लग्न करण्याचा प्रघात, कांहीं एक दोन जाती वगळल्यास, सर्व महाराष्ट्रांत आहे हें जातीविषयक टिपणांवरून लक्षांत आलें असेलच. " मातुलकन्या परिणय " पूर्वीच्या काळीं निषिद्ध होता व कलिवर्ज्य प्रकरणांत मातुलकन्या–परिणयाच्या निषेधाचा निषेध केलेला आहे. त्याचा अर्थ असा कीं, मामाच्या मुलीशीं

लग्न कलियुगांत केलें तरी चालेल. उत्तरेकडच्या धर्मशास्त्रकारांनीं दाक्षिणात्यांच्या सामाजिक रूढीला संमति दिली असा त्याचा अर्थ आहे. ऋग्वेदाच्या खिलसूत्रांत आतेच्या मुलीचा उल्लेख नवरी म्हणून येतो. ( Karandikar-Hindu Exogamy )

मराठी कुटुंब पद्धति

उत्तर भारतांतील कुटुंबपद्धतीप्रमाणेंच पितृपरंपरेवर आधारलेली मराठी मुलखांतील कुटुंबपद्धती आहे. नातेवाचक शब्द बरेचसे उत्तर भारतांतील भाषांप्रमाणेंच आहेत व कांहीं अगदीं नवीन आहेत. एकंदर नातेवाचक शब्दसंपत्ति इतर हिंदी भाषांपेक्षा मोठी दिसते. अत्यंत निकटवर्ती नातेवाइकांना खालील नांवें आहेत. बाप, आई, बहीण, मुलगा, मुलगी. आई हा शब्द मातेसाठीं उपयोजितात. हा शब्द संस्कृतोद्भव नसावा अशी पहिली कल्पना होती पण तो संस्कृतापासूनच आला ह्याचा पुरावा उडिया भाषेंतील नातेवाचक शब्द गोळा करतांता आढळला. उडिया भाषेंत ( ओरिसा उर्फ उत्कल उर्फ कलिंग देशाची भाषा ) बापाच्या व आईच्या बापाला ‘ अज्जा ’ असा शब्द आहे व अज्जाच्या बायकोला ‘ आई ’ शब्द आहे. अज्जा शब्दाचें मूळ संस्कृत रूप ‘ आर्य ’ असें आहे. प्राकृतांत त्यांचीं दोन रूपें संभवतात. एक ‘ अज्ज ’ व दुसरें ‘ अय्य ’. अज्जचें स्त्रीलिंगी रूप अज्जी ( मराठी आजी ), व अय्यचें ‘ आई ’ असें होईल. पैकीं उडिया भाषेंत आई रूप शिल्लक राहिलें व मराठींत आजी आलें. मराठीनें आई हा शब्द आजीऐवजीं मातेसाठीं उपयोजिला. पितृप्रधान कुटुंबांत सर्वांत थोरला पुरूष पिता किंवा महापिता ( पितामह ) असतो तेव्हां त्याची बायको ‘ आई ’ हें योग्यच आहे. मुलगा–मुलगी हीं कानडींतील मगन व मगळू ह्यांची मराठी रूपें असावीं असें दिसत नाहीं. मूळ शब्द मूल असून गा व गी हे लिंगदर्शक प्रत्यय आहेत. तसे कानडींतही आहेत. उदा. हुडुगा–हुडुगी पण मूल हा शब्द कानडींत नाहीं. कदाचित् संस्कृतोद्भव शब्द व कानडी प्रत्यय मिळून मुलगा शब्द झाला असेल. बापाच्या भावाला बापुल्या, चुलता, काका, धाकला बा, थोरला बा असे शब्द आहेत. चुलता शब्द चुल्ल ताओ = क्षुल्ल ताओ = क्षुद्र तात म्हणजे धाकटा

बाप ह्या अर्थीं आहे. बापाच्या भावाला जे शब्द आहेत ते बाप ह्या शब्दाला समानार्थी आहेत. काका हा शब्द चाचा प्रमाणेंच बाहेरून आलेला आहे. बापाच्या बहिणीला आत्या अथवा मावळण म्हणतात. आत्या शब्दाचें मूळ काय असावें कळत नाहीं. कदाचित् तें तात शब्दाचें स्त्रीलिंगी रूप असावें. ( तेता=आत्या असा शब्द वाल्ड देतो— (Vergleichendes Woerterbuch der indogermanischen Sprache, Vol, II p. 704. ) किंवा कानडींतील अत्ते शब्दापासून आल्याचा संभव जास्त दिसतो. कारण इतर संस्कृतोद्भव भाषांत व खुद्द संस्कृतांत मूळ शब्द पितृश्वसा व फुई, फुफी, पिशिमा असे शब्द आहेत. मावळण हा संस्कृत मातुलानी पासून आलेला आहे. संस्कृतांत त्याचा अर्थ मामाची बायको असा होतो. आईच्या भावाला मामा किंवा मावळा ( सं. मातुल ) असे शब्द आहेत. व आईच्या बहिणीला मावशी–माऊसी ( सं. मातृष्वसा=प्राकृत माऊच्छा ) असें म्हणतात. सारस्वत कोंकणी भाषेंत थोरल्या चुलत्याला म्हांत म्हणतात. म्हांत म्हणजे ज्येष्ठ किंवा मोठा. हा शब्द मराठींतील थोरला बाप ह्या अर्थीच वापरलेला आहे. त्याचप्रमाणें आईच्या थोरल्या बहिणीला म्हाव व धाकटया बहिणीला मावशी म्हणतात. म्हाव म्हणजे महा ( मोठी अव्वा, कानडी आई ) मोठी आई असा होतो. मावशी शब्द मातृश्वसा ह्या शब्दावरून आला नसून मातृपुच्छ ( माउच्छ ), ( आईच्या मागूनची=आईची धाकटी बहिण ) ह्या शब्दावरून आला असावा असा डॉ. कत्रे ह्यांचा तर्क आहे. पुढें येणाऱ्या मावशी शब्दाचें विवेचन पाहिल्यास ह्या तर्काला बळकटी येते. चुलत्याच्या बायकोला चुलती, काकी, पाच्ची ( सारस्वतांत ) आत्याच्या नवऱ्याला मामा उर्फ मावळा, मामाच्या बायकोला मामी किंवा मावळण व मावशीच्या नवऱ्याला मावसा व काका असे शब्द आहेत. उत्तर भारतांतील शब्द व मराठी शब्द ह्यांतील फरक म्हणजे उत्तर प्रदेशांत माता पितरांचीं भावंडें व त्यांचे लग्नाचे जोडीदार मिळून आठ शब्द होतात. मराठींत ते आठ शब्द तर आहेतच पण त्याशिवाय नेहमींच्या प्रचारांतले दुसरे कांहीं शब्द असे आहेत कीं, त्यामुळें मातापितरांच्या भावंडांत

विशिष्ट गट पडतात व नातेवाइकांच्या चार जोड्यांऐवजीं दोनच मिळतात. मावशीच्या नवऱ्याला चुलता म्हटल्यानें आईची बहीण व बापाचा भाऊ ह्यांची जोडी जमते, आत्याला मावळण म्हटल्यानें व आत्याच्या नवऱ्याला मामा म्हटल्यानें आईचा भाऊ व बापाची बहीण अशी जोडी जमते व मावसा–मावशी=काका–काकू आणि आत्या–आतोबा=मामा–मामी असें समीकरण मिळून इंग्रजी शब्द वापरल्यास दोनच " अंकल " व दोनच " आन्ट् " रहातात. ( इंग्रजींतील " अंकल " व " आन्ट " हे नातेवाचक शब्द समूहानें उपयोगण्यास छान आहेत. त्यांच्यावरून मिळणारा व्यापक अर्थ—मातापितरांचीं भावंडें व त्यांचे लग्नाचे जोडीदार-- भारतीय भाषेंतील कुठच्याही शब्दांत आढळत नाहीं. ) पितृपिढींतील पितरांखेरीज नातेवाइकांत ह्याप्रमाणें दोनच गट पडतात. स्वतःच्या पिढींतील नातेवाइकांना खालील शब्द आहेत. भाऊ व बहीण आणि दोन्ही मिळून " भावंडें " असे शब्द आहेत. मामा, मावशी, आत्या व चुलता ह्यांच्या मुलांना कांहीं लोक मामेभाऊ–बहीण, मावस भाऊ–बहीण आतेभाऊ–बहीण व चुलत भाऊ–बहीण असें म्हणतात. पण हा वाक्प्रचार अब्राह्मणांत रूढ नाहीं. चुलत्याच्या व मावशीच्या मुलांना भावंडें म्हणावयाचें व मामाच्या आणि आत्याच्या मुलांना मेहुणी–मेव्हणी ( मेहुणा व मेहुणी ) म्हणावयाचें असा प्रघात आहे. म्हणजे वरच्या पिढींत जसे दोन गट पडतात तसे स्वतःच्या पिढींत सहोदराखेरीजच्या नातेवाइकांत भावंडें व मेव्हणे असे दोन गट पडतात. " मेहूण " शब्द संस्कृत " मिथुन " जोडपें ह्या शब्दापासून साधलेला आहे. नातेवाचक अर्थाशिवाय फक्त जोडपें ह्या अर्थीही तो शब्द मराठींत सर्रास आढळतो. दंपती जेवावयास बोलवावयाचीं असतील तर " मेहूण सांगणें " असा वाक्प्रचार आहे. ज्या मुलांना मेहुणी असें म्हणतात त्यांनाच वेळ प्रसंगीं व कित्येक लोकगीतांतून भावोजी, दीर व वहिनी असें म्हटलेलेंही आढळतें. मामामामींबद्दल पुष्कळ गाणीं मराठींत आहेत व त्यांतून एकदम दीर व भावोजी हे शब्द येतात. ते नवऱ्याच्या भावाला उद्देशून नसून मामाच्या मुलाला उद्देशून असावे असें वाटतें. असें वाटण्याचें आणखी एक कारण म्हणजे स्वतः चौकशी करीत असतां बऱ्याच मंडळींनीं दीर,

भावजी व वहिनी हे शब्द मेहुणा-मेहुणीला समानार्थी म्हणून सांगितले. कानडीमध्येंही भावाची-बायको व आत्याची मुलगी ह्यांना " अत्तिगे " असा एकच शब्द आहे. " रुसला कां भावोजी, घरीं का याना, मसी बोलाना " हें एका लावणींतील ध्रुपद, किंवा " अग वहिनी ग दो दिवसाची ज्वानी, जसें नदीचें पाणी जाईल वसरूनी " ह्या ओळी किंवा इतर लावणींत " वहिनी ग " किंवा " भावोजी " अशीं जीं संबोधनें आढळतात तीं मेहुणामेहुणींच्या नात्याचीं असून नवऱ्याचा भाऊ किंवा भावाची बायको ह्या नात्याचीं द्योतक दिसत नाहींत. मामा-मामीबद्दलचीं मराठी लोकगीतें कानडींतून आलेलीं दिसतात. त्यांतही दीर म्हणजे कानडी मैदुन शब्दाचें भाषांतर अतएव, मेहुणा, असाच अर्थ अभिप्रेत आहे.

आपल्या खालच्या पिढींतील ( पुत्रपिढी ) नातेवाइकांना मुलगा—मुलगी ह्या संज्ञा आहेत. भावाच्या मुलाबद्दल बोलतांना पुरूष पुतण्या, पुतणी, ल्योक, लेक किंवा धाडी-धुवडी असे शब्द उपयोजतो. बहिणीच्या मुलांबद्दल बोलतांना बाई हेच शब्द योजते. पुतण्या शब्द पुत्रपासूनच साधलेला आहे. धाडी किंवा धुवडी शब्द दुहितृ (सं. मुलगी) शब्दापासून साधलेला आहे. ल्योक किंवा लेक शब्दांचें मूळ माहित नाहीं. दोन्ही शब्द पुत्र व कन्या ह्यांना लावतात. भाऊ बहिणीच्या मुलांबद्दल, व बहिण भावाच्या मुलांबद्दल बोलतांना भाचाभाची असें म्हणतात. बोलणारा स्त्री किंवा पुरुष आहे व ज्याबद्दल बोलतो तीं मुलें भावाचीं कां बहिणीचीं आहेत ह्यावरून नात्यांत दोन गट पडतात. समानलिंगी सहोदराचीं मुलें पुत्रवत् व दुहितृवत् असतात व असमानलिंगी सहोदराचीं मुलें भाचाभाची होतात असें दिसतें.

चुलता चुलती हे शब्द मातृपितृवाचक ( क्षुल्लतात ) आहेत हें आपण वर पाहिलें. म्हणजे तीन पिढ्यांच्या नातेवाइकांत कांहीं विशिष्ट तत्त्वावर गट पाडलेले आहेत. ( १ ) आईबाप व तत्सम नातेवाईक, ( २ ) आईबापांच्या पिढीचे पण त्यांच्यासारखे नसलेले नातेवाईक. पहिल्या गटांत आई, आईची बहीण व तिचा नवरा, बाप, बापाचा भाऊ व त्याची बायको एवढे नातेवाईक येतात. आईचें समानलिंगी भावंड ( आईची

बहीण ) व बापाचें समानलिंगी भावंड ( बापाचा भाऊ ) आणि त्यांचे लग्नाचे जोडीदार हे मातृपितृसमान होतात. दुसऱ्या गटांत आईचा भाऊ व त्याची बायको आणि बापाची बहीण व तिचा नवरा येतात. आई-बापांचे असमानलिंगी सहोदर व त्यांचे जोडीदार मिळून हा गट होतो. ह्याच अनुषंगानें दुसऱ्या कांहीं नातेवाचक शब्दांचा उल्लेख येथें होणें जरूर आहे. अर्धमागधी वाङ्मयांत चुल्लमाऊ ( चुल्ल = क्षुल्ल = धाकटी, माऊ = मातृ = आई = धाकटी आई म्हणजेच चुलत आई किंवा चुलती ) हा शब्द सावत्र आईसाठीं उपयोजला आहे मराठी वाङ्मयांत मावशी शब्दाचा अर्थ एका जुन्या काव्यांत सावत्र आई असा आहे. ( ध्रुव पित्यानें अंकि बैसाविला, परि माउसियेनें ढकलिला—कथाकल्पतरु ७–१०–८ ). चुल्लमाऊ म्हणजे धाकटी आई—आईची धाकटी सवत. पुरुषाला बायकोच्या बहिणीशीं लग्न करण्याचा हक्क आहे हें " आई मेली कीं बाप मावसा " ह्या म्हणींत स्पष्ट झालें आहे. मावशीच्या नवऱ्याला चुलता म्हणण्याचा प्रघात दोन भावांनीं दोन बहिणी करण्यावरून पडला असण्याचा संभव आहे.

स्वतःच्या पिढींत वरील पहिल्या गटांतील नातेवाइकांचीं मुलें भाऊ-बहीण किंवा भावंडें होतात व दुसऱ्या गटांतील नातेवाइकांचीं मुलें मेहुणीं ( लग्नाचीं जोडीदार ) होतात. तसेंच खालच्या पिढींत सर्व भावंडांचीं मुलें पुत्रवत् न होतां समानलिंगी भावंडांचीं मुलें पुत्रवत् होतात व असमानलिंगी भावंडांचीं मुलें इतर ( भाचाभाची ) संज्ञा पावतात. चुलता हा शब्द महाभारतीय कुटुंबपद्धतीला जुळता आहे व मराठी कुटुंबपद्धतीचा उत्तरेकडील संबंध दर्शवतो. मावशीचें बापाशीं किंवा चुलत्याशीं लग्न होणें व त्यांचीं मुलें भ्रातृदुहितृवत् व्हावीं हेंही उत्तरेकडच्या कुटुंबपद्धतींत जुळतेंच आहे. पण मामा—आत्याचा व त्यांच्या अपत्यांचा निराळा गट व मामाची बायको आत्या अशा संज्ञा मात्र उत्तरेकडच्या कुटुंबपद्धतीला मुळींच जुळत नाहींत. एकमेकांच्या बहिणी एकमेकांना देण्याच्या साटेलोटे पद्धतीनें विवाह ज्या समाजांत होईल तेथेंच आत्याचा नवरा मामा व मामाची बायको आत्या हें समीकरण जुळेल. अशी पद्धत उत्तरेकडे नाहीं. दक्षिणेकडे

द्राविड देशांत अब्राम्हणांत सर्वत्र आहे. महाराष्ट्रांत फक्त एक दोन जमातींत आहे. इतरांत नाहीं. नातेवाचक संज्ञांची ही पद्धत मराठी लोकांनीं द्राविडांकडून उचललेली दिसते त्याचप्रमाणें मामाच्या किंवा आत्याच्या मुलीशीं लग्न होत असल्यास तिला मेहुणी म्हणणें सयुक्तिक दिसतें. द्राविड देशांत मामा आतेचा नवरा होत असल्यामुळें मामाची मुलगी तीच आत्याची मुलगी होते व तिच्याशीं लग्न करण्याची पद्धत आहे. जरी आते-मामाचें लग्न झालें नसलें तरी आतेच्या मुलीशीं व मामाच्या मुलीशीं लग्न करण्याचा प्रघात आहे. महाराष्ट्रांत मामाच्या मुलीशीं लग्न करण्याचा प्रघात (एक दोन जाती वगळल्यास) सर्वत्र दिसून येतो. आतेच्या मुलीशीं लग्नाची पद्धत नाहीं. फक्त एकदोन जातींतच असें लग्न होतें. तरीही आतेचीं व मामाचीं मुलें मेव्हणींच होतात. बहीण, भावाची मुलगी सून करून घेते व बहिणीचीं व भावाचीं मुलें लग्नाचीं जोडीदार म्हणून मेव्हणीं हेंही ठीकच आहे. त्याचप्रमाणें पुत्रापासून फरक दर्शवणारे भाचाभाची हे शब्दही ह्या प्रघाताला जुळतेच आहेत. लग्नानें जुळलेल्या नातेवाइकांचीं नांवें काय आहेत हें पहाण्याआधीं रक्ताच्या नात्याच्या इतर कांहीं नातेवाइकांना काय संज्ञा आहेत तें थोडक्यांत पाहूं. आईच्या व वडलांच्या मातापितरांना भिन्न भिन्न शब्द नसून आजा-आजोबा व आजी असे शब्द आहेत. आजा हा शब्द अज्ज, आर्य ह्या शब्दापासून आला असून तो मूळ आईच्या वडिलांना लावलेला होता. आजही आजोळ (आईचें माहेर), आजा-पडवा (पुरुषानें आपल्या आईच्या वडिलांचें श्राद्ध करावयाचें तो दिवस), ह्या शब्दांत जुना अर्थ दिसतो. वडिलांच्या भावाला जसा लहान बाप (चुलता) म्हणतात तसेंच वडिलांच्या आई-वडिलांना थोरले बाबा व थोरली आई म्हणण्याचा प्रघात अजूनही दिसतो. वडिलांच्या मातापितरांना मातृपितृवाचकच शब्द असावेत व कधींतरी अज्ज-आजा हा शब्द पितामहाला उपयोगण्याचा प्रघात सुरू झाला असावा. ज्ञानेश्वरींत आजा शब्द मातामह ह्या अर्थीच आलेला आहे. ( ...जै अहंकार-तनूसी वालभ पडिले ।। तै इच्छा कुमरी झाली । मग ते कामाचिया तारुण्या आली । तेथ द्वेषेसी मांडली बराडीक ।। तया दोघांस्तव जन्मला । ऐसा द्वंद्वमोह जाला । मग

ते आजेनें वाढविला । अहंकारें ॥ द्वंद्वमोह हा अहंकाराची मुलगी इच्छा हिचा मुलगा. ( आजा=मातामह. ) ज्ञानेश्वरी अ. ७.१६५-१६७.

भीष्माला पितामहच म्हटलें आहे. पण " बापासि बाप न म्हणे त्यासि होय काय आजोबा " ह्या प्रसिद्ध उक्तींत आजोबा = बापाचा बाप हाच अर्थ विहित आहे. " अनंत कोचे ते आतोबासांचे आजे " ह्या महानुभावीय ' स्मृतिस्थळ ' ग्रंथांत आजा ह्या शब्दाचा अर्थ बरोबर ध्यानांत येत नाहीं.

आजाच्या आईवडिलांना पणजोबा-पणजी, पडआजा-पडआजी हे शब्द आहेत. पण किंवा पड हा संस्कृतांतील प्रपितामह शब्दांतील प्र प्रत्ययापासूनच आलेला आहे. पणजोबाच्या आईवडिलांना खापरपणजा-जी, निपणजा-जी, शेणजा-जी, अशीं चमत्कारिक नांवें आढळतात. नि हा प्रत्यय नकारार्थी आहे. खापर शब्द अशुभ सूचक आहे. शेणजा शब्द सारस्वतांत आढळतो. त्यांच्या सांगण्यांतही असें आढळलें कीं, तोही अशुभ सूचक आहे. पणतू पहाणें, एखाद्याचे पणजोबा ( पित्याच्या पित्याचा पिता ) जिवंत असणें हें महत्भाग्याचें लक्षण समजतात. पण त्या पुढची पिढी पाहूं नये असा समज आहे. त्याचेंच निदर्शक हे शब्द असावेत. बाप, आजा, पणजा, खापरपणजा ह्याचप्रमाणें खालच्या पिढीचे मुलगा, नातू ( सं. नप्तृ ), पणतू ( सं. प्रनप्तृ ) व खापरपणतू असे शब्द आहेत. खापरपंतवंडाचें तोंड पाहूं नये असा समज आहे. स्वतः मध्य कल्पून बाप, आजा, पणजा अशा तीन वरच्या पिढया आणि पुत्र, नातू व पणतू अशा खालच्या तीन मिळून सात पुरुष होतात. त्याच्यावर व खालीं पिढया तुटल्या, संबंध राहिला नाहीं हें दर्शविण्याचा उद्देश खापर व नि वगैरे प्रत्ययांत दिसतो. कोठच्याही पुरुषाला खापरपणतू दिसूं नये ह्या दंडकानें एका वेळीं एका घरांत चार पिढयांपेक्षां जास्त पुरूष असत नाहींत असा कयास दिसतो. ' शतायुर्वै पुरुषः ' ह्या नात्यानें सुद्धां पंचवीस वर्षांची एक पिढी धरली तरी एका घरांत एका वेळीं चार पिढयांवर पुरूष नांदतांना सहसा दिसत नाहींत.

आतां लग्नाच्या संबंधानें जुळलेलीं नातीं व त्यांना मराठी भाषेंत असलेले

शब्द ह्यांची थोडी छाननी करूं या.संस्कृतांतील पति-पत्नी, भर्ता-भार्या (भारजा –बायकांच्या गाण्यांतून)हे शब्द आढळले तरी खास मराठी शब्द नवरा-बायको असे आहेत. नवरा शब्द नव + वर = नववर शब्दापासून आलेला दिसतो. बायको शब्द बाई शब्दापासून साधलेला आहे. वस्तुपाल तेजपालच्या वेळच्या शिलालेखांतून बाई हा शब्द पहिल्यानें आढळतो. “ बाई षोडलदेवी,” “ बाई बयजुका ” “ बाई माऊ उर्फ माकु ” अशी वस्तु-पालाच्या बहिणींचीं नांवें दिलीं आहेत. हे सर्व उल्लेख सन १२२० ते १२५० च्या दरम्यानचे आहेत. बाई हा शब्द अत्यंत आदरार्थी वापरलेला दिसतो. नांवापुढें देवी लावूनही मागें बाई लावण्याची आवश्यकता भासली. गुजरातेंत आज स्त्रियांच्या नांवापुढें किंवा मागें बाई लावण्याची चाल नाहीं. महाराष्ट्रांत बाइसा असें उपपद स्त्री नामापुढें महानुभावीय वाङ्मयांत लावलेलें आढळतें व आजही स्त्री नामापुढें आदरार्थी “ बाई ” लावतात. कोंकणी भाषेंत ( ही गुजरातीला जवळची आहे म्हणतात ) बाई असें लावण्याची चाल आज आहे. महाराष्ट्रांत “ बाई ” असें थोरल्या जावेला म्हणण्याचा प्रघात आहे. मुलींना नांव किंवा लाडकें नांव जसें ताई, माई देतात तसें बाई, बाया देण्याचीहि रीत आहे. द्रावीड देशांत बाई शब्द रूढ नाहीं. स्त्रीनामापुढें आदरार्थी अम्मा किंवा अव्वा लावण्याचा प्रघात आहे. बाई-शब्दाचा नक्की अर्थ काय असावा हें माहीत नाहीं. पण तो मातृवाचक असावा असें वाटतें. माई हा शब्द खुद्द मातृपासूनच साधलेला आहे. ताई हा शब्द “ तात = बाप ” ह्याचें स्त्रीलिंगी रूप आहे. हिंदी भाषेंत चुलत्याला ताऊ ( तात ) व चुलतीला ताई असे शब्द आहेत. त्याचप्रमाणें “ बाई ” हें बाप किंवा बा म्हणजे तात ह्याचें स्त्रीलिंगी रूप असावें असें दिसतें. पूर्वी महानुभाव वाङ्मयांत पुरुषांच्या नांवापुढें बा–बास असा प्रत्यय लावीत. त्याचेंच स्त्रीलिंगी रूप बाई. जरी मूळ बाई शब्द गुजरातेंत लुप्त झाला तरी त्याचें लघुरूप “ बा ” मातृवाचक अर्थानें आजही प्रचारांत आहे. पुढें पुढें मूळ अर्थ जाऊन नुसतें उपपद व मग स्त्री ह्या अर्थी स्वतंत्र शब्द झाला व अशा तऱ्हेनें मराठी बाई शब्द सिद्ध झाला. बाई म्हणजे कोणतीही

स्त्री, पण बायको म्हणजे पत्नी असा सूक्ष्म भेद निघतो, पण तो निरपवाद नाहीं. कारण " बायको माणूस " ह्या प्रयोगांत बायको शब्द नातेवाचक नसून केवळ स्त्रीवाचक आहे. संस्कृतांतील जायापति किंवा पतिपत्नी हे शब्द केवळ स्त्रीपुरुष वाचक नव्हते. ते जाऊन मराठींत त्याऐवजीं दुसरे शब्द आले. ( बाई शब्द मूळ तुर्की आहे असें सुनीतिकुमार चतर्जींचें मत आहे. बप्प असा मूळ शब्द आपलेकडे इ. सनाच्या सातव्या शतका-पासून सांपडतो व त्याचें बाप, बावा झालें असावें. पण बाई हें त्याचें स्त्रीलिंग नव्हे. तो एक स्वतंत्र शब्द आहे व तो परकीय आहे असें त्यांचें म्हणणें आहे. ) सासूसासरा ( श्वश्रू–श्वशुर ), दीर ( देवृ ), नणंद ( ननांदृ ), सून ( स्नुषा ), जांवई ( जामातृ ) हे सर्व शब्द अगदीं थेट ऋग्वेदकाला-पासून आलेल्या मूळ संस्कृत शब्दापासून साधलेले आहेत. उत्तरेकडे नाहींसा झालेला स्नुषा शब्दहि मराठींत टिकून आहे. जाऊ ( नवऱ्याच्या भावाची बायको, सं. जामी किंवा यातृ ) हा शब्दही मूळ संस्कृतांतलाच आहे. जेठाणी, देवराणी असे शब्द नाहींत. पण ह्याखेरीज इतरहि शब्द ह्याच नात्यांना आहेत.

संस्कृत नातेवाचक शब्दांत रक्ताच्या नात्यांच्या माणसांना योजलेले शब्द व लग्नाच्या नातेवाइकांना योजलेले शब्द हे सर्वस्वीं स्वतंत्र आहेत. एका गटाचे शब्द दुसऱ्या गटांत मुळींच येत नाहींत. मराठींत मात्र असें आढळतें कीं वर दिलेल्या, संस्कृतामधून परंपरागत आलेल्या, शब्दांखेरीज बोलभाषेंत असे शब्द आहेत कीं, ते रक्ताच्या व लग्नाच्या नातेवाइकांना एकाच वेळीं उपयोगितात.

सासूला पुरुष बोलतांना मामी अथवा मामीसाहेब असें म्हणण्याचा प्रघात आहे. अब्राम्हणांत स्त्रिया सासूला आत्याबाई किंवा तृतीय पुरुषी मावळण असें म्हणतात. मामाच्या मुलीशीं किंवा आत्याच्या मुलीशीं लग्न करण्याचा प्रघात तेथें असल्यामुळें हा वाक्प्रचार ठीकच आहे. सासऱ्याला पुरुष मामा किंवा मामासाहेब म्हणतात. ब्राह्मणांत स्त्रिया मामंजी म्हणतात. पण अब्राम्हणांत ही चाल फारशी दिसत नाहीं. मुळांत मामा हा शब्द श्वशुर ह्या अर्थी पुरुषांनीं उपयोगण्याचा असावा व मग

मामी–मामा अशी जोडी सरसकट सासू–सासरा ह्याअर्थी रूढ झाली असावी. नवऱ्याच्या भावाला भावोजी व दीर असे दोन शब्द आहेत. नुसतें "भावोजी" असें म्हटलें तर नवऱ्याच्या थोरल्या भावाचा बोध होतो, पण नांवापुढें भावोजी शब्द कोणत्याहि धाकट्या भावाला लावतां येतो. दीर हा शब्द तृतीय पुरुषीं बोलण्यांत येतो व तो सध्यां नवऱ्याच्या धाकट्या किंवा थोरल्या भावासंबंधीं योजतात. पण पूर्वी दीर हा शब्द नवऱ्याचा धाकटा भाऊ ह्याअर्थीच असावा असें दिसतें. एकनाथाच्या रुक्मिणी स्वयंवरांत "हे तुझे भावे, दिरे" असें वाक्य आहे. "भावे" म्हणजे नवऱ्याचे थोरले भाऊ व "दिरे" म्हणजे धाकटे भाऊ. सारस्वतांत हल्लींहि भाव म्हणजे थोरला दीर असा शब्द आहे. ह्याखेरीज मैथिलींतील व बंगालींतील भासुर, भाशुर ह्या शब्दांना समान असा भावसासरा (नवऱ्याचा थोरला भाऊ) असा शब्दप्रयोग रूढ आहे.

नवऱ्याच्या बहिणीला नणंद शब्दाखेरीज वन्सं किंवा वयन्स असा शब्द आहे. वन्सं हा शब्द वहिनी शब्दापुढें आदरार्थी स लावून झाला आहे व तो वहिनी शब्दाला समानार्थक आहे. भावाच्या बायकोला वहिनी असा शब्द आहे. वहिनीचेंच वोहिणी असें जुनें रूप आढळतें. वोहिणी शब्द एक वेडगुजरी समास आहे. वधू+आण्णि=घरांतील थोरली सासूरवाशीण, थोरल्या भावाची बायको असा त्याचा अर्थ आहे. धाकट्या भावाच्या बायकोलाही नांवापुढें वहिनी (अमकी अथवा अमक्या वहिनी) लावून संबोधण्याची चाल आहे. नणंदा भावजया एकमेकींच्या वहिनी होतात असें वइन्सं व वहिनी ह्या नांवांवरून दिसतें. व तेंही साट्यालोट्याचेंच निदर्शक आहे.

बायकोच्या बहिणीला मेहुणी असा सर्वसाधारण शब्द आहे. पण जुन्या वाङ्मयांत व आजही वऱ्हाडांत बायकोच्या थोरल्या बहिणीला अक्कडसासू म्हणण्याचा प्रघात दिसतो. "अक्कड सासू" शब्द "भावसासरा" ह्या शब्दासारखा आहे. अक्का = थोरली बहीण (बायकोची) व तिला मान सासूचा असा ह्या शब्दाचा अर्थ. उत्तरेकडील भाषेंतही असेच शब्द

आढळतात. साली किंवा साळी म्हणजे मेहुणी. पण बायकोची थोरली बहीण हिला गुजरातेंत पाटला सासू—पाटला हाऊ (पाट देण्यापुरती सासू) असा शब्द आहे. बायकोच्या थोरल्या बहिणीशीं पुरुषानें मर्यादेनें वागावें पण धाकटया बहिणीशीं थट्टामस्करी केली तरी चालते व बायकोच्या ह्यातींत किंवा माग़ून तिच्या धाकटया बहिणीशीं लग्न करतां येतें. "मेहुणी अर्धी बायको", "आई मेल्यावर बाप मावसा" वगैरे म्हणी हेंच दर्शवतात. मावशी शब्द सावत्र आईला आहे, हें वर पाहिलेंच आहे. "मावशी" शब्द आईच्या धाकटया बहिणीलाच लावीत कीं काय अशी शंका येते. मेहुणीला "साली" असाही शब्द आहे. अक्कड सासू व मेहुणी ही शब्दांची जोडी जेठ व देवर शब्दांसारखीच आहे. बाईचें जें नातें अनुक्रमें जेठ वा देवराशीं तेंच पुरुषाचें अनुक्रमें अक्कडसासू व मेहुणीशीं. पूर्वी स्त्री धाकटया दिराशीं संबंध ठेवूं शके. हल्लीं (व पूर्वी) विधवा दिराशीं लग्न करूं शकते. त्याचप्रमाणें पुरुष बायकोच्या जिवंतपणीं किंवा ती मेल्यावर मेहुणीशीं लग्न करूं शकतो. पहिली चाल हळूंहळूं लुप्त होत चालली आहे. पण दुसरी मात्र हिंदुस्थानांतील सर्व समाजांत आजही रूढ आहे. पहिली चाल गुजरातेंत दियेर वटूं ह्या नांवें माहीत आहे. तेंच नांव आपणही उपयोगावें. दियेरवटूं उत्तरेकडे व उत्तर महाराष्ट्रांत (ईशान्य कोपरा) बऱ्याच जातींत दिसून येतो. त्याच्या जोडीची दुसरी जात "मेहुणचार" हिच्या विरुद्ध मत समाजांत उत्पन्न झालें नसल्यानें ती आजही सर्वत्र सांपडते. वाक्प्रचार, गाणीं व कित्येक चालीरिती ह्या प्रघाताच्या निदर्शक म्हणून दाखवतां येतील. कांहीं वाक्प्रचार वरती दिलेच आहेत. मेघाणीनें संपादिलेल्या "रढियाळी रात" ह्या लोकगीतांच्या संग्रहांत (भा. ३, पा. ३४) एक कथागीत असें दिलें आहे कीं, कोणी एक पुरुष आपल्या सासुरवाडीं जाऊन तुझी बहीण आजारी आहे असें सांगून मेहुणीला घेऊन जातो व घरीं आल्यावर "तुझी सवत आणली आहे दार उघड" असें बायकोला सांगतो. महाराष्ट्रांत चंद्रावळीचें गाणें प्रसिद्धच आहे. चंद्रावळ श्रीकृष्णाला वश होत नाहीं हें पाहून राही, (सं. राधा) तिची मोठी बहीण, युक्तीनें तिला श्रीकृष्णाच्या स्वाधीन करते असें हें गाणें आहे. दुसऱ्या एका

गाण्यांत तुळस कृष्णाच्या स्त्रियांची हेटाळणी करते आहे असें दाखवलें आहे. त्यांत राहीला " बहिणीची बाई तूं गे झालीस कुंटणी " असे शब्द आहेत. आपली धाकटी बहीण नवऱ्याच्या स्वाधीन करणें योग्यच आहे, अशी समजूत दिसते. महाराष्ट्रांत ज्येष्ठ जांवई पूजनाची चाल आहे. ब्राह्मणांत धाकटया मुलींच्या लग्नाआधीं ज्येष्ठ जांवयाला बोलावून त्याचा सत्कार करून त्याला अहेर करण्याची चाल आहे. अब्राह्मणांत ज्येष्ठ जांवई व नवा होणारा जांवई हे दोन्ही एका वेळीं येतात व एका बाजूला थोरला व एका बाजूला धाकटा असें बसवून सर्व लोकांचे देखत अहेर होतात. त्या वेळीं ज्येष्ठ जांवयाला अहेर धाकटयापेक्षां एक रुपयानें तरी जास्त असावा लागतो. नाहीं तर ज्येष्ठ जांवई रुसून जातो व त्यामुळें दोन घराण्यांत कायमचें वितुष्ट आलेलें माझ्या ऐकिवांत आहे. ज्येष्ठ जांवई पूजन हा प्रकार म्हणजे ज्येष्ठ जांवयाचा बायकोच्या धाकटया बहिणीवरचा हक्क संपला असें दर्शविण्याचा एक संकेत दिसतो.

बायकोचा भाऊ व बहिणीचा नवरा ह्यांना मेहुणा शब्द आहे. त्याचप्रमाणें जुन्या परंपरेचा श्यालक शब्दापासून आलेला साला वा साळा असाहि शब्द आहे. बहिणीच्या नवऱ्याला पाहुणा, बहनोई, बनेवी (भगिनी-पति)असेहि शब्द कांहीं जातींत आहेत.बहिणजांवई हा शब्द कांहीं बायकांनीं सांगितला तो अर्थातच अक्कडसासू आपल्या धाकटया बहिणीच्या नवऱ्या-संबंधीं योजीत असणार. उत्तर हिंदुस्थानच्या भाषेंत मेहुण्याच्या बायकोला सालेवी, सालेज असे शब्द आहेत. " साली " हें स्त्रीलिंगी रूप साल्याच्या बहिणीसाठीं योजल्यामुळें एक नवा स्त्रीलिंगी शब्द बनवावा लागला. तामीळ भाषेंतही असाच प्रकार आढळतो. " मच्चिनान् " म्हणजे मेहुणा, " मच्चिनी " म्हणजे मेहुणी व " मच्चिनिच्ची " ( मच्चिन + इत्थी – स्त्रीचें प्राकृत रूप ) म्हणजे मेहुण्याची बायको असे तीन शब्द आहेत. मराठीच्या बोलीभाषेंत वा वाङ्मयांत मेहुण्याची स्त्री ह्याअर्थी शब्द नाहीं. पण एका बायकी वाक्प्रचारांत तो आढळतो. " साळकाया माळकाया " असा शब्द थोड्या तुच्छतेनें स्त्रियांबद्दल वापरतात. मोल्स्वर्थच्या शब्दकोशांत " साळकोजी माळकोजी " शब्द कोणीतरी पुरुष, नांव

मोठें पण प्रयोग तुच्छतादर्शक अशा अर्थी दिला आहे व त्याचा अर्थ साळक = सं. श्यालक = मेहुणा व माळकोजी म्हणजे तसेच इतर असा फोडून दिला आहे. स्त्रियांच्या तोंडचा साळकाईमाळकाई शब्द दिला नाहीं, पण तो वरील शब्दासारखाच आहे व त्यांत श्यालक शब्दाचें साळकाई अथवा साळका अथवा साळाई असें स्त्रीलिंगी रूप गुजराती " सालेवी " च्या जवळचें आढळतें. बायकोचा भाऊ ह्याअर्थी भाटु किंवा भाटवा असा शब्द वऱ्हाडी लोकगीतांत व महानुभाव वाङ्मयांतही आढळतो. तो संस्कृत भर्तृपासून आलेला दिसतो. बायकोचा भाऊ, मेव्हणा, साला किंवा भाटु ह्या नातेवाइकाला वाङ्मयांत व बोलभाषेंत एक विशिष्ट स्थान आहे. वर दिसायला मानाचें पण तुच्छतादर्शक स्थान दर्शवायचें असेल तर साला शब्द तर वापरतातच पण अगदीं वाईट शिवी द्यावयाची असेल तरीही साला व भडवा-भडुवा (भाटुपासून आलेला ?) असे शब्द गुजराती, हिंदी, मराठी, मैथिली भाषेंत योजतात. " हे कोण बायकोचे साले ? ", " साळकोजी माळकोजी ", ह्या वचनांत फक्त पोकळ मोठेपणाबद्दल तुच्छता एवढाच भाव आहे. पण शिवींतील अर्थ " फार वाईट चालीचा पुरुष ", " कुंटणपणाचा धंदा करणारा " असा आहे. तो अर्थ कसा पडला समजत नाहीं. वेश्यांच्या पैशावर त्यांचे भाऊ उपजीविका करतात—बहिणींना मालक बघून देतात. अशा स्त्रियांच्या धन्याचे तें लक्षणानें श्यालक म्हणून तर असा वाईट अर्थ त्या नात्याला चिकटला नसेलना ? ( कोशामध्यें भडुआ शब्दाचा अर्थ भाडें घेणारा, बाईचें भाडें घेणारा, असा आढळतो ).

सून व जांवई हे संस्कृतांतून आलेले शब्द आहेत व त्यांना इतर प्रतिशब्द नाहींत. सासू सासरा = मामा मामी, दीर वहिनी = मेहुणा मेहुणी, वहिनी = बन्सं, हीं सगळीं समीकरणें पाहिलीं म्हणजे जांवई व सून=भाचा व भाची असें समीकरण अपेक्षिलें जातें, पण भाषेंत मात्र आढळत नाहीं. कानडींत मात्र वरच्या दोन समीकरणांच्या जोडीला हेंही समीकरण सांपडतें. सोसे ( सं. स्नुषा ) = भाची व सून आणि आळिया = भाचा व जांवई असे शब्द त्या भाषेंत आढळतात.

## कुलनाम अथवा आडनांव आणि देवक.

कुटुंबांतील जवळच्या व दूरच्या माणसांची नामावळी आपण पाहिली व त्यांत एक मुख्य गोष्ट लक्षांत येते ती ही कीं, मराठी व द्राबीड भाषां-मधून लग्नाचे संबंधी व रक्ताचे संबंधी ह्यांच्या नांवांत सरमिसळ आहे, तर उत्तरेकडेच्या भाषांतून लग्नानें नात्याचे झालेले कुटुंबीय व रक्ताच्या नात्याचे कुटुंबीय ह्यांचे सर्वस्वीं भिन्न गट पडतात. मराठींत संस्कृतांतून आलेले भिन्न शब्द तरी आज शिल्लक आहेत, कानडीमध्यें तर लग्नाच्या नात्याचे सर्व शब्द रक्ताच्या नातेवाइकांना लावलेले आढळतात. आपल्या नात्यां-तील मुलगी करावयाची नाहीं असा उत्तरेकडचा कटाक्ष दिसतो, असपिण्ड —म्हणजे आईकडून व बापाकडून जवळच्या नात्यांत नसलेलीं मुलें. ह्यांत मातापितरांच्या भावंडांचीं मुलें-( इंग्रजींत सर्व फर्स्ट कझिन ) येतात. ह्याच जोडीला स्वगोत्रांतील मुलगी करावयाची नाहीं असा दंडक ब्राह्मणांत फार जुन्या काळापासून आहे. अब्राह्मणांत पितृकुलांत लग्न करणें उत्तरेंत सर्वत्र निषिद्ध समजतात. उत्तरेंत कुलनामाची चाल दिसून येत नाहीं, त्यामुळें जोपर्यंत नातेवाईकांची आठवण पोंचते, तेथपर्यंतच पितृकुलांत लग्न न करण्याचा नियम पाळतां येणें शक्य आहे. साधारणपणें एका गावांत रहाणारी एका जातीची मंडळी एका कुळांतील असें धरून मुलगी कधींही गावांतल्या गावांत देत नाहींत, पांचपांचशें लोक एका जातीचें गावांत असले तरी त्यांच्यांत आपापसांत लग्नें होत नाहींत. यदुवंशी गवळी, अहिर गवळी असें आपलें ज्ञातिनांव सांगणारे बरेच लोक वऱ्हाडांत आढळले. त्यांच्यातही गावांतल्या गावांत मुलगी देण्याची चाल नाहीं असें कळलें. उत्तरेकडच्या किंवा गंगेच्या दक्षिणेस मध्यभारतांत पसरलेल्या रानटी, जातीं-तून बहुधा कुलनामें आढळतात व एकाच कुलनामाच्या स्त्रीपुरुषांचें लग्न होत नाहीं. महाराष्ट्रांत ब्राह्मणांत कुलनामें पूर्वी नव्हतीसें दिसतें पण लग्न गोत्रावरून ठरवीत व सगोत्रीयांशीं लग्न होत नाहीं. अब्राह्मणांत कुल-नामें व देवक असे दोन्ही प्रकार आढळतात. देवक हें कांहीं कुळांशीं संलग्न असें एक चिन्ह आहे. तें पशु, पक्षी, वनस्पती किंवा निर्जीव वस्तूहि असूं शकतें. ज्या कुळांचें एक देवक आहे, त्यांचें लग्न होत नाहीं. एका

आडनांवाच्या ( किंवा कुलनामाच्या ) लोकांचें साधारणपणें एक देवक असतें. पानकणीस, पांचपालवी, कट्यार, अशीं निरनिराळ्या तऱ्हेचीं देवकें असतात. ब्राह्मणांचीं व अब्राह्मणांचीं कुळनांवें निरनिराळ्या वस्तूंवरून घेतलेलीं (कुऱ्हाडे, कुदळे वगैरे), निरनिराळ्या वनस्पतींवरून (झाडे, जोंधळे वगैरे), निरनिराळ्या प्राण्यांवरून (वाघ, मोरे, गाय, लांडगे वगैरे), शारीरिक गुणांवरून ( काळे, गोरे, तिरवे वगैरे ), हुद्यावरून व वतनावरून ( जोशी, कुलकर्णी, पाटील, देशमुख ) अशीं नानातऱ्हेचीं आहेत. अब्राह्मणांत बरींच आडनांवें रजपूत वंशांचीं ( पवार, चव्हाण वगैरे ) दिसतात, तर कित्येक जुन्या राजवंशांचीं आहेत ( शिंदे = सिंद. शेलार = शिलाहार. कदम = कदंब. चाळके = चालुक्य वगैरे ). कुटुंब उत्तरेप्रमाणेंच पितृपारंपारिक असल्यामुळें कुळांत लग्न न करणें, ह्याचा अर्थ पितृकुळांत लग्न न करणें असाच होतो. देवक, “बेडगु अथवा बली” ह्या नांवाखालीं कर्नाटकांतही दिसतें. कर्नाटकांत आडनांवें नाहींत, पण एकाच देवकांत लग्न होत नाहीं. आडनांवें किंवा कुलनामें कधीं उत्पन्न झालीं तें समजत नाहीं. आडनांवांचा खरा प्रसार रजपुतांत मुख्यत्वें दिसतो. पूर्वीच्या राजघराण्यांना चालुक्य, राष्ट्रकूट, शातकर्णि, शालिवाहन, सिंद, अशीं कुळनांवें होतींसें दिसतें. हीं कोठून आलीं कळत नाहीं. कुळनांव किंवा वंशनांवें मध्यभारतांतील गोंड, मुंड वगैरे जातींत आहेत व तीं देवकासारखीं वाटतात. बिहारमध्यें पुढीलप्रमाणें कुळनामें मुंड लोकांत आढळलीं : टूटी ( बाजरी ), तिलमी ( मोहरी ), सोआय (एक प्रकारचा मासा), मुंडरी ( केळें ), टोप्पो ( पक्षी ), संगा ( रताळें ), करकट्टा (एक पक्षी), डहांगा ( बांबू ), देमता ( मुंगळा ), कुल्लू ( कांसव ), डुंगडुंग ( एक मासा ) इत्यादि. कर्नाटकांतील बेडगुंची अथवा बलीची यादी एन्थोव्हेन खालीलप्रमाणें देतो : बाळे ( केळें ), बली ( मासा ), बर्गा ( एक हरीण ), होबे ( एक झाड ), कोडकल ( माकड ), वारले ( वारूळ ), आने ( हत्ती ), अर्सिन ( हळद ), तोळ ( लांडगा ), नाग ( नाग ), बाली ( वेल ), वगैरे. मराठे, मराठे कुणबी व इतर जाती ह्यांमध्यें सांपडणाऱ्या देवकांपैकीं कांहीं पुढें दिलीं आहेत : अघाडा, अंबा, अंजन, बोर,

गरुडाचा पंख, डुक्कर, हरिण, जांभूळ, ज्वारी, नारळ, कट्यार, कुऱ्हाड, पांच पालवी वगैरे. (अशाच तऱ्हेचीं देवकें तेलगु व तामीळ जातींत आहेत.)

गंगेच्या दक्षिणेला देवकें फार प्राचीन काळापासून होतीं व पश्चिमेकडे रजपूत, काठी ह्या लोकांत कुळें होतीं. ह्यावरून असें दिसतें कीं, देवकाची चाल मूळ असून, कुळाचें जें देवक तेंच कुळनांव असावें व नंतर निरनिराळ्या कारणानें आडनांवें पडलीं असावींत. देवकें उत्तर भारतांत दिसत नाहींत. त्यामुळें पितृ-सावर्ण्य ठरविण्याची पद्धत म्हणजे एका गांवांतील वस्ती अशी झाली. अब्राह्मणांत देवकाचें जें कार्य तेंच ब्राह्मणांत गोत्राचें. उत्तरेंत आणि दक्षिणेंत पितृकुलांत ( केरळांत मातृकुलांत ) लग्न होत नाहीं. उत्तरेंत सापिंड्याची पण मर्यादा पाळतात व आईचा भाऊ आणि बापाची बहीण ह्यांच्या अपत्यांशीं लग्न होत नाहीं. दक्षिणेंत फक्त देवकाचें ( कुलनामाचें ) बन्धन पाळीत असल्यामुळें आईचा भाऊ व बापाची बहीण पितृकुलांत नसतात. तीं देवकाच्या नियमाप्रमाणें भिन्न देवकांत दिलेलीं असतात व म्हणून त्यांच्या अपत्यांशीं लग्न होऊं शकतें. आईची बहीण ही बापाची दुसरी बायको किंवा चुलत्याची बायको म्हणून स्वदेवकांत येते व म्हणून तिच्या मुलाशीं लग्न निषिद्ध ठरतें.

कुळाबाहेर किंवा देवकाबाहेर मुलगी देण्याची चाल दक्षिणेकडची व सापिंड्यांची ( आईबापांच्या भावंडांचीं मुलें तीं भावंडेंच असें समजून त्यांचें एकमेकांत लग्न न होणें ) चाल उत्तरेकडची असें ह्यावरून दिसतें.

## उत्तरेच्या कुटुम्बांतील कांहीं वैशिष्ट्यें

स्त्रियांच्या दृष्टीनें पाहिलें तर असें दिसतें कीं, उत्तरेंत मुलगी परघरीं, म्हणजे ज्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं अशा घरीं जाते. दक्षिणेंत ती आतेच्या घरीं अथवा मामाच्या घरीं सासुरवाशीण म्हणून येते. उत्तरेकडच्या विवाहानें नवखीं कुळें एकमेकांशीं जोडलीं जातात. मुलगी ही एक देण्याघेण्याची, मित्र जोडण्याची, शत्रुत्व मिटविण्याची बाब होते. पितृप्रधान कुटुंबांत जन्मलेल्या मुली बाहेर द्यावयाच्या असतात — त्या परक्य असतात, दुसऱ्याचें धन असतात व कुटुंबांत येणाऱ्या बाहेरच्या असतात

व त्या निरनिराळया कुळाच्या असण्याचा संभव फार असतो. एका वेळीं घरांत नांदणाऱ्या सासवा, सुना व जावा ह्यांना एकमेकींशीं जोडील असें स्नेहसूत्र नव्यानें निर्माण व्हावयाचें असतें. लग्न झाल्यावर मुलगी परक्यांत येऊन पडते, तिचे संबंध स्नेहपूर्ण होणार, कीं विद्वेषाचे होणार हें ठरावयाचें असतें. घरीं सपत्नी असण्याचाही संभव असतो, कारण जितकीं लग्नें जास्त तितके नवे मित्र मिळतात. अशा परिस्थितींत स्त्रीचा सामाजिक दर्जा काय होता ह्याचें चित्रण संस्कृत वाङ्मयांत व उत्तर भारतीय अर्वाचीन व मध्ययुगीन लोकगीतांत चांगलें पहावयास सांपडतें. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत सूर्याची मुलगी सावित्री हिच्या लग्नाच्या ऋचा आहेत. त्यांतील कांहीं ऋचांवरून कन्येचा पितृगृहाशीं संबंध कोणत्या स्वरूपाचा होता तें समजतें.

प्रत्वा मुञ्चामि वरुणस्य पाशात् । येन त्वा अवध्नान् सविता सुशेवा ।
...त्वां पत्या सह दधामि ॥

प्रेतो मुञ्चामि नामुतः ; सुबद्धां अमुतस्करम् । पूषा त्वा इतो नयतु ॥
(ऋ. वे. १०.८५.२२-२४ ).

" तुझा पिता जो सूर्य त्यानें तुला वरुणाच्या पाशांत बांधली होती; त्यांतून मी तुला मोकळी करून पतीच्या स्वाधीन करतों. तुझी इकडून ( माहेराहून ) सुटका करतों, तिकडून नव्हे. तिकडे तुला घट्ट बांधतों. तुला पूषा इथून घेऊन जाऊं दे. " मुलीचें कौमार्य राखण्यासाठीं काळजी घेतली जाई ती वरुणाच्या पाशांनीं सूचित केली आहे. इकडून सोडतों म्हणजे " माहेरासंबंधीं आतां तुझें कर्तव्य उरलें नाहीं व आमचेंही तुझ्यासंबंधीं नाहीं. तूं आतां त्यांची झालीस." ह्या मंत्रानें एका घराण्यांतील मूल दुसऱ्याचें झालें हें स्पष्ट दर्शविलें आहे.

हाच अर्थ अथर्ववेदांत अधिक स्पष्ट केला आहे.

उर्वारुकमिव बन्धनात् प्रेतो मुञ्चामि नामुतः । (अ. वे. १४.१.१७).

वेलावरची काकडी तोडावी त्याप्रमाणें मी तुला तोडून टाकतों पण तिकडे मात्र बांधून ठेवतों.

वंशवेलीवर आलेलें व पोसलेलें हें फळ दुसऱ्याचें झालें. ( अथर्ववेदांतील ह्या ऋचेपासून तों ' परतवेल ' ह्या वाक्प्रचारापर्यंत मुलीच्या देण्याघेण्यांत ' वेलीची ' कल्पना अखंडित आली आहे हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. )

सपत्नीचें राजकारण स्वप्नवासवदत्ता नाटकांत स्पष्टपणें दाखवलें आहे. वत्सराजाचा सर्वांत मोठा प्रतिस्पर्धी मगधाचा राजा होता. त्याचें लग्न अगोदरच अवन्ती राजकन्या जी वासवदत्ता हिच्याशीं झालें होतें. नवऱ्याच्या हितासाठीं वासवदत्ता मरणाचें नाटक करून मगध राजकन्या पद्मावती हिच्याशीं उदयनाचें लग्न जुळवण्याची संधि देते व अशा तऱ्हेनें वत्सराजाचा प्रतिस्पर्धी त्याचा मित्र होऊन त्याला देश जिंकण्यास मदत करतो अशी ही कथा आहे. एकत्र कुटुंब पद्धतींत सासू सासरा जिवंत असेपर्यन्त सुनेला अधिकार नव्हता. धाकटया भावाची बायको असेल तर मोठ्या जावेपुढें नमावें लागे. धाकटी सवत असेल तर मोठीपुढें लौकिकांत तरी नमावें लागे. म्हणजे लग्न करून एका कुटुंबांत जमलेल्या बायकांचे संबंध बहुशः स्पर्धेचे असत व घरांत राजकारण सत्तेचें असे. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत सूर्यासावित्रीच्या लग्नाच्या ऋचा आहेत. त्यांतील आशीर्वादावरून त्या काळच्या स्त्रियांचा दर्जा किती थोर होता अशा तऱ्हेचें भाष्य कित्येक समाजशास्त्रज्ञ करतात. पण त्या ऋचेंत हें सत्तेचें राजकारणच प्रतिबिंबित झालेलें दिसतें. ऋचा अशा : सम्राज्ञी श्वशुरे भव । सम्राज्ञी श्वश्र्वां भव । ननान्दरि सम्राज्ञी भव । सम्राज्ञी अधि देवृषु ॥ एका नवऱ्याखेरीज सासरच्या माणसांवर अधिकार गाजव असा हा आशीर्वाद आहे. प्रेमाचें कुठें नांवच नाहीं. असा अधिकार मिळावा, घराची स्वामिनी व्हावें ही महत्वाकांक्षेची पराकाष्ठा आहे. सूर्यदेवाच्या लाडक्या मुलीला दिलेला हा आशीर्वाद आहे, पण निराळ्या परिस्थितींत मुलीला काय उपदेश केलेला आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कण्वाची शकुन्तला सासरीं जाण्यास निघाली आहे. कण्व कांहीं कुणी बलाढ्य राजा नव्हे, कीं ज्याचा संबंध दुष्यंतानें जोडण्यासाठीं धडपडावें. बरें त्याची तरी ती पाळलेली मुलगी. लग्नसुद्धां चारचौघांचे साक्षीनें विधिपूर्वक न झालेलें. ययातेरिव शर्मिष्ठा

भर्तुर्बहुमता भव। पुत्रं त्वमपिसम्राजं सेवं पुरुमवाप्नुहि। शर्मिष्ठेप्रमाणें आवडती हो व तिच्यासारखाच राज्याचा अधिकारी पुत्र होऊं दे हा आशीर्वाद; मुलीला हें मिळावें अशी तळमळ, पण प्रत्यक्ष उपदेश काय, तर शुश्रूषस्व गुरून् कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने. वडिलांची सेवा कर, सवतींशीं प्रियमैत्रिणीसारखी वाग, असा. आणि दुष्यंताला दिलेला निरोप तर ह्याहीपेक्षां लीनतेचा–" सामान्यप्रतिपत्तिपूर्वकामियं दारेषु दृष्या त्वया। भाग्यायन्तमतःपरं न खलु तद्वाच्यं वधूबन्धुभिः ॥ ( बाकीच्या बायकांना वागवतोस, तसं हिला वागव—ह्या पलीकडे तिच्या नशीबांत जरी कांहीं असलें तरी माहेरच्या माणसानें तें बोलून दाखवणें योग्य नाहीं ). मुलीच्या बद्दल हीच भावना आजही मातापितरांना असते. मुलीला मुलगा झाला म्हणजे सासरीं तिचा मान रहातो, तो झाला नाहीं तर मात्र वंध्या म्हणून तिला सासरीं माहेरीं कुठेंच स्थान नसतें. " एक कळ दे आणि घरची मालकीण हो " असा एक वाक्प्रचार मराठींत आहे. प्रसूतिवेदनेनें पीडलेल्या पहिलटकरणीला उद्देशून हें वाक्य आहे. " ह्या प्रसूतिवेदना सहन कर—मुलगा होईल आणि मग तूं घराची मालकीण होशील ", असा हा उपदेश आहे. महाभारतांत हें कौटुंबिक चित्र फार उत्कटतेनें रंगवलेलें आहे. पितृप्रधान संस्कृतींत स्त्रियांचें काय स्थान होतें तें महाभारतांत अगदीं स्पष्ट होतें. मुली देवाण घेवाण करण्यासाठीं असत. कुन्ती लहान असतांच वसुदेवानें आपला मित्र जो कुन्तिभोज राजा त्याला दिली. कुन्ती म्हणते " एखाद्या चोरानें चोरीचा माल ज्याप्रमाणें आडगिऱ्हाइकी फुंकून टाकावा त्याप्रमाणें वसुदेवानें मला भोजाला देऊन टाकलें. बापानें हांकललेली, सासऱ्यांनीं काढून लावलेली अशी दुःखी कष्टी मी जगून तरी काय करूं ? लोक मेलेल्यांचें श्राद्ध करतात, पण वास्तविक आज चौदा वर्षें ते मला व मी त्यांना मेलें आहे. लोकांच्या आश्रयानें राहिलेल्या ह्या जिण्याला धिःकार असो. " ( उद्योगपर्व, ५. ८८. ६१–६६ ). कुन्तीला तीन मुलें झाल्यावर माद्री पांडूला म्हणते, " तिच्याकडे मोठेपणा व माझ्याकडे लहानपणा आला तरी मी कधीं कुरकुर केली नाहीं, आपल्या व्यंगाबद्दल कधीं कुरकुर केली नाहीं; पण तिला मुलें झालीं व मला नाहींत,

म्हणजे वांझपणाचा डाग मात्र मला लागणार--तेव्हां मला मुलें होतील असें कर. " एका राजकन्येला ही याचना करावी लागावी ह्यापरतें दुःख काय ?

स्वयंवर, स्वयंवर म्हणून ज्याचे पोवाडे गातात त्यांत स्वतःची अशी निवड नव्हतीच मुळीं. दमयंती व सावित्री खेरीज कोणीं आपल्या आवडीनें वर निवडला नव्हता. अंबेला भीष्मानें जेव्हां भर मंडपांतून ओढून आणलें तेव्हां तिनें स्पष्टच म्हटलें आहे कीं:—धिःकार असो ह्या भीष्माला आणि माझ्या मूर्ख बापाला. त्यानें एखाद्या वाराङ्नेप्रमाणें वीर्याच्या किंमतींत मला देऊन टाकलें. द्रुपद राजा जेव्हां धर्मादि भावंडांच्या कुलशीलाची चौकशी करायला लागतो तेव्हां धर्म त्याला बजावून सांगतो—" द्रुपदानें जी किंमत ठरवली होती ( विक्रम हीच किंमत—वीर्यशुल्क ) ती देऊन ह्या वीरानें तिला जिंकलें आहे. आतां वर्ण, जाति, पोट भरण्याचा उद्योग, कुल व गोत्र ह्याची चर्चा कां ? " माद्रीच्या बापाला भरपूर धन देऊन तिला भीष्मानें पांडूसाठीं करून घेतली. पण्डु-रोगी, निर्वीर्य अशा माणसाला तिनें काय आपण होऊन वरलें असतें ? द्रुपदाला द्रोणाचा सूड उगवायचा होता म्हणूनच द्रौपदीचें दान देऊन त्याला पराक्रमी जांवई पाहिजे होता. असुर सम्राटाची मुलगी शर्मिष्ठा. बापाला शुक्राचार्यांच्या कोपापासून वांचविण्यासाठीं देवयानीची दासी झाली. ययातीनें एक हजार घोडे मिळवण्यासाठीं आपली मुलगी एका-मागून एक चार राजांना दिली. बिचारी नागकन्या जरत्कारू स्वकुल-रक्षणार्थ जरत्कारूसारख्या तऱ्हेवाईक व म्हाताऱ्या ब्राह्मणाच्या गळ्यांत बांधावी लागली. भद्रा ( सुभद्रा ) एवढी लाडकी बहीण, पण कृष्णानें अर्जुनाला सरळ सांगितलें कीं, " हें पहा, तुला ती हवी असली तर तिला पळवून ने. स्वयंवराच्या गोष्टी बोलूं नकोस. ह्या पोरी कोणाच्या गळ्यांत माळ घालतील ह्याचा नेम नाहीं. "

बायको म्हटली म्हणजे तिची सर्वांत थोरवी काय तर ' पतिलोकं वृण्वाना ' पतीचें सुखदुःख आपलें म्हणवणारी. सीता, द्रौपदी, दमयंती, सावित्री, ह्या सर्व त्यांतल्याच. पतीनें सांगितलें कीं, वाटेल त्याच्या स्वाधीन

शरीर करून मुलें होऊं देणाऱ्या. भावांच्यांत कळ लावायची तर त्यांच्या बायकांचें भांडण लावावें हा सनातन मार्ग दिसतो, कारण कर्ण दुर्योधनाला सांगतो कीं, " बाबारे, पांडवांत फूट पाडण्याचा प्रयत्न सोडून दे. सगळ्यांची मिळून एक बायको आहे, तोंवर त्यांत फूट पडणें शक्य नाहीं. "

पुण्यश्लोक म्हणून ज्याची गणना केली त्या नळानें दमयंतीची दुर्दशा द्यूतापायीं केली. धर्मानें बायकोला पणाला लावली. सत्यवतीनें सुनांची विटंबना केली. बिचारी गांधारी आंधळ्या नवऱ्यासाठीं आंधळी झाली. कुरुक्षेत्रावर धर्मानें जमवलेलें सर्व सैन्य लग्नसंबंधामुळें सख्य झालेल्या राजांचें होतें. द्रुपद, विराट व यादव त्यांत मुख्य होते. माद्रीचा भाऊ शल्य विरुद्ध होता तो बहिणीच्या अपमानामुळें तर नाहीं ना ?

पोटांत माहेरची ओढ व जन्म तर परक्या घरीं अशी अवस्था प्रत्येक स्त्रीची असते. महाभारतापासून आजतागायत उत्तर भारतांत स्त्रियांचीं गाणीं ह्या ओढाताणीचीं द्योतक असतात. त्याचेंच चित्र मराठी गीतांतून उमटलेलें आहे. निरनिराळ्या स्त्रीगीतांच्या संग्रहांतून तीं गाणीं सर्वांच्या परिचयाचीं झालीं आहेत.

मुलगी देण्याघेण्याचा व्यवहार मैत्री जोडण्यासाठीं असतो, पण पुष्कळदां त्यामुळें वैर मात्र साधतें. विशेषतः स्वयंवर मांडलें म्हणजे लढाई व्हावयाचीच हें ठरलेलें होतें. एकाच मुलीसाठीं निरनिराळ्या बलाढ्य राजांनीं मागणी केली म्हणजे मुलीच्या बापाची स्थिति किती अनुकंपनीय होते हें कृष्णाकुमारीच्या उदाहरणानें स्पष्ट होतें. शिशुपाल व कृष्णाचें वैर रुक्मिणीविवाहांतूनच उद्भवलेलें होतें. बापाच्या मनांत नसतां भिडेस पडून मुलीचा विवाह झाला तर सासऱ्या जांवयाचें वैर उत्पन्न होतें. शहाजी राजांचा रानोमाळ पाठलाग त्यांच्या सासऱ्यानें केला व बिचाऱ्या जिजाबाईना बंदोबस्तांत ठेऊन त्यांना जीव घेऊन पळावें लागलें हा इतिहास तर नवीनच आहे. अशा प्रसंगांत मुलीला सासर तरी पत्कर नाहींतर माहेर तरी पत्कर असें सांगण्यांत येतें. सासरमाहेरच्या द्वैतांत तिच्या भावनांचा चक्काचूर होतो. ह्या दृष्टीनें विचार केला तर बाल-

विवाहाच्या पद्धतीनें स्त्रीच्या मनाची ओढाताण कमी होत असावीसें वाटतें. वयाच्या दहाव्या वर्षाच्या आंतच लग्न झाल्यामुळें माहेरची आठवण पुसट होते. सासरच्या माणसांच्या सान्निध्यांत जन्म गेल्यामुळें माहेरापेक्षां सासरच जवळचें वाटतें. सासरची प्रतिष्ठा ती आपली प्रतिष्ठा वाटते. सासरच्या माणसांनाही लहानपणापासून घरीं वाढलेली मुलगी म्हणून तिच्याबद्दल करुणा व वत्सलता वाटते. बायकोबद्दल स्त्रीविषयक आकर्षण वाटण्याच्या आधीं आपल्या बहिणींबरोबर वावरणारी एक कुटुंबीय म्हणून तिच्याबद्दल आत्मीयता वाटते. व या आत्मीयतेंतूनच तारुण्यांत स्त्रीविषयक प्रेम निर्माण होतें. शैशवात् प्रभृति पोषितां प्रियाम् सौहृदादपृथगाश्रयामिमां असें ह्या संबंधाचें वर्णन रामानें केलेलें आहे. मौज अशी कीं, खुद्द कुटुंबांत जन्मलेल्या पुरुषांना स्वकुलप्रतिष्ठेबद्दल जेवढा अभिमान असेल त्यापेक्षां कितीतरी जास्ती कुटुंबांत लग्न करून आलेल्या स्त्रियांना वाटतो. मोठ्या घराण्याचे पुरुष बहकले तरी स्त्रिया घराण्याचा मोठेपणा ठेवण्यासाठीं झटत असतात.

## मराठी कुटुम्बांतील संबंध दर्शविणाऱ्या ओव्या

मराठी प्रदेशांत साधारणपणें मामाच्या मुलीशीं लग्न करण्याचा प्रघात आहे. नातेवाचक शब्द तर मामाच्या किंवा आत्याच्या मुलीशीं लग्न करणाऱ्या समाजाला उचित असे आहेत. हालाच्या सप्तशतींत सासूला अत्ता असा शब्द आहे* उत्तर भारतीय समाजांत असपिण्ड विवाहामुळें नवनव्या कुटुंबांशीं शरीरसंबंध येऊन नात्याच्या लोकांचें क्षेत्र वाढतें राहील पण कुटुंबांत तेढीचें वातावरण राहण्याचा संभव असे. या उलट फक्त पितृकुलांत संबंध नाहीं अशी अट पाळली म्हणजे आत्या व मामा यांच्या मुलांशीं लग्नाची मोकळीक राही. (चुलता व मावशी पितृकुलांत कशीं जातात हे दियेरवटूं व मेहूणचार या प्रघाताच्या आणि कुल व देवक संस्थांच्या विवेचनांत आलेंच आहे). मामा हा मुलाला लहानपणापासून

---

* Albrecht Weber, Saptas'atakam des Hala.
पृ. २५२ गाथा ५४३.

माहीत असतो. आजोळ मुलांना नेहमींच प्रिय असतें व नवरा बायको एकमेकांशीं खेळलीं-बोललेलीं असतात. कसलें सासर मिळतें कोण जाणे ही हुरहुर वाटण्याचें कारण रहात नाहीं. सासर माहेरचें द्वैत कांहींसें कमी होतें. मुलीला आत्याचें घर म्हणजे परघर वाटत नाहीं व या एका गोष्टीमुळें लोकगीतांना निराळें वळण लागतें. ह्यांपैकीं नमुना म्हणून कांहीं दिलीं आहेत.

ह्या ओव्यांमधून पितृसत्ताक कुटुम्बांतील स्त्रीचें स्थान व अशा कुटुंबांत आढळून येणारीं सर्व द्वंद्वें ह्यांचें उत्कृष्ट चित्रण आढळतें. बापाबद्दलच्या ओव्यांची संख्या कमी आहे व त्यांतील पुष्कळशा व्याजोक्तीनें व उपरोधानें भरलेल्या आहेत. मुलगी झाली कीं आईबापांचा जिव कष्टी होतो. त्यांतही बापाला विशेष वाईट वाटतें. त्याला उद्देशून मुलगी म्हणते,*

बापाजी हो बापा फार पोरी म्हणूं नका । जसा चिमण्यांचा थापा । उडूनी जाई ॥ एकदां सासरीं गेल्यावर कशाला परत येणार ! आहोंत तितके दिवस हडहड करूं नका. हीच ओवी गुजराती लोकवाङ्मयांतही आढळते.

धन्य धन्य बाई बापाजीची छाती । काळजाचा घड दिला परायाच्या हातीं ॥ हा धन्यवाद उपरोधिक आहे हें सांगणें नकोच.

मुलीला आपल्याकडून चांगलें स्थळ पाहिलें आतां तिचें काय होईल ही माझी जबाबदारी नाहीं, ही बापाची वृत्ति खालील ओवींत दिसून येते. बाप म्हणे लेकी देऊनीया आलों । त्यांच्या नशीबाला जामीन नाहीं झालों ॥

ह्या उलट आईबद्दलच्या ओव्या संख्येनें अमाप व प्रेमानें झरणाऱ्या अशा आहेत. त्यांतून निवड करणेंच कठीण आहे, पण खालीं कांहीं दिल्या आहेत.

---

* येथें व इतरत्र दिलेल्या ओव्या मजजवळील हस्तलिखित संग्रहांतील आहेत. ह्यांत सर्व जातीच्या हिंदू स्त्रिया व कांहीं ख्रिश्चन स्त्रियांनीं सांगितलेल्या ओव्या आहेत. ह्या कुमारी बाळूताई सप्तर्षि जी. ए. ह्यांनीं नगर जिल्ह्यांत स्वतः हिंडून जमविलेल्या आहेत.

धूशील परटिणी पाणी पाहून नितळ । माय त्या बाईचें पतिव्रतेचें पातळ ।। पावसावांचूनी रान हिरवं दिसना । मावली वांचूनी माया कोणाला सुचेना ।। मावली असावी वनींच्या पांखराला । चोचीनं चारा घाली आपल्या लेकराला ।। आई आई म्हणे तोंडाला आलें पाणी । माऊली वये येई खडिसाकरेच्या वाणी ।। बापाचे उपकार फिटे काशीला गेल्यानें । मावलीचे उपकार फिटेना कांहींबी केल्यानें ।। रुसलें तुझ्यावरी चढेना तुझं जोतं । आतां मायबाई मन काकूळती येतं ।।

खालील ओव्यांतून आईच्या दुधाचें सामर्थ्य व आईची शिकवण सांगितली आहे.

दळण दळीतें जसं हरणं पळतं । माउली बाईचें दूध मणगटी खेळतं ।। जात्याचं भिंगरटी, घागर गेलीया अस्माना । मावलीच्या दूधाचा इस्मं ( विस्मय ) वाटे दुस्माना ।। मला शिकविलं मायबाई तुसडीनं । उभं राहूं नये दोघं तिथं तिसऱ्यानं ।।

पितृसत्ताक कुटुंबांत मुलग्याची आई होणें भाग्याचें असतें. मुलगा घराचा धनी असतो. मुलगी होणें कमीपणाचें, पण ती दुसरीकडे जाणारी. आणि म्हणूनच चांगल्या घरांतून मुलीचे लाड होतात. आज आपल्या घरीं आहे, तिला खाऊन पिऊन घेऊं दे, पुढें तिला नीट मिळेल कीं नाहीं कोण जाणे; अशी भावना ह्या ओव्यांतून दिसून येते. मुलाबद्दलचें आईचें प्रेम उघड असतें. मुलीबद्दलचें गुप्त असतें—त्यांत करुणा असते.

लेक म्हणुनि नको करूं हेळसांड । मालनबाईचा भावाशेजारी पाट मांड ।। माझ्या आयुष्याची विणविते चादर । मालनबाई माझे कंथा पुत्राला पांघर ।। भाऊ नसता तर मालनबाईचे हे लाड झाले नसते.

पोरीला जपणं मोठं कठीण. नीट वर मिळून सासरीं गेली तर ठीक, अशी चिंता कालिदासाच्या कण्वालाच होती असें नव्हे, तर सर्व आई-बापांना असते. खालील दोन ओव्या दुष्यन्त—शकुन्तलेच्या गोष्टीला ( महाभारतांत सांगितली आहे तशी ) लागू पडतात व लक्षांत येतें कीं जगाच्या सुरवातीपासून ह्या एका घटनेवर किती तरी वाङ्मय रचलेलें आहे.

माळ्याच्या मळ्यांत उभं माळ्याचं लेकरूं । पिकलं अंजीर झडप घालितें पाखरूं ।। राघूमैनाची गांठ पडली वनांत । राघू बेइमान मैना पडली फासांत।। लेक किती जरी प्रेमाची असली तरी दुसऱ्याचा माल.

लाडकी लेक राहूं नये त्वां माहेरी । घऱ्याची कोथिंबीर वास मळ्याच्या बाहेरी ।।

मुलीला सासरी जातांना, विशेषतः लहानपणीं लग्न झाल्यावर, काय वाटत असे हें खालच्या ओवींत स्पष्ट दिसतें.

आईबापाची काय असूनी संबरत ( समर्थ ) । कसाबाच्या मागें ( ! ) गाय चालली हंबरत ।।

सासरच्यांचा तोरा व माहेरच्यांची लाचारी खालीं दाखविली आहे.

लेकीच्या बापाचें शहाणपण गेलं वाया । पोटीचं देऊनी पडे सोयऱ्याच्या पाया ।। बाप म्हणे लेकी खालीं पाहून चाल बेटा । समय आला खोटा आला रुपयाला बट्टा ।। लेकीला देणारे आईबाप होती चोर । रस्त्यामधें जांवई सावकार ।। जांबयाची जात जशी हुलग्याची पेरणी । पोटीचं देऊनी त्याचीं उगीर ( उग्र ) बोलणीं ।।

सासरीं गेल्यावर बारंवार भेटावयास येणारा म्हणजे भाऊच. आई कांहीं घर सोडून येणें शक्य नाहीं. बाप होतांहोईतों सोयऱ्याच्या घरीं येणार नाहीं पण भाऊ मात्र बहिणीच्या प्रेमानें खेप टाकील. उत्तरेकडील ओव्यांतही भाऊच बहिणीचा कैवारी दाखवलेला आहे. ऋग्वेदांतही भाऊ नसलेल्या बहिणीची निंदा केली आहे. अशा मुलींशीं लग्न करूं नये असा दण्डक आहे व त्याचा अर्थ काय असावा ह्याबद्दल पुष्कळ तर्क आहेत. तें विवेचन करण्याची गरज नाहीं पण पूर्वीपासून भाऊ बहिणीचा संरक्षक ही भूमिका उत्तरेच्या कुटुंबांत दिसून येते.

पहिली ओवी लेकुरवाळ्या बाईच्या तोंडची वाटत नाहीं. नुकत्याच लग्न झालेल्या अल्लड सासुरवाशिणीची दिसते.

पोटच्या परीस मला पाठच्याची गोडी । माझ्या ग राजसाची माझी लहानपणची जोडी ।।

आम्ही बहिणी बहिणी दोन गांवच्या बारवा। मध्यें जोंधळा हिरवा भाऊराया ॥ बहिणीला सासुरवास भावाच्या कानीं आला। उपशीला झरा तेथें पाणी नाहीं पेला ॥

भाऊबीजेला भावाकडची भेट येणारच आणि तीहि मोलाची. भाऊ गरीब असला तरी बहिणीला त्याचा आधार असतो. भ्रताराच्या राज्या उणे ठेवी ना रे देव। बहिणीच्या मनीं चोळीची आशा ठेव ॥ वेडा बागडा भाऊ बहिणीला असावा। बांडी मुरकी चोळी एका रात्रीचा विसावा ॥ लुगड्याचं मोल माझ्या चोळीला आटतं। जिला नाहीं भाऊ तिला नवल वाटतं ॥ सया ( सखा ? ) पुसं तीला दिवाळी कोण्या वारी। बहिणीचा भाऊ दारी ऊभारीतो चोळी ॥ काळी चंद्रकळा पदरीं रामनाम। माहेराला गेलें नेसविली बंधवानं ॥

पण दूर दूर रहाण्यानें बालपणाची मैत्री तुटते, भाऊ बहिणीला विसरूं लागतो. त्याला नवीं बंधनें निर्माण होतात. तो लग्न करतो, बायकोच्या नात्याचीं माणसें जवळचीं होतात. मुलेंबाळें होतात व बहिणीवरची माया कमी होते. खालील ओव्यांत ही घटना सांगितली आहे. पितृसत्ताक कुटुम्बांत जीं निरनिराळीं वैरें आहेत त्यांत बन्सं वहिनीचें वैर व ओढून ताणून आणलेली गोडी हीं दोन्ही त्यांत दिसतात.

वाट पाहूं पाहूं डोळे झाले कुकावाणी ( कुंकवासारखे लाल )। बयाच्या लेकानें मन केलं लोकावाणी ॥ द्रौपदीला धांवतसे तुझी बहीण म्हणून। धाव माझ्या धावण्याला माझें अंतर जाणून॥ पाऊस पडला पडून ओसरला। भावाला लेकी झाल्या बहिणीला विसरला ॥ बहिणीच्या गांवा जाया सांगतो बारा वढी। लेकीच्या गांवा जाया धुरेचे नंदी सोडी ॥ भाऊ ते आपले भावजया त्या कोठुनी ॥ ताईता शेजारी घेते पुतळ्या गांठूनी ॥ भाऊ घेई चोळी भावजय तेथे गेली। रुपयाची चोळी पावली कमी केली ॥ मायबापायाच्या माघारी माहेराची झाली राळ। गोरी भावजय म्हणे गांवाबाहेरी धर्मशाळ ॥ आतांच्या युगांत भाऊ नव्हे बहीणीचा। खिशा-मंदी चोळी वाडा पुसे मेव्हणीचा ॥

नणंद–भावजय हीं नातीं फ्रॉइडला माहीत असतीं तर त्यांच्या संबंधावर व मानसिक क्रियेप्रतिक्रियेवर त्यानें ग्रंथ लिहिले असते. आपण ज्या घरांत जन्मायचं तें आपल्याला परकं व्हायचं. लहानपणचा संवगडी दुसरीच्या कह्यांत जायचा ह्याबद्दल मुलींना वाईट वाटतें. तसंच लग्न करून ज्यांच्या घरची स्वामिनी म्हणून जावयाचें तेथें जिचा कांहीं हक्क उरला नाहीं त्या नणंदेनें मिरवायचें म्हणून वधूला वाईट वाटतें. त्यांतूनही नणंद घरीं परत आलेली, 'विधवा होऊन माहेरीं आलेली' असली म्हणजे तिच्या आयुष्यांतील विफलत्वाचा सर्व सूड वहिनीवर निघतो. त्या उलट भाऊ–भावजय स्वतंत्र असतील तर त्यांच्या घरीं अशा बहिणीला मोलकरणीपेक्षां जास्त दर्जा नसतो. त्या संबंधांतील कडूपणावर पांघरूण म्हणूनच कीं काय कित्येक कौटुम्बिक प्रसंगीं आतेचा विशेष मान असतो. लग्नांत 'आतेचीर' म्हणून नवरीच्या आतेला द्यावें लागतें. गुजरातेंत मुलाचें नामसंस्करण आतेनें करावयाचें असतें ! ( फई नाम पाडे छे ) व आतेचा अहेर येईल त्याची फेड दुपटीनें–तिपटीनें करावी लागते.

उत्तर भारतांत हीं गाणीं येथेंच थांबतात; मुलीच्या शोकाला उतार नाहीं. पण मराठी प्रदेशांत मातुल कन्या परिणयामुळें त्यांना एकदम निराळें वळण लागतें. माहेरीं धाडायला सासूची खळखळ, भाऊ आला तरी रिक्त हस्तानें परत जातो, अशीं किती गाणीं सर्वत्र सांपडतात. पण बहिणीला विसरणारा भाऊ मुलीला न्यावयाला येतो. जुन्या अपमानाची भरपाई होते. भाची सून केल्यानें तुटलेलें माहेर जोडतें आणि सासर तरी परकें थोडेंच असतें ?

सोनाराच्या घरीं ठिनग्यांचा भडिमार। भाशी केली सून गोठ तोडे चंद्रहार ॥

चला आत्याबाई माहेराला जाऊं। मूळ घेऊनिया आला माझा बाप तुमचा भाऊ ॥ आणि भोळी बहिण पण मायेनें म्हणतेः

एकीचा मुऱ्हाळी दोघींना म्हणे चला। भाईराज माझा मनधरणीचा आला ॥ धर्मशाळा दाखवणारी भावजय मुलीची आई म्हणून गरीब होऊन वरमाईच्या ( वन्संच्या ) पाया पडते व बहिणभावांची ताटातूट त्यांच्या मुलांच्या लग्नानें सांधते.

सासरच्या मंडळींत सासरा, सासू, दीर, जावा, नणंद व नवरा इतकीं माणसें येतात, पैकीं सासऱ्याबद्दल अशा ओंव्या फारशा सांपडत नाहींत. सासूबद्दल कांहीं गोडीच्या पण बहुसंख्य रागाच्याच ओंव्या आहेत.

सासू आत्याबाई, सासरा भोळा राजा। ह्यांच्या पोटीचं गिन्यानी माझा चुडा ॥ सासूचा सासुरवास सोसल्यानें काय जातं। सर्वकडे नांव होतं। मालनबाई ॥ सुनेला सासुरवास नको करूं माईबाई। आपल्या घरीं चांफा आल्या परायाच्या जाई ॥ सुनेला सासुरवास करावा कशासाठीं। लेक गळयाला ताईत। सून जडाबाची पेटी ॥ सासेचा सासुरवास नणदेबाईची लावणी। दीड दिवसाची पाहुणी। वन्संबाई ॥

दिराबद्दलच्या ओंव्या प्रेमाच्या आहेत. जावेबद्दलच्या स्पर्धेच्या. प्रेम असलं तरी वरवरचं.

पाया पडू आल्या जाऊबाई रागं रागं। मनघरणीचा मागें उभा माझा दीर ॥ कुंकवाचा करंडा माझा मेणाचा दुसरा। दीर राजस ग माझा चुड्याला आसरा ॥ भावाभावाचीं भांडणं घरामधें पडला दोरा। जाऊबाई मालनी ग आपण परायाच्या बऱ्या ॥ लोकाच्या संचीताचा नको करूं हेवा दावा। रोपेटोपे दीर तुझे धाकटाल्या तुझ्या जावा ॥ वडीलपणाचा बहुमान थोर। जावा म्हणत्याल बाई वयनी म्हणतसे दीर ॥

नवरानवरीच्या ओंव्या पुष्कळ आहेत, पण स्त्रीपुरुष किंवा नवराबायकोच्या अशा थोड्या आहेत. प्रत्यक्ष आपल्या नवऱ्याबद्दल स्त्री देवाकडे आयुष्य मागते अशाबद्दल आहेत. तर कांहीं वाईट माणसाच्या पदरीं पडलेल्या स्त्रियांनीं रचलेल्या दिसतात.

माझ्या चुडीयाचं सोनं पिवळं अद्धुळ। बापाजीनें माझ्या केली पारख वाद्धूळ ॥ माझें आयुष्य कमी करावें मारुती। माझ्या चुडीयाला घाल शंभर पुरतीं ॥

ह्या उलट खालच्या ओंव्यांतून उद्वेग मात्र दिसून येतो.

जीवाला जीव देऊं। काय देऊं मी तसल्याला। लोखंडी काळीज घाम येईना पाषाणाला ॥ जीवाला जीव देऊन पाहिला। पाण्यांत पाषाण अंगीं कोरडा राहिला ॥ ह्यांच्या ( नवऱ्याच्या ? ) बोलण्यानं मन माझं विटलं।

वाऱ्याच्या छंदानं पान केळींचं फाटंलं ॥ तोडीलं चंदन त्याच्या केल्या बारा फोडी । बायकापासोनी पुरुषांना माया थोडी ॥

सुसंस्कृत वाङ्मय हें बहुधा पुरुष–निर्मित असतें. बाईचें चित्रण ती सुंदर असेल तर प्रणयिनी, वल्लभा म्हणून येतें. क्वचित् माता म्हणून येतें. पण पितृसत्ताक कुटुम्बांत आई, मुलगी, सासू, पत्नी, जाऊ म्हणून तिला काय वाटतें तें कोठेंहि ओव्यांइतकें स्पष्टपणें आढळत नाहीं. पुरुषांच्या परमार्थांत स्त्री मोठी धोंड म्हणून परमार्थपर कवींनीं ह्या भोगवस्तूची यथेच्छ निंदाहि केली आहे. तिच्या हृदयाचा ठाव कोणीं घेण्याचा प्रयत्नच केला नाहीं. लोकवाङ्मयांत, स्त्रियांनीं रचलेल्या गीतांत पहिल्यानें त्याचें दर्शन होतें, शेवटीं नको तो स्त्रीजन्म अशी अवस्था होते.

बायकाचा जलमं देव घालूनी चुकला । कष्ट करूं करूं बैल भाड्याचा धुपला ॥ हात मी जोडीतें, तुला येते काकूळती । अस्तुरीजलम नको घालूं रघुपती ॥

केरळांतील मातृप्रधान कुटुम्ब

उत्तरेंत पुरुष घरचे घरीं रहातात. बायका बाहेरून आणलेल्या असतात. नर्मदेच्या दक्षिणेला पण पितृप्रधान संस्कृति आहे. पुरुष घरीं रहातात. सासुरवाशिणी सर्वस्वीं बाहेरच्या नसतात व मुली देतात त्याही कुटुंबांतल्या कुटुंबांतच. उत्तरेकडच्या प्रघातामुळें संबंधी व सोयरे यांची संख्या व क्षेत्र वाढत असतें. दाक्षिणात्यांच्या प्रघातामुळें मूळचेच संबंध दृढ होतात. कुटुंबीय आंतल्या आंत निरनिराळ्या तऱ्हेनें बांधले जातात. एकमेकांच्या मुली पिढ्यानपिढ्या करण्यामुळें सासर माहेर जवळ जवळ एकच होतें. उत्तरेकडे रक्ताच्या नात्याचीं जोडलेलीं माणसें व लग्नानें जोडलेलीं माणसें निरनिराळीं असतात व त्यांच्यासाठीं योजिलेले शब्दहि निरनिराळे असतात. दाक्षिणेंत सोयरे व रक्ताच्या नात्याचीं माणसें एकच होतात व उत्तरेकडच्या शब्दांखेरीज रोजच्या बोलण्यांत दोन्ही नातेवाइकांना योजिलेल्या संज्ञा एकच असतात.

केरळांत मातृप्रधान कुटुंबपद्धति आढळते. रक्ताचें नातें नसलेली कोणीही व्यक्ति कुटुंबीय होऊंच शकत नाहीं. कुटुंबांत बाई, तिच्या मुली, मुलगे व मुलीचीं अपत्यें रहातात. अशा कुटुंबाला थारवाड म्हणतात. थारवाडची मुख्य बाई असते. तिच्यामागून संपत्ती तिच्या मुलीकडे जाते. थोरला मुलगा जमीन जुमल्याची व्यवस्था पहातो. त्याला करणवन् म्हणतात. त्याच्या मागून त्याचा सर्वांत थोरला भाचा करणवन् होतो. कुटुंबांत आई, भाऊ बहिणी, भाचे व भाच्या असतात. मुलींचे नवरे किंवा घरांतल्या मुख्य बाईचा नवरा आपल्या स्वतःच्या आईच्या थारवाडमध्यें रहातात व सांजचा अधून मधून बायकोला भेटावयास येतात. कधीं एखाद्या सणावारीं नवऱ्याला जेवायला बोलावतात. त्याचप्रमाणें घरांतल्या मुलांच्या बायका आपापल्या घरीं असतात. रक्ताचे नातेवाईक असून कुटुंबीय नाहींत अशा व्यक्ति म्हणजे मुलांचीं मुलें. उत्तरेकडे पित्याच्या वंशाला प्राधान्य, केरळांत मातेच्या वंशाला प्राधान्य व मधल्या मुलखांत पितृवंशाला प्राधान्य असलें तरीही मातृवंश व पितृवंश लग्नानें जोडला जातो. उत्तरेकडच्या कुटुंबांत बाहेरून आणलेल्या सासुरवाशिणींचें परस्पर पटत नाहीं, सासुरवाशिणी व माहेरवाशिणी यांचें पटत नाहीं व घरांत तेढीचें वातावरण निर्माण होतें. केरळांत कुटुंबीय फक्त कुटुंबांत जन्मलेलेच असल्यामुळें वर दिलेलीं वैमनस्याचीं कारणेंच उत्पन्न होत नाहींत. सासबासुना, जावाजावा, वहिनी–वन्सं ह्यांचें साहचर्यच नसतें. मग भांडण कुठलें ? अशा समाजांत लोकगीतें कशाबद्दल असणार ? संसार नाटकांत प्रतिस्पर्धी कोण ? लोकगीतें वा लोककथा कुटुंबीय संबंध विषद करतील अशा तऱ्हेच्या मिळाल्या नाहींत. पण सत्यसृष्टींत मात्र कांहीं घटना आढळल्या, त्यावरून अशा कुटुंबांतील भावनांची ओढाताण काय असेल याचा अंदाज करतां येतो. या कुटुंबांत मुख्य तेढ मामा भाच्यांची असते. भावांच्या मनांत आपल्या मुलानें बहिणीच्या मुलीशीं लग्न करावें असें असतें व तो तसें करण्याची खटपटही करतो—नवरा म्हणून नव्हे, बाप म्हणून नव्हे, पण भाऊ म्हणून पुरुष घरांत अधिकार गाजवितात. तरीही उत्तरेकडच्या मानानें स्त्रिया अधिक स्वतंत्र असतात. नवऱ्याकडून डोक्याला लावावयाला तेल व नेसावयाला वस्त्र एवढ्याचीच अपेक्षा असते. बाकी सर्व त्यांना

स्वतःच्या मालकीच्या शेतांतून मिळतें. लग्नांत तेल साडी आणावयाची आपल्याकडील पद्धत ह्या दाक्षिणात्य रूढीचा अवशेष तर नाहींना अशी शंका येते. उत्तरेकडे व दक्षिणेकडे अशी पद्धत कोणत्या लोकांत आहे हें माहीत झाल्याशिवाय तेल साडी पाठवण्याच्या पद्धतीचा अर्थ काय तें कळणार नाहीं.

## मराठी कुटुम्ब म्हणजे उत्तर दक्षिणेचा संगम व संघर्ष

गंगेच्या दक्षिणेस जरी मातृसत्ताक कुटुंबपद्धती केरळाखेरीज इतरत्र रूढ नसली तरी स्त्रियांना पुष्कळ स्वातंत्र्य असतें व लोकगीतांत व लोक·कथांत मामा भाच्यांची जोडी नेहमीं दिसते. मंगळागौरीच्या कथेंत अल्पायुषी मुलाला मामा काशीयात्रेला घेऊन जातो, बाप नाहीं. भाच्याचे लाड मामाच्या घरीं नेहमीं होतात. मराठवाड्यांत कांहीं जातींत मामाला भाचीच्या पाया पडावें लागतें. एकंदरच बायकांना माहेरचें वेड फार असतें. माहेरच्या गाण्यांना अंतच नाहीं इतकीं तीं आहेत 'माहेरची पेज सवागीस तेज' ही म्हण सुपरिचितच आहे. माहेरचें एवढेसें असलें तरी सगळीकडे त्याची जाहिरात लागते. सासरचें देणें मोठें असलें तरी त्याची पर्वा नसते हें 'माहेरचं वांगं जनांत सांगे, सासरचा कोहळा गेला ओहळा' ही म्हण दाखविते. केरळांत माहेर हें बायकांना स्वगृह असतें. तांब्यांच्या नववधू कवितेंतील 'मात्र खरें घर तें' या शब्दांचा अर्थच त्या बायांना कळणार नाहीं. हल्लीं हल्लीं नायर बाया लग्न करून थारवाड मधून बाहेर फुटून नवऱ्याबरोबर स्वतंत्र संसार करूं लागल्या आहेत. पण वर्षांतून कित्येक महिने माहेरीं काढण्याची त्यांची खोड कायम आहे. एखादी नायर बाई सहा महिने आठ महिने माहेरीं गेली तर त्यांत नवल नसतें. मराठ्यांच्या मुलुखांतही माहेर शब्दाला अमृताची उपमा आहे. मुलींचें लग्न लवकर करतात, पण पदरकरणी होईपर्यंत त्यांना सासरीं पाठवीत नाहींत. पुढें पाठवल्या तरी त्या कांहींतरी निमित्त करून माहेरीं आल्या कीं ज्या एकदां तळ देतात त्या हलत नाहींत. दीर, नवरा, सासरा ह्यांना येऊन मोठ्या मिनतवारीनें त्यांना न्यावें लागतें. पुष्कळदां

हा प्रकार हास्यास्पद होतो. पण बरेच वेळां ह्यांतून वैमनस्य, मारामाऱ्या व खूनही उद्भवतात. लग्नासाठीं मुलीच्या आईबापांना पैसा मिळतो म्हणून नवऱ्याचीं माणसें लाचार असतात. इतके पैसे भरून बाई नांदेलच अशी खात्री नाहीं. बाईनें माहेरीं रहावें म्हणून आईबापांची खटपट असते. शेवटीं मुलगी पाठवीत नसला तर देज परत द्या असा तगादा नवऱ्याकडील माणसें लावतात, तर मुलीला इतके दिवस माहेरीं पोसलें तिचा खर्च द्या व बायकोला घेऊन जा असें प्रत्युत्तर मुलीच्या मंडळींकडून मिळतें. शेवटीं मारामारी होते किंवा नवऱ्याजवळ पैसे असल्यास तो दुसरें लग्न करतो. मुलीची माहेरची हौस, लग्न करून तिला घरींच ठेवण्याचा तिच्या कुटुंबीयांचा हट्ट व नवऱ्याची तिला नेण्यासाठीं चाललेली धडपड ह्या सर्व घटना संस्कृतिसंघर्षाच्या निदर्शक आहेत. दाक्षिणात्यांत स्त्रियांना स्वतंत्र दर्जा होता. उत्तरेकडून आलेल्या लोकांनीं पितृप्रधान कुटुंब संस्था व पित्यापासून पुत्राकडे वारसा अशी कुटुंब पद्धति रूढ केली, पण अजून ती जितकी आंगवळणीं पडावी तितकी पडली नाहीं व त्यामुळें विशेषतः शेतकऱ्यांत वरील तऱ्हेचा झगडा प्रत्यहीं दिसून येतो.

## आते-मामे भावंडांचें लग्न

आणखीही एका बाबतींत संस्कृतिसंघर्ष व जितजेतेपणाचे संबंध अनुभवास येतात. मराठी नातेवाचक शब्दांवरून साटेंलोटें व बहीण भावंडांनीं एकमेकांच्या मुली करून घेण्याची पद्धत असावी असें दिसतें. पण प्रत्यक्ष व्यवहार मात्र थोडा निराळा आहे. दोन चार जाती वगळल्यास इतर सर्व जातींत मामाच्या मुलीशीं लग्न करण्याची पद्धत आहे, आतेच्या मुलीशीं लग्न होतां कामा नये असा दंडक आहे. बहिणीची मुलगी भावाकडे सून म्हणून येणें ह्या प्रकाराला परतवेल होणें असें म्हणतात. वेल परत येतां कामा नये. ज्या बाजूला ती जात असेल तिकडे जाऊं द्यावी म्हणजे ती चांगली वाढते. तिला मागें वळवली तर तिची वृद्धि खुंटते. ही उपमा योजून मुलगी जिकडे दिली त्या घराण्यांत दुसरी मुलगी द्यावी. तिकडून परत मुलगी आपल्याकडे येऊं नये. तसें केल्यास वंश खुंटतो असें एक अजब कारण ह्या प्रघाताच्या पुष्ट्यर्थ देण्यांत येतें.

बहीण दिली कीं, तिच्या मागून मुलगी त्याच घराण्यांत द्यावी पण बहिणीची मुलगी सून आणूं नये. कारण तसें केल्यास परतवेल होते व वंश खुंटतो. सामाजिक चालीरीती आधीं येतात, त्यांची लौकिक कारण-परंपरा मागून निर्माण होते. लोक आधीं भाषा बोलतात मग व्याकरण निर्माण होतें. कांहीं सांस्कृतिक व ऐतिहासिक कारणांमुळें ही चाल पडली व मग तिच्या पुष्ट्यर्थ लोक कारणें शोधूं लागले व परतवेलीचें शास्त्र उत्पन्न झालें. ह्या चालीच्या बुडाशीं ऐतिहासिक कारणें आहेत. लग्न हा देवघेवीचा व्यवहार आहे. एखाद्या कुटुंबांत आपली मुलगी दिली तर त्या कुटुंबाला कांहींतरी परतफेड करावी लागते. ज्यांची मुलगी करायची त्यांना पैसे द्यावयाचे हा परतफेडीचा प्रकार गौण आहे. माणसाच्या बदला माणूसच पाहिजे.ज्या घरची मुलगी केली त्या घरीं मुलगी दिली पाहिजे. एकाच पिढींत अदलाबदल न झाल्यास निदान मुलीची मुलगी तरी परत आली पाहिजे. ह्या न्यायानें पाहिल्यास बहिणीची मुलगी सून करून घेणेंच रास्त आहे. कर्नाटकांत बहिणीची मुलगी सून करून घेण्याची प्रथा सर्वत्र आहे. ह्याशिवाय पुरुषाला स्वतः थोरल्या बहिणीच्या मुलीशींहि ( अक्कन मगळु ) लग्न करतां येतें. म्हणजे मामाचें भाचीशीं लग्न होतें. मामाभाचींचें लग्न म्हणजेहि वरील तत्वाचेंच उदाहरण आहे. कर्नाटकांत साटेंलोटें करण्याचाही प्रघात असल्यामुळें आत्या मामी होते व आत्याची मुलगी मामाची मुलगीही होते. पण ,जर आत्या मामाची बायको नसेल तर आत्याच्याच मुलीशीं लग्न करणें योग्य समजतात. मामाच्याच मुलीशीं लग्न करायचें ह्याचा अर्थ ज्या कुटुंबांतून वधू आणली त्याच कुटुंबांतून दुसरी वधू आणणें व जिकडे मुलगी दिली तिकडे दुसरी देणें असा आहे. आत्या = मामी व आत्याच्या मुलीशीं लग्न म्हणजे दोन कुटुंबांनीं मुलींची देवघेव करणें असा होतो. हा दुसरा प्रकार समान हक्काचा, समान देवघेवीचा असा आहे. पहिला प्रकार तसा खासच नाहीं. कोठचेही दोन समाज एकत्र आले किंवा त्यांचा संघर्ष झाला तर जेत्यांनीं जितांच्या स्त्रिया बायका म्हणून करणें हा जेत्यांचा हक्क असतो. त्यांत जेत्यांना कमीपणा वाटत नाहीं. ह्याउलट जेते जितांना आपल्या मुली कदापि देत नाहींत. “स्त्री रत्नं दुष्कुलादपि” ह्या जुन्या वचनाचा असाच अर्थ दिसतो. दुष्कुल म्हणजे आपल्यापेक्षां कमी, हीन दर्जाचें असा

घेतल्यास त्यांतून वरील सामाजिक तत्त्व निघतें. एकादा समाज उच्च-कनिष्ठ जातींत विभागलेला असला किंवा एखादी जात उच्च-कनिष्ठ कुळांची मिळून झाली असेल तर त्यांतहि वरील तत्त्वावर लग्नें होतात. प्रत्येकाला आपली मुलगी उच्च कुळांत जावीसें वाटतें. ह्याउलट हुंडा घेऊन खालच्या कुळांतल्या मुली करतां येतात. जी जात किंवा कुळी सर्वांत श्रेष्ठ त्यांतील मुली ह्यामुळें बऱ्याचदां लग्नाच्या रहातात व खालच्या जातींतून मुली कमी पडतात. रजपुतांत शिसोदिया कुळ सर्वांत उच्च समजतात. त्यांनीं मुली द्याव्या अशीं दोनचार कुळेंच राजपुतान्यांत आहेत. ह्यामुळें शिसोदिया घराण्याच्या फार मुली कुंवार रहातात. डॉ. धीरेन्द्र मुजुमदार लिहितात कीं, पंजाबांतही हीच चाल असल्यामुळें उच्च कुळांत बहुपत्नीत्व दिसून येतें व गरिबांना मुली कमी पडल्यामुळें व मुलींचा हुंडा जबर असल्यामुळें खालच्या जातींतून बहुपतित्व म्हणजे दोनचार भावांमिळून एक बायको असा प्रघात दिसतो. मराठ्यांतही जातीची विभागणी उच्च-नीच कुळांत झाली आहे. मुलगी वर द्यावयाची व खालच्या कुळांतून जबर हुंडा मिळाल्यास क्वचित् करून घ्यावयाची असा प्रघात आहे. आईचें कूळ आपल्या कुळापेक्षां कमी असण्याचा संभव असल्यामुळें तिच्या कुळांतून मुलगी करून घेण्यास हरकत नाहीं. पण तिच्या कुळांत मुलगी द्यावयाची नाहीं अशी चाल पडली. जेत्यांनीं एतद्देशियांच्या मुली केल्या, पण होतांहोईतों आपल्या दिल्या नाहींत असा ह्या चालीचा ऐतिहासिक अर्थ निघतो. द्राविड देशांतील चाल त्यांनीं उचलली पण सार्टेलोर्टे, जित जेते संबंधामुळें मान्य झालें नाहीं व आत्याच्या मुलीशीं लग्नहि त्याच कारणामुळें रूढ झालें नाहीं. उरलासुरला मातुलकन्या परिणयाचा मार्ग. तो मात्र स्वीकारला गेला. दोन संस्कृतींच्या मध्यावर वसलेल्या मराठी संस्कृतीची कुटुंबव्यवस्था ही दोन संस्कृतींमधील संघर्ष व तडजोड ह्यांचें प्रतीक असावें हें योग्यच आहे. हिंदुस्थानांत ज्या ज्या प्रदेशांत व ज्या ज्या जातींत मामाच्या मुलीशीं लग्न ( आतेच्या नाहीं ) असा दंडक दिसतो, तेथें तेथें जितजेते, श्रेष्ठकनिष्ठ असा संबंध दृष्टोत्पत्तीस येतो. राजपुताना, काठेवाड व गुजरात येथें मामाच्या मुलीशीं लग्नाचा प्रघात रजपूत, काठी वगैरे जातींत दिसतो. "फई पाछळ भत्रीजी जाय" अशी म्हण त्यांच्यांत आहे. तिचा

अर्थ फई ( आत्या ) ज्या घरीं जाते त्याच घरीं तिच्यामागून भत्रीजी ( भावाची मुलगी, भाची ) जाते. कर्नाटकांत कांहीं ब्राम्हण जातींत मामाच्या मुलीशीं लग्न करण्याचा प्रघात आहे. आत्याशीं करूं नये अशाबद्दल बरोबर आपल्याकडील परतवेलीसारखीच म्हण व मीमांसा आहे. कर्नाटकीय ब्राम्हण बरेचसे बाहेरून गेलेले असावेत असें वाटण्यास बरींच कारणें आहेत.

आईकडची नातेबाईक मंडळी ( मामा वगैरे ) तीच बापाकडची झाली. (मामाची बायको=आत्या ) लग्नाचीं नातेबाईक माणसें ( नवरा=आतेभाऊ किंवा मामेभाऊ; बहिनी=वन्सं=आतेबहीण वगैरे ) म्हणजेच माहेरचीं माणसें झालीं म्हणजे एकंदर माहेरचें प्रस्थ वाढतें व स्त्रीला संसारांत जास्त मानाचें स्थान मिळतें. कारण ती सर्वस्वीं परघरीं जात नाहीं. साटेंलोटें पद्धत म्हणजे ओलीस ठेवण्याचाच प्रकार आहे. एकमेकांच्या मुली एकमेकांकडे असल्यामुळें एकीला जी वागणूक मिळते, तीच दुसरीला मिळण्याचा संभव असतो. म्हणून सासुरवास कमी होत असावा त्याचप्रमाणें अशा लग्नांत हुंडा किंवा देज कमी द्यावें लागतें. एकंदरींतच श्रीमंत ब्राम्हण व कुळीचे मराठे ह्यांच्याखेरीज हुंड्याचें प्रस्थ महाराष्ट्रांत फार कमी आहे.

“ दाक्षिणात्यांचें अंतःपूर ” म्हणून एक लेख कै. श्री. व्यं. केतकर ह्यांनीं लिहिला होता. त्यांत त्यांनीं असें दाखवलें कीं, महाराष्ट्रांत व एकंदरीनेंच दक्षिणेंत स्त्रियांनीं राजकारणांत भाग घेऊन राजकारणाचा चुथडा केला. स्त्रियांना ढवळाढवळ करूं न दिल्यामुळें उत्तर भारताचें राजकारण मोठें नांवाजण्यासारखें झालें असें मुळींच नाहीं. पण केतकरांचा विशिष्ट दृष्टिकोन सोडून दिला तरी दाक्षिणात्यांच्या इतिहासांत स्त्रियांनीं बराच भाग घेतला व नांव गाजवलें ह्यांत शंका नाहीं. शातवाहनांचे शिलालेख त्यांच्या आयाबहिणी व राण्या ह्यांचे आहेत. शातवाहन राजांचीं नांवेंही वाशिष्ठीपुत्र, गौतमीपुत्र अशीं मातृपरंपराद्योतक आहेत. ऐहोळेच्या उत्तमोत्तम मंदिरांत विजयादित्याच्या दोन राण्यांनीं बांधलेलीं मंदिरें प्रसिद्ध आहेत. पट्टमहादेवीनें राजाच्या पल्लवावरील विजयी स्वारीचें स्मारक म्हणून विजयेश्वराचें देऊळ बांधवलें, त्रैलोक्य महादेवी ( थोरल्या

राणीची धाकटी बहीण ) हिनें त्रैलोक्येश्वराचें देऊळ बांधवलें व त्यावर शिलालेख खोदवले. इतकेंच काय पण विजयादित्याची नाटकशाळा वीणापोटी हिनें महाकूटला मोठें शिवालय बांधवून विजयादित्याची प्राणवल्लभा म्हणून आपला शिलालेख त्यावर कोरवला. यादवांच्या वेळीं रामदेवराव ह्याची एक राणी कामाइसा हिनें महानुभाव पंथाची दीक्षा घेतली होती असें दिसतें. मराठ्यांच्या इतिहासांत तर प्रसिद्ध स्त्रिया पुष्कळच होऊन गेल्या. जिजाबाईचा मोठेपणा केवळ युगपुरुषाची आई म्हणून नव्हे. नवऱ्याच्या थोडेंसें मर्जीविरुद्धच्च जिजाबाईनीं शिवाजी महाराजांना मोगलांविरुद्ध उठावाची शिकवणी दिली व वेळोवेळीं प्रोत्साहन दिलें. ताराबाई नसत्या तर कोल्हापूरचें नांवच ऐकूं आलें नसतें. होळकरांची सासुरवाशिण अहिल्याबाई ह्यांनीं सबंध कुळ आपल्या प्रतिभेनें उजळलें. सत्तावन सालच्या बंडांतील लक्ष्मीबाई तर प्रसिद्धच आहेत. जिजाबाईनीं मुलाला युगपुरुषाचें शिक्षण दिलें. ताराबाई, अहिल्याबाई व लक्ष्मीबाई नवऱ्याच्या मागें आपल्या मुलासाठीं राज्य राखण्यास झटल्या. आनंदी-बाईनें नवऱ्याला पेशवेपद मिळावें म्हणून खटपट केली. तरी एकंदरीनें महाराष्ट्रांतील गीतांतून स्त्रीचा मातृस्वरूपांतील आविष्कार फार प्रभावी आहे. मराठी बायकांच्या गीतांत आई व बया ह्यांना खडिसाखर, गंगामाई, गोदाबाई, सती, पतिव्रता म्हटलेलें आहे. माहेरची ओढ सर्व आईसाठीं असते. बापाचा उल्लेख प्रेमळपणें केलेला आहे पण तसाच रागानें केलेलाही आढळतो, पण " आई " ला मात्र प्रेमाची मूर्ति केलेलें आहे. आणि बायकाच आईवेड्या असतात असें थोडेंच आहे? महाराष्ट्रीय पुरुषांनीं-सुद्धां आपलें आईचें वेड वाङ्मयांत अजरामर करून ठेवलें आहे. सूर्याचें तेजस्वी प्रतीक—त्रिभुवन तीन पावलांत व्यापणारा देदीप्यमान विष्णु—मराठी मुलखांत येऊन रंग पालटून पंढरपूरचा काळा विठ्ठल होतो, येवढेंच नाहीं तर आपली पुरुषजात बदलून लाखों भक्तांच्या हृदयांत विठाई माउली म्हणून वसतो. पुरुषदेवाला हें स्त्रीवाचक बिरुद म्हणजे वस्तु-स्थितीवर संस्कृतीनें गाजवलेला विजय होय. प्राचीन इजिप्तमध्यें बरोबर ह्याच्या उलट एक उदाहरण आढळतें. हाटशेप सूट म्हणून एक प्रख्यात

राणी होऊन गेली. इजिप्तच्या सिंहासनावर सूर्याचें प्रतीक म्हणून पुरुषानेंच बसलें पाहिजे असा नियम होता. त्याला धाब्यावर बसवून ही बाई गादीवर बसली. पण तिच्या कारकीर्दीत खोदवलेल्या सर्व शिलाशासनांवर तिचा उल्लेख पुल्लिंगांत केलेला आढळतो. जैन तीर्थंकरांपैकीं १९ वी तीर्थंकर मल्ली ही बाई असूनही व तिच्या चरित्रांत तसें स्पष्ट लिहिलें असूनही सर्व ठिकाणीं मल्लीनाथ तीर्थंकर असा पुल्लिंगी उल्लेखच तिच्याबद्दल आढळतो. संस्कृतीची पकड समाजावर किती घट्ट असते त्याचीं हीं उदाहरणें आहेत. मराठी मुलखांत पुरुष देव जसा माउली होतो तसा गुरूही गुरुमाउली होतो व मराठ्यांचे आद्यकवी ज्ञानेश्वरही ज्ञानेश्वरमाउली होतात. तुकारामबुवांच्या अभंगांत आईच्या प्रेमाचे, वत्सलतेचे, कळवळ्याचे, लाभावीण प्रीतीचे वारंवार आलेले दृष्टान्त किती हृद्य आहेत हें मराठी लोकांना सांगणें न लगे. " वंदे मातरम् " ह्या राष्ट्रगीताबद्दलचें महाराष्ट्रियांचें प्रेम ह्या भावनेचेंच निदर्शक असेल काय ? मराठ्यांची राष्ट्रदेवता भवानी आई आहे, आणि कुलदैवत बाईलवेडा शंकर आहे, हें ध्यानांत आलें, म्हणजे कुटुंबपद्धतीचीं संस्कृति-बीजें किती खोलवर रुजलीं आहेत हें कळेल.

## विधवेचें कुटुम्बांत स्थान

निरनिराळ्या कुटुंब पद्धतींत विधवा व निपुत्रिका स्त्रियांची परिस्थिति निरनिराळी असते. बापाच्या घरीं मुलगी म्हणून असली कीं, तिच्या मोबदल्यांत चांगल्या मातब्बर घराण्याशीं संबंध येण्याचा संभव असतो, म्हणून तिचें रक्षण करावयाचें व एकाद्या बलाढ्य प्रतिस्पर्ध्याला ती देऊन त्याचें सख्य संपादन करावयाचें. दुसरें कांहींच नाहीं तर निदान तिच्या लग्नांत देज येईल तें घ्यावयाचें असे तिचे नाना उपयोग असतात. मुलीचे असे उपयोग केल्याचें इतिहासांत पदोपदीं दिसतें. लग्न झालें म्हणजे नव्या घरीं तिनें राबावें, वडिलांचें ऐकावें व पुरुष अपत्यांना जन्म द्यावा अशी अपेक्षा असते. वांझेबद्दल लोकगीतें, लोककथा व वाक्प्रचार इतके आहेत कीं, त्यांत निवड करणेंच कठीण. अशी बाई माहेरीं नको असते व सासरीं पण नको असते. मूल होण्याची कोणाही बाईला तळमळ

असणारच. तिला ती ओढ नैसर्गिकच आहे. जीवशास्त्राच्या दृष्टीनेंही तो बायकोपणाचा आद्य हेतु आहे आणि म्हणूनच जगांतील सर्व समाजांत मूल होणें अति मानाचें समजलें जातें व पितृप्रधान कुटुंबांत मुलगा होणें महत्वाचें गणलेलें आहे. मातृप्रधान कुटुंबांत तितकाच मान मुलीच्या आईला मिळतो. एखादी बाई निपुत्रिक आणि विधवा असेल तर तिच्या दुःखाला पारावार नसतो. पितृप्रधान कुटुंबांत सौभाग्यवती व पुत्राची माता झालेली बाई सासरची सम्राज्ञी होते. माहेरचें दुःख ती विसरूं शकते. पण ती विधवा असली व त्यांतूनही ती निपुत्रिक असली तर तिचा पदोपदीं अपमान होतो. बाईला धार्मिक कृ यांत जें कांहीं थोडें स्थान असतें तें पुरुषाची पत्नी म्हणून. तें तिला नाहींसें होतें. वरच्या जातींतून पुनर्लग्नाची चाल नाहीं. सुदैवानें ब्राह्मणेतर बहुतेक जातींत ती आहे. कांहीं जातींत विधवा बाईला जास्त मागणी असते. बहुतेक जातींत विधवेनें विधुराशींच लग्न करावें असा दंडक आहे. विधवेनें पुनर्लग्न केलें म्हणजे तिला अर्थात् परत नवऱ्या घरीं घरधनीण व मुलांची आई म्हणून मिरविण्याची शक्यता असते. 'आयाबचें गेलें खेळुक, रांडेचें बाबर्डे गेलें जल्मजुगाक ' ही म्हण बहुधा ब्राह्मणांतली असावी. म्हणजे जिचा नवरा जिवंत आहे अशा बाईचें मूल मेलें तर तें जणूं लांब खेळावयाला गेलें आहे. तिला दुसरें मूल झालें म्हणजे जणूं परलोकीं गेलेलें तिचें मूल परत यावयाचा संभव असतो. पण रांडेचें म्हणजे विधवेचें मूल मेलें कीं तें कायमचेंच गेलें. कारण तिला पुनर्लग्न नाहीं व पुन्हां संसारही नाहीं. ह्याउलट मातृप्रधान कुटुंबांत बाई कुटुंबाची मुख्य असल्यामुळें वैधव्यामुळें तिच्या सामाजिक दर्जांत कांहींही फरक होत नाहीं. केरळांत जोंपर्यंत अशी बाई वैधव्य पाळते तोंपर्यंत तिला नवऱ्याच्या घरून डोक्याला लावावयाला खोबरेल तेल व नेसावयाला वस्त्रें मिळतात. तिनें दुसरा नवरा केला कीं ह्या वस्तु देण्याची जबाबदारी दुसऱ्या नवऱ्यावर येते. धान्य वगैरे इतर वस्तू घराच्या शेतावर पिकतात. त्या नवऱ्याकडून घ्यावयाची गरज नसते. पण तेल आणि वस्त्र मात्र नवऱ्यानें दिलें पाहिजे असा तिकडे नियम आहे. त्याचप्रमाणें विधवाविवाहाला मराठी शब्द पाट लावणें असा आहे. ह्याचा अर्थ वस्त्र नेसवणें असा

असावा. सासरकडून उघड्या पडलेल्या बाईला परत वस्त्र देणें असा ह्यांतील अर्थ दिसतो. कानडींत विधवाविवाहाला उडिके माडु म्हणतात. ह्याचा अर्थ विधवेला साडी-चोळी देण व अशा तऱ्हेनें तिच्याशीं लग्न लावणें असा डॉ. किटेल हे देतात. त्यावरूनही वरीलच अर्थ निष्पन्न होतो. हिंदींत विधवाविवाहाला सगाई ( सख्य ) असें नांव आहे. विधवेच्या लग्नाला हिंदुस्थानांतील सर्व भाषेंतून पहिल्या लग्नापेक्षां अगदीं निराळा शब्द वापरतात. पहिल्या लग्नाला विवाह, लग्न, मंगल, कल्याण, मदुवे असे शब्द आहेत, तर दुसऱ्या लग्नाला पाट, सगाई, नांतरा, उडिके माडु असे शब्द आढळतात. पहिलें तेंच लग्न, दुसरें नव्हे असा ध्वनि त्यांतून निघतो. प्राचीन काळीं उत्तरेंत "कुले कन्या प्रदानं" असे तेव्हां एकदां मोठ्या भावाशीं लग्न झालें म्हणजे तो मेला तरी विधवेला क्रमप्राप्त दीर मिळतच असे व म्हणून विधवा पुनर्विवाहाची भानगडच नसावी असें दिसतें. महाराष्ट्रांत ( नागपूर, भंडारा प्रांत सोडल्यास ) विधवेनें दिराशींच काय पण नवऱ्याच्या कुळांतील इतर कोणाशींहि पाट लावतां कामा नये असा दंडक आहे.

ह्याप्रमाणें महाराष्ट्रांतील कुटुंबपद्धति ही संस्कृति—संघर्षाची निदर्शक आहे. उत्तर महाराष्ट्रांतील कित्येक जाती उत्तर भारतीय असाव्या असें आपण मागच्या प्रकरणांत अनुमान केलें. त्याला कुटुंबपद्धतीच्या अभ्यासामुळें पुष्टि मिळते. उत्तर महाराष्ट्रांत आजही दियेरवटूंची चाल आहे आणि ह्याउलट मध्यमहाराष्ट्रांत दियेरवटू नाहीं व मातुलकन्या परिणय आहे आणि कर्नाटकी रिवाजाप्रमाणें मामाभाचींचें लग्न होतें. नातेवाचक शब्दसंग्रह बहुतेक संस्कृतोद्भव आहे. पण कांहीं नांवांत कानडीचा अंश आहे व सर्वच शब्द-संग्रह समजण्यास दाक्षिणात्यांची कुटुंबपद्धति समजणें आवश्यक होतें. शब्द-संग्रहाची पिठीका साटेंलोटें व आतेमामेभावंडांचें लग्न अशी आहे. पण प्रत्यक्षांत साटेंलोटें कमी मानाचें समजतात व आतेच्या मुलीशीं लग्न होत नाहीं. हा फरक जितजेतेपणाच्या संबंधामुळें उत्पन्न झालेला आहे. कुटुंब पितृप्रधान, वंशपरंपरा पितृ-पुत्र-पौत्र अशी, संपत्ति बापाकडून मुलाकडे जावयाची. ह्या सर्व गोष्टी उत्तरेकडच्या आहेत; पण बायकांची माहेरची

ओढ, सासरी जायला खळखळ, ह्या सर्व गोष्टी दाक्षिणात्यांच्या भावनांच्या निदर्शक आहेत. मराठ्यांची कुळीची पद्धति, मराठा व कुणबी हा फरक हे सुद्धां जितजेतेपणाच्या संबंधाचे निदर्शक आहेत. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे दिसतें कीं, नुसतें प्रादेशिकदृष्टयाच नव्हे तर सांस्कृतिकदृष्टयाहि मराठी समाजाचें स्थान उत्तरीय व दाक्षिणात्य समाजांच्या मधलें आहे. पण जेते उत्तरीय असल्यामुळें कांटा उत्तरेकडे झुकत आहे ही गोष्ट महाराष्ट्राचा इतिहास, भाषा व धर्म ह्याचा अभ्यास केल्यानें सिद्ध होते. कशी तें आतां पाहूं.



६

# महाराष्ट्राची वसाहत व भाषा

## (१) भारताच्या सांस्कृतिक इतिहासाचीं साधनें

उत्तरेकडे पशुपाल आर्य कधीं आले तें नक्की माहित नाहीं. त्याचप्रमाणें ते यावयाच्या आधीं गंगेच्या खोऱ्यांत व सिंधु प्रदेशांत कोण लोक होते तेंहि पूर्णतया माहीत नाहीं. पण संस्कृत वाङ्मयांत जुने राजवंश, जुन्या काळीं झालेलीं युद्धें, बऱ्याचशा जमातींचीं नांवें व आर्यांचा प्रसार दाखवणाऱ्या कथा आढळतात. संस्कृत वाङ्मयाला पुरवणी म्हणून बौद्धांचें पालींतील व संस्कृतांतील वाङ्मय आहे. ह्यांत पुष्कळदां संस्कृत वाङ्मयांत न आढळणाऱ्या गोष्टीहि आढळतात. बुद्ध भिक्षू परदेशीं जात असल्यामुळें इतर देशांच्या कथाहि ह्या वाङ्मयांत आढळतात. तिसरी वाङ्मयीन परंपरा जैनांची आहे व तिच्यांतही अति प्राचीन ( महाभारत कालाच्याहि आधींच्या ) गोष्टींचे उल्लेख आहेत. जैन वाङ्मयांत बऱ्याच ठिकाणीं संस्कृत वाङ्मयांत सांगितलेल्या गोष्टी, कालपरंपरा व राजवंश उलटे पालटे करून, विकृत करून सांगितलेल्या आहेत. संप्रदायाच्या अभिनिवेशानें ह्या गोष्टी बुद्ध्या केलेल्या आहेत व म्हणून जैन वाङ्मयाकडे विद्वानांचें पहिल्या प्रथम जावें तितकें लक्ष गेलें नाहीं. पण त्या वाङ्मयांत–विशेषतः कथा वाङ्मयांत–कांहीं जुन्या गोष्टी संस्कृत मात्र व सौत वाङ्मयापेक्षां जास्त शुद्ध स्वरूपांत टिकून आहेत असें आतां आढळून आल्यामुळें सध्यां त्या वाङ्मयाचें परिशीलन उत्साहानें होत आहे. भारतांतील जुनी संस्कृति,

वसाहत वगैरेच्या ज्ञानास आवश्यक अशा ह्या वर दिलेल्या साधनसामुग्री-खेरीज खिस्त शकाच्या सुमाराचीं शिलासनें हें एक महत्त्वाचें साधन आहे आणि विशेष महत्त्वाचें साधन म्हणजे उत्खननाचे रूपानें झालेलें वस्तुमय संस्कृतीचें दर्शन हें होय. उत्खननामुळें भारतांतील मानवांच्या हालचालीचा गेल्या दोन अडीच लाख वर्षांपासूनचा थोडथोडा सुगावा हल्लीं लागूं लागला आहे. पण वाङ्मय जितकें विपुल त्या मानान उत्खनन फारच थोडें झालें आहे व त्यामुळें उत्खननानें हातीं आलेला पुरावा जरी निश्चित असला तरी अतिशय थोडा व विस्कळित असा आहे. ह्या पुराव्यावरुन कांहीं अनुमानें बांधणें जरा धोक्याचें आहे, कारण दरवर्षी नवनवा पुरावा पुढें येत आहे व तो आला म्हणजे जुनी कल्पना बदलावी लागते. तरी देखील १९५१ च्या आरंभींचे काय कयास आहेत हें सांगणें अस्थानीं होणार नाहीं.

## अश्मयुगांतील भारत

उत्तर पंजाबमध्यें सिंधूला मिळणारी सोहन ( शोभना ? ) नांवाची नदी आहे. तिच्या कांठीं, गुजरातेंत साबरमती, मही, वगैरे नद्यांच्या कांठीं, मध्य हिंदुस्थानांत नर्मदेचे कांठीं, महाराष्ट्रांत नाशिक जवळ गोदेचे कांठीं, कर्नाटकांत कृष्णेचे कांठीं व मद्रास इलाख्यांत मद्रास व कर्नूल येथें अति पुराण कालांतील अश्मयुगीन हत्यारें सांपडलीं आहेत. हिंदुस्थानांतील इतर नद्यांचे कांठीं संशोधन झालें तर तेथेंही अशीं हत्यारें सांपडण्याचा संभव आहे.

सोहन नदीच्या कांठीं सुमारें सहा लाख वर्षांपासून तो दोन लाख वर्षांपर्यंतच्या कालखंडांतील हत्यारें सांपडलीं आहेत. इतर ठिकाणचीं फार तर २–३ लाख वर्षांपूर्वीचींच आहेत. सोहनकांठचीं हत्यारें ब्रह्मदेश व चीनमध्यें त्या कालखंडांत सांपडतात तशा तऱ्हेचीं आहेत. तीं करणारीं माणसें ' आदिमानव ' वंशाचीं असून तीं जावा, ब्रह्मदेश, चीन व भारत एवढ्या प्रदेशांत रहात होतीं असा कयास आहे. हा सबंध मानववंश नष्ट झाला व आजच्या भारतांत त्यांचे वंशज कोणीही नाहींत.

ह्या पुढच्या कालखंडांत दोन तऱ्हेचीं हत्यारें सांपडतात. दक्षिण हिंदुस्थानांत मुख्यत्वें नदीच्या पात्रांत सांपडणारे गोटे ( लांबट गोल

आकाराचे ) घेऊन, सर्व बाजूंनीं त्यांचे कळपे काढून बनवलेलीं हत्यारें दिसतात. ह्या हत्यारांत पुष्कळदां हातांत धरावयाची बाजू तशीच—मूळ गोट्यांत असते तशीच—ठेवलेली असते. हळू हळू हत्यारें करण्यांत प्रगति होऊन सबंध गोटा सर्व बाजूंनीं लहान लहान कळपे काढून बदामाच्या आकारासारखा करण्यांत यश येऊं लागलें. ह्या हत्यारांना गोटयाच्या गाभ्याचीं हत्यारें किंवा नुसतींच ' गाभ्याचीं ' ( core ) हत्यारें म्हणतात.

दुसऱ्या तऱ्हेचीं हत्यारें पण नदीच्या गोटयापासूनच करीत, पण वर दिलेल्या रीतींत मूळ गोटा ( कळपे काढून राहिलेला ) हत्यार म्हणून वापरीत तर ह्या दुसऱ्या तऱ्हेत कळपेंच हत्यारें म्हणून वापरीत. ह्यामुळें शक्य तेवढे मोठे कळपे काढण्याकडे कल असे. ह्याच रीतींत पुढें प्रगति होऊन पहिल्यानें गोटयाच्या ज्या बाजूचा कळपा काढावयाचा त्याला आकार देऊन मग एका घावानें कळपा काढूं लागले. अशा हत्यारांना 'कळप्याचीं' ( Flake ) हत्यारें म्हणतात. युरोपांतील उत्खननावरून असें दिसून येतें कीं ह्या दोन तऱ्हेचीं हत्यारें करणारे लोक निरानिराळ्या मानव-वंशांतील होते. कळप्याचीं हत्यारें करणारे लोक जुन्या मानववंशांतील समजले जातात. ते थेट युरोपमध्येंही वसाहत करून होते. ह्या वंशांतील माणसांना युरोपांत 'निआंडरटाल्'चा माणूस असें म्हणतात. जाव्हा ( यवद्वीप ) व चीन येथें सांपडलेल्या आदिमानव वंशापासूनच पुढें निआंडरटाल मनुष्य उत्पन्न झाला असावा अशी कल्पना आहे. गाभ्याचीं हत्यारें करणारे लोक बऱ्याच बाबतींत आधुनिक मानवासारखे होते. गाभ्याचीं हत्यारें दक्षिण आफ्रिका, हिंदुस्थान व युरोप येथें सांपडतात व तीं पुष्कळदां इतकीं सारखीं असतात कीं एकाच हातचीं तीं असावींत असें पाहणाराला वाटतें. हत्यारें करणारे लोकहि एकाच मानववंशाचे असावे कीं काय ह्या प्रश्नाचें उत्तर पूर्णतया देतां येत नाहीं, कारण भारतांत अजून हीं हत्यारें बनवणाऱ्या मानवांचे सांगाडे सांपडलेले नाहींत. पूर्वी संशोधकांची अशी कल्पना होती कीं गाभ्याचीं हत्यारें बनवणारा मानव-वंश व कळप्यांचीं हत्यारें बनवणारा मानववंश ह्यांची कधीं गांठच पडली नाहीं. कळप्यांचीं हत्यारें करणाऱ्या मानवांचा अस्त झाल्यावरच गाभ्याचीं

हत्यारें करणारे लोक युरोपांत आले; पण आतां असा पुरावा सांपडला आहे कीं, पॅलेस्टाइन व दक्षिण युरोपांत हे लोक एकाच वेळीं शेजारीं शेजारीं रहात होते व कांहीं सांगाड्यांच्या शरीरप्रमाणावरून ते ह्या दोन वंशांच्या मिश्रणानें झाले असावे असें दिसतें. हिंदुस्थानांतहि कदाचित् असाच प्रकार झाला असेल. पण प्रत्यक्ष सांगाडे मात्र न सांपडल्यामुळें अनुमानावरच भागवावें लागतें. गुजरात, नर्मदाप्रदेश, गोदाकांठ, दक्षिण हिंदुस्थान ह्या प्रदेशांत व पंजाबांत गाभ्याचीं हत्यारें सांपडलीं आहेत. बाकीच्या भारतांत हे लोक नसावे असा कयास आहे. तेथें सोहन नदीकांठचे कळप्याचीं हत्यारें करणारे मानव असावेत असा तर्क आहे. हा तर्क सर्वस्वीं चूक असण्याचाहि संभव आहे. कारण अजून व्हावें तितकें उत्खनन झालें नाहीं. पण जर हा तर्क बरोबर असेल तर गाभ्याचीं हत्यारें करणारे लोक वायव्येकडील द्वारानें ( बलुचिस्तान , सिंधमधून ) भारतांत आले व सोहनकांठचे लोक चीन किंवा ब्रह्मदेशांतून पूर्वेकडच्या दारानें आले असें होतें.

## दुसरें अश्मयुग

ह्या हत्यारांचें युग संपून दगडांचींच पण निराळ्या तऱ्हेनें बनवलेलीं व निराळ्या मानववंशांशीं संलग्न अशीं हत्यारें युरोपांत सुमारें २० हजार वर्षांपासूनचीं सांपडतात. हीं हत्यारें करतांना पाहिल्यानें दगडाचे कळपे काढून सर्व बाजूंनीं गाभ्यास आकार देतात व मग तो गाभा गुळगुळीत करतात. त्या आधींहि नव्या जुन्या अश्मयुगाच्या संधिकाळांत अत्यंत लहान लहान दगडांचीं हत्यारें सांपडतात व त्यामुळें ह्या संधिकालाला क्षुद्राश्म युग म्हणण्याचा प्रघात आहे. हीं हत्यारें इतकीं लहान आहेत कीं तीं नुसतीं वापरणें शक्यच नाहीं. दगडाचे लहान लहान कळपे बाणाचें टोक म्हणून, किंवा लाकडांत, नाहींतर हाडांच्या सांदींत बसवून करवत किंवा सुरी म्हणून वापरीत. युरोपांत ह्या काळांतलीं माणसेंहि आढळलीं आहेत व तीं सर्वस्वीं आधुनिक काळांतील दिसतात.

हिंदुस्थानांत क्षुद्राश्म युगाचें उत्तम संशोधन उत्तर गुजरातमध्यें झालें आहे. उत्तर गुजरातभर जवळ जवळ सर्वत्र ह्या माणसांच्या वसाहती, त्यांचे सांगाडे व त्यांनीं खाऊन टाकलेल्या प्राण्यांचे अवशेष सांपडले आहेत. वसाहती

बहुतेक ठिकाणीं तळ्याकाठीं असत व माणसें बहुधा शिकारीवरच रहात. शेतीचीं हत्यारें कांहींच सांपडलीं नाहींत. हीं माणसें जमिनींत ज्या खोलीवर सांपडलीं त्यावरून कालमापन नीट करतां येत नाहीं. ह्या लोकांनीं कुत्रा माणसाळवला होता असें दिसतें. माणसांची उंची ५ फूट ६ इंच, डोकें लांब, नाक रुंद अशा तऱ्हेचीं तीं आहेत. शरीराचीं सर्वच हाडें बारीक आहेत. अहमदाबादेच्या उत्तरेस ही वसती फार मोठ्या प्रदेशावर—जवळ जवळ राजपुतान्याच्या हद्दीपर्यंत—होती असें दिसतें. दक्षिणेकडे, पूर्वेकडे वा पश्चिमेकडे ह्या लोकांचा प्रसार होता कीं नाहीं हें संशोधन व उत्खनन ह्यांशिवाय कळणार नाहीं. पण नाशिक येथें व म्हैसूर संस्थानांत चितळ-दुर्गजवळ जें उत्खनन झालें त्यावरून असें दिसून येतें कीं क्षुद्राश्मांचीं हत्यारें करणारे हे लोक खिस्तीयुगाच्या आधीं जवळ जवळ दोन हजार वर्षें महाराष्ट्रांत व कर्नाटकांत पसरले होते. मात्र त्यांच्या वसाहती थोड्या आहेत, सांगाडे मिळालेले नाहींत. ही संस्कृति उत्तर आफ्रिका, दक्षिण युरोप, पश्चिम आशिया व हिंदुस्थान येथें सांपडते त्यावरून तीहि वायव्ये-कडून हिंदुस्थानांत आलेली असण्याचा संभव आहे.

ह्यानंतर दक्षिण हिंदुस्थानांतील उत्खननांत गुळगुळीत केलेलीं दगडाचीं हत्यारें सांपडतात व नंतर लगेच धातूच्या ( तांबें ) वस्तु सांपडूं लागतात. पण त्यांचें प्रमाण अत्यल्प आहे. ह्यापुढची पायरी एक विशिष्ट संस्कृति दाखवते. तिला महा–अश्म ( Megalithic ) संस्कृति असें नांव आहे व तिचें वैशिष्ट्य म्हणजे मेलेल्या माणसांना पुरतांना मोटमोठ्या चपट्या शिला घेऊन त्यांना पेटीप्रमाणें ठेऊन त्यांत माणसाला पुरावयाचें. ह्या शिला उभ्या स्वस्तिकाकार रचतात म्हणजे त्यांची पेटी बनते. वर एक शिला झांकण ठेवतात. खालच्या शिलांतील एका भिंतीला गोल भोंक पाडलेलें असतें. ह्यांतून मृताला श्राद्धादिनीं अन्न वगैरे आंत टाकीत असावेत असें दिसतें. ह्या पेट्यांतून लोखंडाचीं हत्यारें दिसतात. हे लोक दक्षिणेंत येऊन त्यांनीं नवअश्म युगांतील माणसांचा पराभव करून तेथें वसती केली असें दिसतें. ह्या वंशाचे व संस्कृतीचे लोक व त्यांचीं थडगी थेट आन्ध्रभृत्य वा शातवाहन कालापर्यंत होती असें उत्खननावरून दिसतें. शिलापट्टांची

पेटी करावयाची प्रथा जाऊन मातीच्या चौकोनी पेट्या वा मोठमोठ्या डेऱ्यांतून हाडें पुरण्याची प्रथा दक्षिण हिंदुस्थानांत बरींच शतकें टिकली. हैद्राबाद विभागांत कोंडापूर गांवीं अशा पेट्या पुष्कळ सांपडल्या आहेत. तसेंच तामिळ भाषेंतील एका काव्यांत एका मृत राजाला उद्देशून कवीनें म्हटलें आहे कीं " हे राजा तुझ्या मोठेपणाला शोभेल असा तुला पुरण्यासाठीं मोटा रांजण करणारा कुंभार सुद्धां ह्या पृथ्वीतलावर सांपडणार नाहीं." हिंदुस्थानांतील इतर प्रांतांत मात्र ही चाल नष्ट झाली.

शिलापट्टपेटिका करणारे लोक खिस्तपूर्व १००० ते १५०० वर्षे हिंदुस्थानांत आले असावे असा कयास आहे. अशाच तऱ्हेच्या पेट्या सिंधमध्यें कराचीजवळ सांपडल्याची नोंद आहे व त्यावरून हे लोक बलुचिस्तान मार्गे हिंदुस्थानांत येऊन दक्षिणेंत स्थायिक झाले असें दिसतें. हेच द्रविड होत असा डॉ. हायमेनडोर्फ यांचा दावा आहे. (कोंडापूरच्या पेट्यांतून सांपडलेल्या मनुष्यांच्या कवट्यांचें मोजमाप डॉ. धीरेन्द्र मुजुमदार ह्यांनीं केलें आहे. पण संशोधनाचें पूर्ण वृत्त अजून हातीं आलें नाहीं. पण पत्रद्वारें त्यांनीं कळवलेल्या मापावरून हे लोक लांब डोक्याचे होते असें दिसतें).

हे लोक कर्नाटकांत पोचण्यांआधीं महाराष्ट्राच्या भूमीवर होते कीं काय अशी शंका साहजिकच मनांत येते पण नागपूरपासून मुंबईपर्यंतच्या भूमींत अशा तऱ्हेच्या अश्मपेटिका सांपडलेल्या नाहींत. त्यावरून हे लोक कराचीहून जलमार्गे दक्षिण हिंदुस्थानांत आले असावे असा डॉ. हायमेनडोर्फचा कयास आहे. महाराष्ट्रांत बरेंच उत्खनन झाल्याशिवाय ह्या कयासाची सत्यता कळणार नाहीं; पण त्यांत बरेंच तथ्य असण्याचा संभव आहे.

उत्तर हिंदुस्थानची प्रागैतिहासिक संस्कृति कशा तऱ्हेची होती हें थोडक्यांत पाहूं. आज बलुचिस्तान ते माळव्यापर्यंतचा पट्टा बैराण व वृक्षहीन आहे. पण चार पांच हजार वर्षांपूर्वी ह्या प्रदेशांत चांगला पाऊस पडत असे असें दिसतें. ह्या कालखंडांत बलुचिस्तान व सिंधु प्रदेश व पंजाबांत सर्वत्र शेतकी करणाऱ्या लहान लहान वसाहती पसरलेल्या होत्या. त्या वसाहतींची संस्कृति ईजिप्त, इराक, इराण, तुर्कस्थान व दक्षिण राशिया

ह्या प्रान्तांतील तत्कालीन संस्कृतीसारखी होती व पुढें खि. पू. २५०० वर्षांचे सुमारास ह्याच वसाहतींत नागर संस्कृति जन्मास आली. त्या नागर संस्कृतीचें दर्शन आपणास हरप्पा व मोहेंजोदरो ह्या दोन ठिकाणच्या उत्खननांतून झालें. ह्या नागरसंस्कृतीचें एक वैशिष्ट्य म्हणजे सुमारें १००० वर्षें ती अव्याहत, एवढेंच नाहीं तर फार स्थित्यंतरें न होतां टिकली. ह्या संस्कृतींतील बरींच अंगें आजच्या हिंदु संस्कृतींत दिसून येतात असा संशोधकांचा दावा आहे. ह्या संस्कृतींत हिंदूंची समाजरचना, विशेषतः समाजाची जातींत विभागणी दिसून येते असेंही संशोधकांचें म्हणणें आहे, पण त्याला पुरावा नाहीं. मजुरांची वसती निराळी होती, व निरनिराळ्या तऱ्हेच्या कारागीरांची वसती निरनिराळी होती एवढयावरून जातिसंस्था त्या वेळीं होती हें म्हणणें फार धाष्टर्याचें आहे. ही नागर-संस्कृति विशिष्ट धर्माच्या गुरूंनीं घालून दिलेल्या नियमांनीं बांधलेली होती हेंहि विधान प्रत्यक्ष पुराव्याशिवाय ग्राह्य मानतां येत नाहीं. तो पुरावा वस्तुरूप संस्कृतींत बिनतोड मिळत नाहीं. त्या वेळचें वाङ्मय असतें म्हणजे विधानें बरोबर कां चूक तें पडताळतां आलें असतें. विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे ह्या संस्कृतींतील लोक साक्षर होते. त्यांनीं लिहि-लेलीं पुष्कळच अक्षरें आज उपलब्ध आहेत, पण लिपी कोणासहि वाचतां येत नसल्यामुळें संस्कृतीचें कोडें सुटत नाहीं.

प्रत्यक्ष गंगेच्या खोऱ्यांत झालेल्या उत्खननांतून ह्या संस्कृतीचे अवशेष सांपडले नाहींत. दिल्लीच्या पूर्वेस ती फार लांबवर पसरलेली दिसत नाहीं.

ह्या लोकांचे सांगाडे व डोक्याचीं हाडें स्मशानभूमींत पुरलेलीं आढळलीं आहेत. त्यावरून ह्यांतील बहुसंख्य लोक मध्यम उंचीचे, दीर्घ-मस्तकी व मध्यम नाकाचे होते. अशा तऱ्हेचे लोक स्पेनपासून थेट हिंदु-स्थानापर्यंत पसरलेले आहेत. कांहीं लोक ऑस्ट्रेलीय वंशाचे म्हणजे आजच्या वन्य जमातींसारखे वाटतात तर एक दोन पृथुमस्तकी लोकही त्यांत होते. पण पृथुमस्तकीयांचें प्रमाण अत्यल्प होतें.

खिस्ताब्दापूर्वी सुमारें २००० ते १५०० वर्षें ह्या संस्कृतीवर पशुपाल वृत्तीच्या, नागर संस्कृति माहीत नसलेल्या, घोड्याच्या रथांत बसून लढाई

करणाऱ्या लोकांचा घाला पडला व कांहीं थोड्या शतकांत ह्या प्रचंड शहरांचा पार धुव्वा उडाला. ह्याच सुमाराला ईजिप्त, बाबिलोनिया, असिरिया वगैरे ठिकाणींही अशाच तऱ्हेच्या लोकांनीं तेथील नागर संस्कृतीवर धाड घातल्याचे उल्लेख त्या वेळच्या वाङ्मयांत सांपडतात. इ. स. पूर्वी १५०० वर्षे ईजिप्तच्या राजाचा मिट्टानी लोकांच्या राजाशीं झालेला तह अस्तित्वांत आहे. मिट्टानी लोकांचें राज्य युफ्रेटिसच्या उगमाजवळच्या प्रदेशांत होतें. महत्वाची गोष्ट अशी कीं ह्या तहांत मिट्टानीच्या राजानें आपल्या दैवतांचीं नांवें घातलीं आहेत व तीं इन्द्र, मित्र, वरुण व नासत्य अशीं आहेत ! हेच चार देव ऋग्वेदांत मुख्यत्वें सांगितले आहेत व इन्द्राला ' पुरंदर ', नगरें फोडणारा असें संबोधलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं सिंधुप्रदेशांतील नागर संस्कृतीवर धाड घालणारे लोक तेच ऋग्वेदकालीन आर्य होत. आर्योंचा हा हल्ला व विध्वंसन पुढें दोन सहस्रकांनीं गझनीच्या महमुदानें केलेल्या हल्ल्यासारखेंच होतें.

आर्य लोक व संस्कृतोद्भव भाषा महाराष्ट्रांत कशी पोंचली हें पाहण्याआधीं जातां जातां एका घटनेचा उल्लेख करणें जरूर आहे.

वर डॉ. हायमेनडॉर्फचें मत दिलें आहे. त्यांत कांहीं तथ्य असेल तर आर्यांच्या उत्तर भारतांतील आक्रमणाच्याच सुमारास दक्षिणेला शिलापेटिका करणारे लोक आले असें दिसतें. मोहेंजोदारो व हरप्पा येथील लोक तांब्याचीं हत्यारें करीत पण लोखंड त्यांना माहीत नव्हतें. त्या उलट ह्या दक्षिणेकडील लोकांच्या शवपेटिकांत भरपूर लोखंड सांपडतें. ह्या लोकांनीं दक्षिण काबीज केलें त्याच वेळीं आर्य उत्तर काबीज करीत होते व दक्षिणेकडून द्राविडांनीं ( शिलापेटिका करणारे द्राविड असावेत असा डॉक्टरमजकुरांचा दावा आहे ) व उत्तरेकडून आर्यांनीं हांकलून दिल्यामुळें वन्य लोक मध्यभारतांत अरवलीपासून बंगालपर्यंत दोन मोठया संस्कृतींच्या चिमट्यांत सांपडलेले दिसतात असें म्हणतां येईल.

## भारतीय संस्कृतीचे तीन निर्माते

भारतांत संस्कृतोद्भव भाषा बोलणारे लोक, द्राविड भाषा बोलणारे लोक व मुंडारी भाषा बोलणारे लोक आहेत. तिघांचेही प्रदेश निरनिराळे

आहेत. पूर्वीपासून ते तसेच होते कीं आक्रमणामुळें पूर्वीच्या प्रदेशांतून ते दुसरीकडे सरकले आहेत हें जाणण्याची आवश्यकता आहे. पूर्वीच्या ज्या नागर संस्कृतीच्या लोकांचा आर्यांनीं पराभव केला ते वंशशास्त्रदृष्ट्या कोण होते? ते कोणती भाषा बोलत? शिव व देवी हीं त्यांचीं दैवतें काय? तसें असल्यास शिव संप्रदाय व देवी संप्रदाय आज पूर्वेकडेच जास्त प्रमाणांत कां आढळतात? ते द्राविडांशीं संलग्न लोक होते का? आर्य, द्राविड व मुंडारी लोकांचीं सांस्कृतिक वैशिष्ट्यें काय? असे कितीतरी प्रश्न उद्भवतात. ह्या सर्वांचीं उत्तरें दिल्याशिवाय महाराष्ट्रीय भूमीवरील मिश्र संस्कृतीचें स्वरूप व ती घेऊन येणारे मानववंश कोणते ह्याचें उत्तर यथायोग्य देतां येणार नाहीं.

उत्खनन, वाङ्मयपरिशीलन, मनुष्यवंश–संशोधन ह्यांच्या जोडीला भाषेचा समाजशास्त्रीय अभ्यास हें एक संशोधनाचें प्रभावी शास्त्र आहे. उदा. तांदुळाला संस्कृतसम ( लॅटिन, ग्रीक, जर्मन ) भाषांत शब्द नाहीं व द्राविड भाषांतलाही नाहीं. सर्व शब्द मुंडारी भाषेंतील आहेत असा भाषाशास्त्रज्ञांचा तर्क आहे. तसें असेल तर तांदुळाची लागवड ह्या पूर्वे-कडील लोकांनीं भारतांत आणली असें होईल. उत्तरेकडील आर्यांचा युरोपांत, इराणांत, हिंदुस्थानांत प्रसार झाला तो स्थलमार्गें झाला. घोडा ह्या प्राण्याला शब्द ईजिप्ती, असुर व द्राविड भाषेंतला मूळ नव्हे पण सर्व आर्यभाषेंतून मात्र आढळतो. तसाच तो मुंडारी भाषेंत व मोंगोली भाषेंतही आढळतो. उत्तरेकडे आर्यांच्या समाजांत रथकाराला मानाचें स्थान असे. तर मग नौका, समुद्र व नौकानयन ह्याबद्दलचे शब्द निरनिराळ्या भाषेंत काय आहेत हें पहाणें फार महत्त्वाचें आहे. उत्तरेकडील भारतीय आर्यांच्या इतिहासांत नौका नयनाचें महत्त्व जवळ जवळ नाहींच. ह्याउलट द्राविडांचा प्रदेश बंदरांबद्दल व नौकानयनाबद्दल प्रसिद्ध आहे. त्यांच्या प्राचीनतम वाङ्मयांत बंदरांचे उल्लेख आहेत व हिंदुस्थानच्या बाहेर द्राविडांनी वसाहत केल्याचा इतिहास आहे. आर्य, द्राविड, मुंडारी भाषांतील शब्दसंपत्तीचा अभ्यास केला तर ह्या कोड्यावर थोडा प्रकाश पडण्याचा संभव आहे.

सध्यां माहिती असलेल्या साधनांनीं महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासा-वर काय प्रकाश पडतो तें पाहूं.

शेतकीवर आधारलेली नागर संस्कृति स्थिर व अचल असे व तिचा भटक्या टोळ्यांपुढें टिकाव लागत नसे असें प्राचीन इतिहासांत वारंवार आढळतें. पण जेते जरी लढाई जिंकतात तरी जितांची संस्कृति उचलतात, स्वतः नागर बनतात व मग त्यांची इतर भटक्या टोळ्यांचें भक्ष्य व्हावयाची पाळी येते.

ईजिप्त, बाबिलोन व पश्चिम आशियाचीं इतर राष्ट्रें जरी भटक्या टोळ्यांनीं जिंकलीं तरी त्यांची संस्कृति प्राचीन काळीं तरी अजिंक्य राहिली. त्यांची लिपी व रीतिरिवाज जेत्यांनीं उचलले व थोड्याच शतकांत तद्देशीय लोकांनीं जेत्यांना (इजिप्तमधें ह्यायक्सॉस व बॅबिलोनियांत कसाईट ) राज्या-वरून हाकलून दिलें. पण हिंदुस्थानांत प्राचीन सिंधु संस्कृतीचा पार परा-जय झाला, त्यांची लिपी सुद्धां लोपली व जेत्यांनीं कित्येक शतकें निरक्षर राहून मग पश्चिमेकडच्या लिपीवरून आपली ब्राह्मी लिपी बनवली.

आर्यांनीं हळू हळू सर्व गंगाखोरें व्यापिलें, पण मौजेची गोष्ट अशी कीं, ते गंगेच्या उत्तर तीरानें पुढें सरकले. गंगेच्या दक्षिणेकडच्या वसाहतींना ( उदा. मगध ) आर्य-वाङ्मयांत मानाचें स्थान नाहीं. पश्चिमेकडच्या कुरुपांचालांचा देश आर्यांच्या प्रमुख वसाहतींपैकीं होता पण भारतीय युद्धानंतर लौकरच तो आर्यांना सोडावा लागला. शक यवनांनीं तो देश व्यापला व कुरुवंशाला आपली राजधानी हस्तिनपुर सोडून दक्षिणेस व पूर्वेस कौशाम्बी येथें हलवावी लागली आणि पूर्वेकडील प्राचीन अयोध्या व मिथिला ह्यांचें महत्व जाऊन मगध प्रबळ बनलें. भारतीय युद्धाचे काळींही मगधाचा जरासंध त्यावेळच्या आर्यराजांचा सम्राट होता, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे व त्यानें काल-यवनांचे मदतीनें यादवांना मथुरा-प्रदेशांतून थेट द्वारकेला हांकलून दिलें.

महाभारतकालीन परिस्थिति-मगधांचें वर्चस्व व यवनांचें वायव्य प्रदेशांत आगमन ही पुढील कालाची सूचनाच म्हटली पाहिजे. कारण ह्यापुढील काळांत भारताचें केंद्र मगध बनलें व वायव्येकडून यवन, हूण व शका-

दींच्या टोळ्या भारतांत येऊन स्थायिक होऊं लागल्या. यमुनेच्या पश्चिमेकडील प्रदेश त्यांच्या ताब्यांत गेला. उत्तरेकडून जसजशा नव्या टोळ्या येत तसतशा जुन्या खालीं सरकत व ह्याप्रमाणें सिंध, काठेवाड, गुजरात, महाराष्ट्र व कर्नाटकांत कधींतरी पृथुमस्तकीय लोक शिरले. ह्या सर्व लोकांचें आर्यीकरण झपाट्यानें होत होतें. ते स्वतःस ' महाभागवत ' म्हणवण्यांत, यज्ञयाग करण्यांत, बुद्धभिक्षूंशीं वाद करण्यांत धन्य मानीत. ते संस्कृतीनें भाषेनें व धर्मानें ( हिंदु, बौद्ध वा जैन ) भारतीय बनत. ह्या राजांचीं नांवें पाहिल्यास मिलिंद ग्रीक होता तर कनिष्क कुशान म्हणजे मोंगोल-वंशीय होता. म्हणजे ह्या टोळ्या वंशानें व संस्कृतीनें मिश्र होत्या.

वंशानें मराठी लोक मिश्र युरोपीय वंशाचे असून, मूळ दीर्घमस्तक लोकांच्या वसतींत मध्यम रुंद डोक्याचे कोणी लोक येऊन हें मिश्रण झालेलें आहे. मध्यम रुंद डोक्याचे लोक युरोपीय वंशाचेच असावे असें दिसतें. पण ते जर मध्य आशियाच्या पठारावरचे लोक असले तर त्यांत मोंगोल मिश्रण असण्याचा संभव आहे. मोंगोल मिश्रण युरोपीय जातींत किती बेमालूम होतें ह्याचें उदाहरण म्हणजे हंगेरींतील माग्यार लोक. रुंद तोंड, रुंद डोकें व रक्ताच्या वर्गापैकीं बऱ्याच प्रमाणांत असलेलें ' बी ' जातीचें रक्त ह्या तीन गोष्टी मराठी जातींतहि दिसून येतात. त्यावरून मोंगोल मिश्रणाची शंका येते. पण ह्या तीनहि गोष्टी मोंगोल मिश्रणाशिवायहि कांहीं मानववंशांत आहेत. त्यावरून एवढेंच म्हणतां येईल कीं वंशाचा प्रश्न सध्यां मोंगोल मिश्रणापुरता अनिर्णितच ठेवावा लागेल.

मराठी कुटुंबपद्धति उत्तरीय व दाक्षिणात्य कुटुंबपद्धति ह्या दोहोंच्या मिश्रणानें बनलेली आहे. पण त्यांतही उत्तरीय पद्धतीचें वर्चस्व दिसून येतें. मामाच्या मुलीशीं लग्न करण्याची पद्धत जेते व जितांचे संबंध कसे दाखवते हें मागें सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें पितृपरंपरा पण उत्तरेकडच्या कुटुंबपद्धतीचीच निदर्शक आहे.

पश्चिमेकडचे शक व महाराष्ट्रांतील शातवाहन येण्याचे आधींच महाराष्ट्राच्या भूमींत संस्कृत वा संस्कृतोद्भव भाषा दृढमूल झाली होती व म्हणून बाहेरून आलेल्या राजांनीं द्राविड भाषा न उचलतां महाराष्ट्री (संस्कृतचा

प्राकृत अवतार ) आत्मसात् केली. संस्कृत भाषिकांची वसाहत महाराष्ट्रांत कशी झाली असावी हें थोडक्यांत पाहूं.

महाराष्ट्राच्या निरनिराळ्या विभागांना निरनिराळीं नांवें प्राचीन वाङ्मयांत सांपडतात. अपरान्त, विदर्भ, अश्मक, मूलक, कुन्तल अशीं तीं नांवें आहेत. अपरान्तासच कोंकण व लाट असेंहि म्हणतात. त्यांपैकीं कोंकण सर्व अपरान्ताचें देशी नांव असावें व लाट हें उत्तर कोंकणाला प्राचीन ऐतिहासिक काळांत पडलेलें नांव असावें असें दिसतें.

### अपरान्त

ह्या नांवाशीं निरनिराळ्या पौराणिक घटना व कथा निगडित आहेत. अपरान्त परशुराम कथेशीं बांधलेला आहे. हैहयांचा राजा कार्तवीर्य अर्जुन ह्याचा खून करून परशुराम अपरान्तांत पळाला अशी कथा आहे. सबंध पश्चिम पट्टीला परशुरामाचा प्रदेश समजण्याची चाल आहे. परशु-रामाचें नांव इतक्या निरनिराळ्या प्रदेशांशीं व पर्वतांशीं निगडित आहे कीं त्यांतलें खरें कोणतें हें समजणें कठीण आहे. पण, हैहयांची नगरी महिष्मती नर्मदेवर महेश्वरजवळ होती व तेथून पळून जावयास अपरान्त जवळहि होता व सुरक्षितहि होता. ह्यावरून परशुराम पश्चिम किनाऱ्यावरच आला असण्याचा संभव दिसतो. ह्याचा अर्थ इतकाच कीं अतिप्राचीन काळीं पार्गिटरच्या कालगणनेप्रमाणें अयोध्येला राजा हरिश्चंद्र राज्य करीत होता त्यावेळीं, म्हणजे खि. पू. १६००–१७०० च्या सुमारास अपरान्तांत संस्कृत बोलणाऱ्या आर्यांनीं वसती केली. हरिश्चंद्र विश्वामित्राचा समका-लीन होता व परशुराम हा विश्वामित्राची बहिण कान्यकुब्जची राजकन्या रेणुका हिचा मुलगा व म्हणून त्याच हरिश्चंद्राशीं समकालीन. कोंकणांत दोन भाषा बोलतात व दोघींनाहि कोंकणी भाषा म्हणून म्हणण्याचा प्रवात आहे. त्यांपैकीं रत्नागिरी कोंकणी दमण ते राजापूरपर्यंत बोलली जाते. ही भाषा मराठीची एक प्रादेशिक उपभाषा आहे. दक्षिणेकडील कोंकणी भाषेचे हिच्यावर पुष्कळ संस्कार झाले असले तरी ही भाषा मराठीच होय ह्याबद्दल सर्वांचें एकमत आहे. राजापूरच्या दक्षिणेस गोवा, दक्षिण कारवार, उत्तर कारवार, ते मंगळूरपर्यंत लोक जी कोंकणी भाषा बोलतात

ती उत्तर कोंकणीपेक्षां थोडी निराळी आहे. डॉ. सुमित्र कत्रे ह्यांचे मतें तिला अर्वाचीन भारतीय भाषांत भाषाशास्त्राचे दृष्टीनें स्वतंत्र स्थान आहे. ती गुजराती, राजस्तानी ह्यांच्याप्रमाणें मराठीची एक भाषा-भागिनी आहे. ती संस्कृतोद्भव आहे. कै. डॉ. सुखटणकरांच्या मतें ही कोंकणी भाषा स्वतंत्र नसून मराठीचीच एक उपभाषा आहे. कोंकणीचें मुख्य महत्त्व म्हणजे भारतांतील संस्कृतोद्भव भाषांपैकीं ती सर्वांत दक्षिणेकडची भाषा आहे. मराठीपेक्षां ती गुजरातीला जास्त जवळची आहे, असें डॉ. कत्रे यांचें मत आहे. (डॉ. सुखटणकरांचें व श्री. प्रियोळकरांचें मत ह्याउलट आहे.) ह्या कोंकणीच्या वादांत न शिरतां सध्यां आपण तिला सारस्वत-कोंकणी म्हणूं या. सारस्वत कोंकणी मंगळूरपर्यंतच नव्हे तर तुरळक तुरळक कोचीनपर्यंत आढळते. मंगळूरपर्यंत मात्र तिचा प्रसार अखंडित आहे. मंगळूरला तिचा तुळू ह्या द्राविड भाषेशीं संपर्क येतो. सबंध कोंकणपट्टींत खालील भाषा आढळतात. लाट देशांत ( सुरत जिल्हा ) गुजराती, मराठी कोंकणांत मराठी कोंकणी, मालवण ते मंगळूर सारस्वत कोंकणी, मंगळूर ते कालिकत तुळू व पुढें जवळ जवळ कन्याकुमारीपर्यंत मल्याळी आणि कन्याकुमारीच्या टोकाशीं तामिळ. कानडी भाषा समुद्रपट्टीवर बोललेली दिसत नाहीं. समुद्रपट्टी व त्या शेजारची पर्वतमय जंगलपट्टी ह्यांमध्यें कानडी भाषिकांचा शिरकाव जुना नव्हे, नव्यानेंच झालेला आहे. तुळूभाषा कानडीच्या जवळची पण कानडीइतकी प्रगल्भ नाहीं व त्यामध्यें वाङ्मयहि नाहीं. कानडी भाषेचें केंद्र बदामी, बागलकोट वगैरे दख्खन पठारावरील मुलुखांत असावें असें वाटतें. तुळू सध्यां मंगळूर येथें मुख्यत्वें बोलली जाते. कदाचित् पूर्वी ती दक्षिण म्हैसूर प्रांताचीहि भाषा असेल व कानडीच्या विस्तारामुळें व संपन्नपणामुळें हटली असेल. तुळूंतूनच कानडीचा उगम झाला असें मानलें तर असें दिसतें कीं मूळच्या तुळू भाषिकांचा रुंद डोक्याच्या लोकांशीं उत्तर कर्नाटकांत संगम होऊन एक नवीन जोमदार संस्कृति उत्पन्न झाली. महाराष्ट्रांत ह्या रुंद डोक्याच्या लोकांनीं संस्कृतोद्भव प्राकृतभाषा उचलली, तर कर्नाटकाच्या पठारावर त्याच लोकांनीं कानडी भाषा आपली केली. हे लोक पशुपालन व शेती करणारे होते. सर्व दक्षिण पठारावर ते पसरले व मूळ तुळू भाषेला कानडीचें स्वरूप दिलें गेलें. मूळ

तुळू भाषा जंगल, डोंगर व पश्चिमपट्टी एवढयाच ठिकाणीं बोलभाषा म्हणून जिवन्त राहिली.

हा इतिहास ध्यानांत धरला म्हणजे सारस्वत कोंकणीसारखी संस्कृतोद्भव भाषा दक्षिणेकडे इतक्या खोलवर कशी शिरली तें समजतें. कोणत्याहि प्रगल्भ द्राविड भाषेचा तिला विरोध झाला नाहीं. कै. अनंत कृष्ण अय्यर ह्यांनीं म्हैसूरबद्दल लिहिलेल्या पुस्तकांत खालील विधान केलेलें आहे

"आरे हे मराठा जमातीपैकीं असून धारवाड व बेळगांव जिल्ह्यांतून उत्तर कानरा जिल्ह्यांत गेले असें दिसतें. गेल्या दोन पिढयांच्या मार्गे हे लोक एके ठिकाणीं वसती न करतां जंगलांत हिंडून यंदा एके ठिकाणीं, पुढच्या वर्षी दुसरीकडेच ह्याप्रमाणें शेती करीत. शिमोगा जिल्ह्याच्या पश्चिम विभागांत, सह्याद्रीच्या दाट जंगलांत ह्यांचें वास्तव्य आहे. म्हैसूरच्या राजवटींत त्यांना जंगल पट्टयांत जमिनी देऊन एके ठिकाणीं कायम वसाहत करण्याबद्दल उत्तेजन दिलें जात आहे." ( म्हैसूर ट्राइब्स् अँड कास्ट्स्, पुस्तक २ रें, पा. ७४ ). त्याच पुस्तकांत पान ८६ वर त्यांचें वर्णन आहे, "हे लोक एक किंवा दोन खोल्यांच्या कैंबळांच्या घरांतून रहातात. रहात्या घरांतच गुरें बांधतात. जवळच कोंबडीं असतात. नाचणी व भाताचे कुणगे भिंतीच्या एका बाजूस असतात. ते लोक वर्णानें काळे, मध्यम उंचीचे, मजबूत हाडापेराचे व सशक्त असतात. पण डोक्यानें मंद व हालचालींतही मंदच असतात ! त्यांचीं नांवें चव्हाण, कदम, शिंदे वगैरे दिलीं आहेत."

वरील वर्णन मराठी कुणब्यांचें आहे हें महाराष्ट्रीयांस सांगावयास नकोच. आजही बेळगांव जिल्ह्यांतील खानापूर वगैरे जंगल विभागांतून भातशेती करणारे लोक मराठी बोलणारे आहेत. म्हैसूरच्या पश्चिमपट्टींत मराठ्यांचा शिरकाव व रानटी जमाती म्हणून त्यांचा उल्लेख असें दर्शवतो कीं कानडी भाषा पश्चिम पट्टींत नव्यानें आली. तेथें पूर्वी वन्य जमाती होत्या व त्यांचेवर उत्तरेकडून संस्कृत भाषिकांचें व पूर्वेकडून द्राविडांचें आक्रमण झालें.

अपरान्ताचे उल्लेख ऐतिहासिक कालांत पुष्कळच येतात. त्यांपैकीं

दोनच येथें उल्लेखिले म्हणजे पुरे. कालिदासानें रघुवंशांत रघू राजा अपरान्ताला जाऊन तो देश जिंकून पारसीकांच्या देशाला गेला असें वर्णन केलें आहे. खारवेलाच्या हाथीगुंफा येथील शिलालेखांत शातवाहन राजांना अपरान्ताधिपति असें विशेषण लावलेलें आढळतें. हा उल्लेख अतिशय महत्त्वाचा आहे. शातवाहनांचें राज्य पूर्व किनाऱ्यावरील अमरावतीपासून अपरान्तापर्यंत पसरलेलें होतें. त्यांचे बहुतेक महत्त्वाचे शिलालेख पश्चिमेला सह्याद्रींत सांपडतात. पुराणांत त्यांना आंध्रभृत्य म्हटलेलें आहे व ते मूळ आंध्र होते कीं काय ह्याबद्दल बरेच तर्क आहेत. पण वरील लेखांतील बिरुदानें त्यांचें पश्चिम महाराष्ट्रांतील व मध्य महाराष्ट्रांतील (मध्यमहाराष्ट्र व विदर्भ ओरिसांतील खारवेलाचे दृष्टीनें पश्चिमेलाच येतो) स्थान निश्चित होतें. अपरान्ताची वसाहत संस्कृत भाषिकांनीं जरी प्राचीन काळीं केली व तेथें महाराष्ट्राचे महत्त्वाचे शिलालेख सांपडले तरी मराठी भाषेच्या दृष्टीनें हा प्रदेश मागासलेला राहिला. कोंकणी भाषेंत ग्रंथनिष्पत्ति झाली नाहीं, त्याचें कारण म्हणजे कोंकणांतील वसति उत्तरेकडील घडामोडींचे दृष्टीनें जरा आडमार्गावर पडली. परशुराम पळून कोंकणांत आला ह्याचा अर्थच तो प्रान्त कोनाकोपऱ्यांतला होता असा होतो. कोंकणांतील खाडया, समुद्रापर्यंन्त येऊन टेकलेल्या सह्याद्रीच्या टेकडया, व पावसाळ्यानें दुथडी भरून महावेगानें वहाणाऱ्या नद्या ह्यांमुळें गांवागांवांतील दळणवळण कष्टाचें असे. पावसाळ्यांत तर तें पारच तुटे. खेड गांवांतल्या लहानशा नदीला ‘ जगबुडी ’ असें मोठें नांव ऐकून गंमत वाटते, पण पावसाळ्यांत वरून येणाऱ्या पुरानें ती नदी भरली म्हणजे गांव वाहून जातें कीं काय असें वाटतें व डोंगरांनीं वेढलेलें चार गांवांचें चिमुकलें जग ती खरोखरच बुडवून टाकते.

महाड गांवाचीहि अशीच परिस्थिति आहे. दर वर्षी ह्या गांवांतल्या नद्या पुरानें भरल्या कीं, दिवस दिवस त्याचा इतर जगाशीं संबंध तुटतो. भात-शेती व नारळी-पोफळीच्या वाडया ह्यांमुळें घरेंही एकमेकांपासून बरींच लांब. किनारा खडकाळ असल्यामुळें कालिकतच्या तोडीचें बंदरही नाहीं. ह्यामुळें मोठीं शहरें उदयास आलीं नाहींत. नागर जीवनाच्या अभावामुळें

वाङ्मय लोकांच्या तोंडांतच राहिलें, लिहिलें गेलें नाहीं. महाराष्ट्राच्या वाङ्मयाच्या दृष्टीनें आर्य (संस्कृत बोलणाऱ्या) लोकांची पूर्वेकडील वसाहत जास्त फलदायी ठरली.

केवळ महाराष्ट्राचेच दृष्टीनें नव्हे तर आर्यांच्या दक्षिणेकडील वसाहतीच्या इतिहासाचे दृष्टीनें विदर्भ प्रान्त व विदर्भ हें नांव अति महत्त्वाचें आहे. संस्कृतांतील रम्य कथांच्या नायिका विदर्भांच्या राजकन्या असाव्या असा संकेतच ठरला होता कीं काय न कळे. वैदर्भी लोपामुद्रा, वैदर्भी दमयन्ती, वैदर्भी रुक्मिणी, वैदर्भी इंदुमती (अजराजाची पत्नी) व वैदर्भी मालविका अशा प्राचीन वाङ्मयांत प्रसिद्धीस आलेल्या ह्या स्त्रिया आहेत. ह्या सर्वांच्या (मालविका सोडून) कथांचें एक वैशिष्टय म्हणजे त्यांनीं स्वयंवर पद्धतीनें आपल्या आवडीच्या वराशीं लग्न केलें होतें. स्वयंवराच्या नांवाखालीं पण लावून वीर्यशुल्क म्हणून सर्वांत पराक्रमी माणसाला मुलगी द्यावयाची व राजकीय दृष्टया एक मित्र जोडायचा अशी पद्धत ह्यांच्या पित्यांनीं स्वीकारली नव्हती. खरोखर त्यांनीं आपल्या आवडीनें वर निवडला, पतीबरोबर एकनिष्ठ राहिल्या व पतींनींही त्यांच्यावर अतिशय प्रेम केलें. ह्या सर्व राजकन्यांचें लग्न साधारण जाणतेपणीं झालें. कांहींनीं प्रियकराला निरोप पाठवले, कांहींनीं इतरांना वगळून त्यालाच माळ घातली व "नासौ न काम्या न च वेद सम्यक् द्रष्टुं न सा भिन्नरुचिर्हि लोकः" अशी प्रेमाच्या राज्यांतील स्वातंत्र्याची सनद कविश्रेष्ठांकडून मिळविली. विदर्भांच्या राजकन्यांची ही परंपरा दाक्षिणात्यांच्या परंपरेला सर्वस्वीं अनुरूप अशीच आहे. पार्गिटर्ची कालमापनपद्धति गृहीत धरली तर लोपामुद्रेचा काल इसवी सनापूर्वी १५०० ते १६०० च्या दरम्यान येतो. दमयन्तीचा काळ १४०० ते १५०० च्या मध्यें पडतो. रुक्मिणी भारतीय युद्धाच्या वेळची म्हणजे इ. स. पूर्वी १००० च्या सुमाराची. अजाची इंदुमती इ. स. पूर्व १३७० च्या सुमाराची व मालविका शुंगवंशीय अग्निमित्राशीं (पुष्यमित्राचा मुलगा) लग्न करते, म्हणजे इ. स. पूर्वी सुमारें १८० वर्षे. ह्याशिवाय ज्यांच्या कथा माहीत नाहींत अशा वैदर्भी राजकन्या महाभारतांत आदिपर्वातील पुरुवंशाच्या राजांच्या वंशावळींत आढळतात.

जयत्सेन व आराचीन ह्या पितापुत्रांचीं (?) लग्नें (इ. स. पूर्वी सुमारें १२०० वर्षे) वैदर्भीशीं झाल्याचें नमूद केलेलें आहे. त्याचप्रमाणें अयोध्येच्या इक्ष्वाकु वंशांतही वैदर्भी राजकन्या गेल्याचे उल्लेख आहेत. सगराचें लग्न कोशिनी नांवाच्या विदर्भ राजकन्येशीं झालेलें होतें.

अगस्तीनें पहिल्यानें विंध्य ओलांडून दक्षिणेकडे वसाहत केली अशी कथा आहे. अगस्ति समुद्र प्याला, त्यानें राक्षसांना मारलें, विंध्य ओलांडला व आपला एक मुलगा पुलस्त्याला दत्तक दिला अशा निरनिराळ्या कथा अगस्तीबद्दल आहेत. परशुरामाचें नांव जसें पश्चिम किनाऱ्याशीं निगडित आहे तसें अगस्तीचें नांव पूर्व किनाऱ्याशीं निगडित आहे. दुसऱ्या प्रकरणांत दिलेला नकाशा ध्यानांत घेतला तर गंगेच्या खोऱ्यांतून विदर्भांत येण्याचा मार्ग विशद होतो. कोसल, विदेह व मगध ह्या तीनही देशांतून मध्य हिंदुस्थानांतून येऊन पूर्व विदर्भांत येतां येतें; किंवा गंगेच्या मुखाजवळच्या प्रदेशांतून समुद्र किनाऱ्यावरून छत्तिसगडच्या मैदानांत येतां येतें. अगस्ति किनाऱ्याच्या मार्गें आला असण्याचा संभव आहे. गंगा ओलांडून येतांना मार्गावर विंध्य-वासिनीचें देऊळ आहे. राम ह्याच मार्गें येऊन गोदावरीच्या तीराला आला असावा. आजही ह्या मार्गावर वन्य जमातींची वसती व हिंदुस्थानांतील सर्वांत दाट अरण्यें आहेत. रामाच्या वास्तव्यामुळें म्हणा किंवा कोसलाशीं असलेल्या दळणवळणामुळें म्हणा, मराठी-विदर्भाच्या उत्तरेकडील हिंदी प्रदेशाला दक्षिण कोसल म्हटलें जातें. (कालिदासाच्या वेळेला हें नांव प्रचलित होतें.) अरण्यांत भटकणारा नल ह्याच मार्गें अयोध्येच्या ऋतुपर्ण राजाकडे आश्रयाला गेला व त्याला वैदर्भीच्या स्वयंवराला घेऊन आला. ह्याच मार्गें जरा पूर्वेकडे अशोकानें येऊन कलिंग राजाचा पराभव केला. ह्याच मार्गानें समुद्रगुप्त दिग्विजयाला निघाला व महाकान्ताराच्या व्याघ्रराजाचा त्यानें पराभव केला. सरळ उत्तरेकडून येऊन नर्मदेच्या पूर्वेकडून महानदीच्या खोऱ्यांतून किंवा तेंही पूर्वेकडे टाकून वैनगंगेच्या खोऱ्यांत उतरतां येतें, किंवा पहिल्यानें मगधांतून समुद्र किनाऱ्यानें येऊन मग पश्चिमेकडे विदर्भांत शिरतां येतें. हा मार्ग सांस्कृतिक दृष्ट्या अतिशय महत्वाचा आहे व छोटानागपूरच्या प्रदेशांत

हिंदुस्थानांतले सर्व मानववंश सांपडतात, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. त्याचप्रमाणें दक्षिण बिहार, उत्तर व पश्चिम कलिंग व उत्तर व पूर्व महाराष्ट्र आणि दक्षिण कोसल अशा सीमा जेथें एकत्र होतात अशा ह्या प्रांतांत भाषांचें मिश्रणही अतिशय आहे. संस्कृतोद्भव भाषा, मुंडारी भाषा व द्राविडोद्भव भाषा येथें ऐकू येतात. अभ्यासकाला हा प्रदेश म्हणजे एक देणगीच वाटते.

येथील मुंड लोक आपल्यास नागवंशी म्हणवतात. येथील एक वन्य जात 'असुर' नांवाची आहे. हे असुर प्राचीन काळीं लोखंड काढून, भट्टी लावून त्याचीं घडीव व ओतीव हत्यारें करीत असत, अशी त्यांच्याबद्दल कथा आहे व तसा पुरावाहि सांपडतो. त्याचप्रमाणें दक्षिण बिहारमध्यें मानभूम नांवाचा जो बिभाग आहे, त्याचें जुनें नांव असुरभूम आहे. हा प्रदेश आजहि लोखंडाच्या खाणींबद्दल प्रसिद्ध आहे. लोखंड मिळण्यास फार खोल खणावें लागत नाहीं. केंवझर विभागांत ( उत्तर ओरिसा ) कांहीं दगड तर वरतींच सांपडतात. तेथें पूर्वी असुर व नागांचें प्राबल्य असावें व आर्यांनीं त्यांच्याशीं लढाया करून किंवा तह करून हळुहळू ह्या भूमींत शिरकाव केला. येथील द्राबिड भाषिक दक्षिणेकडून आलेले गोंड आहेत. कंधांची मूळ भाषा द्राविडच आहे. येथें, मध्य ओरिसांत व महाराष्ट्राच्या पूर्व पट्ट्यांत दक्षिणेकडून द्राविड आले. त्याचप्रमाणें ह्याच जंगलांत शबर लोकांचीहि वसती आहे.

द्राविड भाषिक लोक गंगाखोरें व्यापून होते व आर्यांनीं त्यांना दक्षिणेकडे रेटलें असें समजण्याचा प्रघात आहे. पण तो योग्य पुराव्याला धरून आहेसें वाटत नाहीं. वेदांत दस्यु, अनार्य, म्हणून ज्या लोकांचें वर्णन आहे ते उंच नाक असलेले द्राबिड खास नव्हत. संस्कृत वाङ्मयांत निरनिराळ्या संघर्षांचें वर्णन आहे. देवासुरांच्या युद्धांच्या कथा ब्राह्मणांत आहेत. देवदानवांच्या युद्धाच्या कथा पुराणांत आहेत. मानवांचें युद्ध प्रत्यक्ष असुरांशीं झालें नसलें तरी कांहीं राजांनीं इंद्राला असुर युद्धांत सहाय्य केल्याचीं उदाहरणें आहेत. देव आणि असुर भाऊ भाऊ होते अशी कथा आहे. देवासुरांचे गुरू बृहस्पति व शुक्र हेही भाऊ भाऊ होते.

दानवसुद्धां आर्यांपैकींच असावे असें वाटतें. ग्रीक दंतकथांत "दाने" नांवाच्या लोकांचें वर्णन आहे व नुकत्याच तुर्कस्तानांतील टाउरस पर्वताच्या पायथ्याशीं झालेल्या उत्खननांत दनुअ राजा असितबंदस व त्याची राणी इयांचे हिटाइट ह्या संस्कृतसदृश भाषेंत लिहिलेले शिलालेख सांपडलेले आहेत. ( The Illustrated London News. 14 May 1949 ) त्यावरून हीं सर्व युद्धें आर्यांच्या टोळ्यांपैकीं एकमेकांतील व कदाचित् भारताबाहेरचीं असावीं असें वाटतें. कदाचित असुर हे देवांच्या आधीं येऊन भारतांत स्थायिक होऊन येथल्या प्रजेशीं संकर करून राहिले असतील. हरप्पाच्या नागर संस्कृतीचे निर्माते ते असण्याचा संभव आहे. ते असंस्कृत नव्हते हें त्यांच्या सर्व वर्णनावरून आढळतें. कधीं कधीं त्यांचें आर्यांशीं भांडण असे ( उदा० रामरावण युद्ध ). कधीं त्यांचें सख्य असे ( उदा० ययाति-शर्मिष्ठा ). पण महाभारतांत भावाभावांच्या भांडणाची मुख्य गोष्ट आहे. त्यांतच संस्कृति-संगम व संस्कृति-संघर्षाविषयीं आणखी एक रोमहर्षण कथा गुंफलेली आहे. ती म्हणजे क्षत्रिय व नाग ह्यांचें भांडण. महाभारतांत बऱ्याच नाग कुळांचीं नांवें दिलीं आहेत. त्यांपैकीं मुख्य म्हणजे तक्षक, इंद्राचा मित्र, नागराज वासुकी, विष्णूचा दास शेष व कर्कोटक नाग हे होत. कुरुकुलांतील वंशावळींत एका राजाचें लग्न तक्षक-दुहिता ज्वाला हिच्याशीं झाल्याचें व दुसऱ्याचें 'नागा' हिच्याशीं झाल्याचें सांगितलें आहे. तक्षकाचें पांडवांशीं तीन पिढयांचें वैर दिसून येतें. अर्जुनानें तक्षकाचें खांडववन जाळलें, तक्षकानें अर्जुनपौत्र परीक्षिताला मारलें व परीक्षिताचा मुलगा जो जनमेजय त्यानें बापाचा सूड म्हणून असंख्य नागकुलें सर्पसत्रांत नष्ट केलीं. खांडव कथेंत आर्य-नागांचा संघर्ष कसा आला तेंही विशद होतें. आर्य मुख्यतः पशुपाल होते व त्यांचे प्रजाजन नांगराचे सहाय्यानें शेती करीत. नाग अरण्यांत राहून हल्लींच्या हिमालयांतील टोळ्यांप्रमाणें किंवा वन्य लोकांप्रमाणें थोडें अरण्य कापून, जाळून, लहान लहान जमिनीचे तुकडे साफ करून हातानें भाताची लागवड करीत असावे. अर्जुनासारखे क्षत्रिय नवीन राज्य वसवावयाचें म्हणजे नदीकांठचें रान जाळून जागा साफ करून शहर वसवीत व भोंवतालचा भाग शेतीसाठीं देत. अशा तऱ्हेनें ज्या जंगलांतून नाग

रहात तीं कमी होत गेलीं व नाग दक्षिणेकडे व पूर्वेकडे सरकूं लागले. आर्यांच्या तडाख्यांत पहिल्याप्रथम सांपडलेलें नागकुल सर्वांत पश्चिमेकडचें तक्षक, त्यांचा पराभव झाला. पश्चिम विंध्य व सातपुडा प्रदेशांत भिल्ल, गोंड, बैगा, कोळी वगैरे लोक हे ह्या जुन्या नागवंशाचे वंशज तर नव्हेत ना अशी शंका येते. कारण ह्यांतील बरेच लोक आपला नागांशीं संबंध सांगतात. नलाचें सख्य संपादणारा कर्कोटक नाग पूर्वेकडचा. आजही उराव लोकांत 'करकट्टा' म्हणून कुळनांव आढळतें. 'करकट्टा' म्हणजे हत्ती; नाग म्हणजेहि हत्ती व हस्तिनापुराला भारतांत कित्येकदां 'नागपूर' म्हटलेलें आहे. नाग म्हणजे सर्प म्हणून सर्पांचा व नागांचाहि घोटाळा झालेला आढळतो. कांहीं असो, नाग म्हणून लोक इंद्रप्रस्थापासून कलिंगाच्या हद्दीपर्यंत पसरलेले होते. त्यांच्या मुलींचीं क्षत्रियांशीं लग्नें होत (अर्जुन-उलूपी); त्यांचें इंद्राशीं सख्य होतें व क्षत्रियांशीं पुष्कळदां युद्धहि होत असे, एवढें ह्या सर्व कथांवरून सिद्ध होतें.

खांडवदाह पर्वांत मयासुराची कथा आली आहे. मयाला अर्जुनानें कृष्णाच्या सांगण्यावरून वाचवलें व ह्या उपकाराची फेड म्हणून त्यानें त्यांना एक अप्रतिम सभा बांधून दिली. ह्या सभेला लागणारें बरेंचसें लखलखीत रत्नादि सामान त्यानें कैलास व मैनाक पर्वताच्या उत्तरेला असणाऱ्या देशांतून आणलें असें वर्णन आहे. ह्या सभेचा मुख्य गुण म्हणजे ती प्रकाशमान व चकाकणारी होती. ह्या सभेंत मयानें एक सरोवर केलें व त्यांत वैडूर्य मण्यांचीं पानें असलेलीं, रत्नाचे देठ असलेलीं अप्रतिम कमळें केलीं. नाना तऱ्हेचे मासे व कासवें त्यांत केलीं. त्यांतील पाण्याचे बिंदु प्रत्यक्ष मोत्याचे होते. कांहीं राजे अगदीं जवळ येऊनहि ती पुष्करिणी केवळ रत्नांची आहे हें न जाणून (पाय घसरून ?) पडत असत. (सभापर्व, अध्याय ३, श्लोक २७-३०. संशोधित आवृत्ति-महाभारत). स्फटिक तेथें पाण्याचा भास होऊन माणूस वस्त्रें सांवरून चाले व खरोखर पाणी तेथें अनवधानतेनें आंत पडून ओला होई. अशाच प्रकारें फसून दुर्योधन पाण्यांत पडला. दार आहे समजून जावें तों डोक्याला लागावें, नाहीं म्हणावें तो आरपार आंत जावें, अशी त्याची

स्थिति झाली ( सभा. अध्याय ४३ ). म्हणून द्रौपदी व भीम हंसलीं व त्या अपमानानें जळत दुर्योधन हस्तिनापुराला आला. टैग्रीस व युफ्रेतिसच्या दुआबांतील निरनिराळ्या गांवीं झालेल्या उत्खननावरून असें दिसून येतें कीं मातीच्या विटांवर निरनिराळीं रसायनें वापरून त्यांना वरणीची चकाकी व गुळगुळीतपणा आणण्याची कला असुर लोक सुमेरी व बाबिलोनी लोकांपासून शिकले. विटा हिरवट, निळ्या, लाल, पिवळ्या व पांढऱ्या रंगाच्या असत. ही कला इ. स. पूर्वी दोन हजार वर्षांपासून माहीत होती व थेट इ. स. पूर्व ५०० पर्यंत असल्या सर्व विटा राजवाड्यांतून दिसून येतात. निनव्हे येथील राजवाड्याच्या भिंतीला तसल्या हिरवट निळसर रंगाच्या विटा लावलेल्या होत्या. तशी फरशी केली तर पाण्याचा भास व्हावा असा त्या विटांचा रंग आहे हें लेखिकेनें बर्लिनच्या म्युझियममध्यें प्रत्यक्ष त्याच विटांनीं उभारलेल्या प्रतिकृतीवरून पाहिलें आहे. तशाच तऱ्हेच्या विटा बाबिलोन शहरांत नन्नार देवीच्या देवळांत इ. स. २००० पूर्वी लावलेल्या होत्या. मय हा असुर होता व त्यानें सभेला लागणारी विशेष द्रव्यें बाहेरून आणलीं होतीं हें लक्षांत ठेवलें म्हणजे असुर कारागीर भारतांत आर्यांच्या पूर्वीच येऊन पोंचले होते असें वाटतें. असुर हें नांव, त्यांच्या सुंदर नगरांचीं वर्णनें, वगैरे वाचून असें वाटतें कीं, पूर्वी एकादी 'आसुर' संस्कृति गंगा खोऱ्यांत किंवा नर्मदा खोऱ्यांत असावी. कांचेचें पाणी चढवलेल्या विटा नष्ट होणें कठीण आहे व त्या उत्खननांत सांपडल्या पाहिजेत. पश्चिम आशियांत त्या सर्वत्र सांपडलेल्या आहेत पण हिंदुस्थानांत आढळलेल्या नाहींत. नर्मदेच्या तीरीं उत्खनन झालें तर त्या सांपडतीलही. आज तरी नांवापलीकडे असुरांबद्दल कांहीं माहिती नाहीं.

एवढें मात्र खरें कीं, जुन्या वाङ्मयांत असुरांचा उल्लेख येतो, पण द्रविड ऊर्फ द्रमिळ—दम्मिल वा तामिळ लोकांचा येत नाहीं. द्राविड आर्यांच्या मार्गानेंच भारतांत आले, त्यांनीं गंगाखोऱ्यांत वस्ती केली व आर्यांनीं त्यांना रेटून नर्मदापार, नव्हे थेट गोदाकृष्णापार पिटाळलें ह्या कल्पनेला योग्य पुरावा अजून मिळालेला नाहीं. भारताच्या आग्नेय कोपऱ्यांतील तामिळनाड हा विभाग पराभूत द्राविडांचा शेवटचा आसरा नसून

त्यांचें भारतांतील मूलस्थान असण्याचा संभव आहे. तेथून द्रविडांनीं उत्तरेकडे व पश्चिमेकडे पाय पसरले. त्याच सुमारास आर्य वायव्येकडून दक्षिणेकडे व पूर्वेकडे सरकत होते. दोघांनींहि परस्परांना न रेटतां मधल्या नागमुंडखोंडादि लोकांना रेटलें व दोन बड्या जमातींच्या कात्रींत सांपडलेले हे वन्य लोक आज मध्य व दक्षिण भारतांतील डोंगराळ पट्टीचा आसरा करून राहिलेले आढळतात.

द्रविडांचें प्राचीनतम वाङ्मय 'संगम' वाङ्मय ह्या नांवें प्रसिद्ध आहे. त्यांत सीलपडिक्कारम व मणिमेकलई ह्या नांवाच्या दोन कथा विशेष प्रसिद्ध आहेत, त्यांतील वर्णनांवरून त्यावेळच्या द्रविड राजांच्या वैभवाची कल्पना येते. विशेष म्हणजे कावेरीच्या मुखाशीं असलेल्या कावेरीपट्टनम् (हल्लींचें नेगापट्टण) ह्या समृद्ध बंदराचें वर्णन त्यांत आहे. द्रविड पहिल्यापासून उत्तम दर्यावर्दी असावेत असें दिसतें व त्यांनींच भारतीय संस्कृति पूर्वेकडे पसरवली. आज तरी द्रविडांचा जो प्राचीन इतिहास उपलब्ध आहे तो पराजितांचा नसून जेत्यांचा आहे.

महाराष्ट्राच्या वसाहतीबद्दल लिहितांना हें सर्व लिहिण्याचें कारण इतकेंच कीं विदर्भ ही फार प्राचीन काळापासून आर्यांची वसाहत होती व तेथें त्यांचा संबंध द्राविडांशीं आला नसून कोणातरी इतर वन्य जमातींशीं आला. विदर्भाचें दळणवळण उत्तरेशीं सतत राहिलें व खिस्तानंतर पांचव्या–सहाव्या शतकांत वाकाटकांच्या उज्ज्वल कारकीर्दीत परत एकदां ह्या उत्तरेकडील संबंधाला उजाळा मिळाला. वाकाटकांचें राज्य थेट मध्यभारतापर्यन्त पसरलें होतें व वैदर्भी राजकन्या उत्तरेकडच्या घराण्यांत न जातां मगधाच्या सम्राटांची कन्या वाकाटकांकडे आली होती. तिच्याबरोबर आलेल्या कालिदासानें विदर्भाचें केलेलें वर्णन एका ओळींत असलें तरी इतरांना मत्सर वाटावा असें आहे. विदर्भाला तो 'सौराज्यरम्य' म्हणतो. काव्यांत वैदर्भी रीतीचें स्थानहि अद्वितीय आहे. ह्या रीतीचें काव्य म्हणून कविश्रेष्ठांच्या काव्याकडे बोट दाखवतात. सर्व भारताची संस्कृति ज्या काव्यामध्यें साकारली, तें वैदर्भी रीतींत होतें, म्हणजे विदर्भाचें संस्कृत परंपरेमधील स्थान लक्षांत येतें. जसा अपरान्त, त्याचप्रमाणें

विदर्भही अतिप्राचीन आर्य (संस्कृत बोलणाऱ्यांची) वसाहत होती. दोन्हीहि वसाहती वन्यांच्या प्रदेशांत झाल्या, सुसंस्कृत द्राविडांशीं लढा करून नव्हे.

पहिल्या प्रख्यात वैदर्भीचें नांव लोपामुद्रा आहे. हें नांव आर्य नव्हे. तें लोपा मुंडा ह्याचें तर रूप नव्हे ना? मुंड लोकांची राजकन्या लोपा असा त्याचा अर्थ होईल. मुंडांचा नागांशीं संबंध होता त्याबद्दल बौद्ध वाङ्मयांत पुरावा सांपडतो. कोसलाचा राजा पसेनदी ह्याचे मनांत गौतमबुद्धाच्या घराण्यांत लग्न करून बुद्धाचें नातेवाईक व्हावें असें होतें. त्यानें त्यावेळच्या शाक्य प्रमुखाला (महानाम शाक्य) तसा निरोप पाठवला. सर्व लिच्छवी घराण्यांची सभा होऊन ठरलें कीं, आपली राजकन्या पसेनदीला देणें शक्य नाहीं. पण तसें कळवल्यास बलाढ्य कोसलाधिपति आपला निःपात करील म्हणून महानाम शाक्याची दासीपुत्री "वासभरवात्तिया" हिचें राजकन्या म्हणून त्याच्याशीं लग्न लावावें. ही "वासभरवत्तिया" 'नागामुण्डा' नांवाच्या दासीची महानामापासून झालेली मुलगी होती. पुढें ह्या संबंधापासून झालेल्या विड्डभ नांवाच्या कुमारानें सर्व शाक्य कुळाचा नाश केला. ही कथा पाली वाङ्मयांत सांगितलेली आहे. (Dictionary of Pali proper names, Vol II, pp 514-15). इ. स. पूर्वी ५००–६०० वर्षांची ती कथा आहे, म्हणजे त्यावेळीं नाग आणि मुण्ड एक असावे असें दिसतें. 'लोपा' ह्या नांवाचें सादृश्य अर्जुनाची बायको नागकन्या 'उलूपी' हिच्या नांवाशीं आहे. ह्या कथाभागावरूनहि असें दिसतें कीं, विदर्भ ही आर्य आणि नाग किंवा मुंड लोकांच्या संस्कृति-संगमाची भूमि होती. उत्तरेकडे द्राविडांचा व आर्यांचा संघर्ष झाला नाहीं. पूर्णा, वर्धा व वैनगंगा ह्यांमधील आर्यांची वसाहत द्राविडांना दक्षिणेकडे पिटाळून झालेली नसून द्राविडपूर्व अनार्यांशीं संघर्ष करून झालेली आहे. द्राविड भाषिक गोंड व कोलाम हे मध्ययुगांत दक्षिणेकडून विदर्भात घुसलेले लोक आहेत. अतिप्राचीन कालापासून संस्कृत व संस्कृतोद्भव भाषा आणि दियेरवटूंची चाल ह्या प्रदेशांत बोलली व आचरली जात होती असें दिसतें. अपरान्त व विदर्भ असे

महाराष्ट्राचे दोन पांख पहिल्यापासून संस्कृतोद्भव भाषा बोलणाऱ्यांचे प्रदेश म्हणून नक्की झाले.

खानदेश

उरलेल्या तीन प्रदेशांपैकीं खानदेश खरोखर पूर्णा खोऱ्याचा पश्चिमेकडील विस्तार आहे. त्यालाच 'मूलक' किंवा ऋषिक* असें नांव आढळतें. ह्या प्रदेशांतहि आर्यांचें वर्चस्व आदिवासी लोकांशीं संघर्ष करून झालें. एके काळीं ह्या प्रदेशांत 'अभीर' लोकांनीं राज्य केलें. मध्यंतरीं ज्याप्रमाणें विदर्भावर गोंडांनीं राज्य केलें त्याप्रमाणें खानदेशावर राजपुतान्यांतून दक्षिणेकडे सरकणाऱ्या भिल्लांनीं आक्रमण केलें. गोंडांप्रमाणें भिल्लांना मोठीं राज्यें स्थापितां आलीं नाहींत. येथील भाषेंत गुजराती व मराठी भाषेचें बरेंच मिश्रण आहे. लेवा, गुजर वगैरे उत्तरेकडचे इतर लोकहि भिल्लांप्रमाणेंच उत्तरेकडून येऊन येथें स्थायिक झाले आहेत. पण आतां त्यांचें संपूर्ण मराठीकरण झालें हें आपण मागें पाहिलेंच आहे. खानदेशांत जुने अवशेष पुष्कळ आहेत, व तेथें जुन्या मध्ययुगीन मूर्तीहि सांपडल्या आहेत. उत्खनन करून पद्धतशीर पहाणी केल्यास संस्कृतीच्या राजमार्गावर असलेल्या ह्या प्रदेशाच्या इतिहासावर पुष्कळ प्रकाश पडण्याचा संभव आहे.

मध्य गोदावरी अर्वाचीन महाराष्ट्राचें केन्द्र समजलें जातें. महाराष्ट्राचे राजे शातवाहन ह्यांनीं प्रतिष्ठान उर्फ पैठण येथें राज्य केलें, प्राकृत भाषेला उत्तेजन दिलें, व पर्यायानें मराठीच्या जन्माला मदत केली. महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व संत कवींचा जन्म मध्य महाराष्ट्रांत झाला व हल्लींच्या मराठीचें स्वरूप त्यांनीं निश्चित केलें. ह्या प्रदेशाला जुनें नांव 'अश्मक' असें आहे. संस्कृत वाङ्मयांत 'अश्मक' नांव बरेंच उशीरां येतें.

* ऋषिक नांवाचे लोक हिमालय प्रदेशांत आहेत. कृष्णाला ऋषीकेश म्हणजे ऋषिक लोकांचा स्वामी म्हटलें आहे. ह्यावरून असें वाटतें कीं गोपाल किंवा अभीरांनीं खानदेशाची वसाहत केली तेव्हां त्याला ऋषिक नांव मिळालें.

दंडीच्या दशकुमार चरितांत ' अश्मक ' असें देशाचें नांव येतें व तें गोदाकांठाबद्दल आहे हें निर्विवाद. महाभारतांत आदिपर्वात ' प्राचीन्-वान ' राजानें ' अश्मकी ' शीं लग्न केलें असें लिहिलें आहे. ' प्राचीन्-वान ' परशुरामाच्याहि आधीं वीस पिढ्या म्हणजे २००।२५० वर्षा-पूर्वीचा. म्हणजे ' अश्मक ' देश आर्य आले तेव्हांपासून माहीत होता कीं काय असें वाटतें. पण तसें नसून आदिपर्वातील अश्मक निराळाच देश होता असें दिसतें. बुद्ध वाङ्मयांत ' अस्सक ' देश सांपडतो. तो यमुनेच्या उत्तरेस दक्षिण पंजाबमध्यें होता असें दिसतें. त्याचप्रमाणें गोदाकांठच्या प्रदेशालाही अस्सक नांव व तेथील राजधानी पाईठाण ( प्रतिष्ठान ) अशीं दिलीं आहेत. उत्तरेच्या लोकांनीं गोदेकांठीं वसाहत करून नव्या देशाला ' अस्सक ' असें नांव दिलें असें दिसतें. आदिपर्वातील ' अश्मक ' हें उत्तरेकडचें ' अश्मक ' असावें. ह्यानंतर मित्रसह कल्माषपादाचा मुलगा आणि नातू ह्यांचीं नांवें अश्मक आणि मूलक अशीं दिलेलीं आढळतात. मित्रसह नळापेक्षां एक पिढी अलीकडचा. विदर्भ त्यावेळीं चांगलाच माहीत होता व त्याच सुमारास अश्मक व मूलक देश आर्यांनीं व्यापिले असण्याचा संभव दिसतो. भौगोलिक दृष्टया अश्मक म्हणजे दक्षिण-विदर्भ व मूलक म्हणजे विदर्भाचा पश्चिमेकडचा बिस्तार म्हटलें तरी वावगें नाहीं. अश्मक आणि मूलक ह्या दोन वसाहती विदर्भातूनच झाल्या असण्याचा संभव दिसतो. अश्मकाचे सर्वांत प्रसिद्ध राजे म्हणजे प्रतिष्ठानचे शातवाहन. त्यांचे आधीं प्रतिष्ठानला नरसिंह नांवाचा राजा होता असा उल्लेख सोमस्वामीच्या कथासरित्सागरांत सांपडतो. त्या कथेबद्दल कै. श्री. व्यं. केतकरांनीं प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासांत लिहिलें आहे. श्री. रेड्डी ह्यांनीं कांहीं वर्षांपूर्वी Eastern Anthropologist ह्या मासिकांत चेंचू लोकांच्या कथा व लोकगीतें याबद्दल लिहिलें आहे.* त्यांत असा उल्लेख आहे कीं, चेंचू लोकांच्या राजाला मोठें तप करून चेंचिथा नांवाची

* " Chencheetha and her divine bride-groom " P. C. Reddy, Eastern Anthropologist, June 1948, Vol. I, No. 4. पृ. १०-२०

मुलगी झाली व तिचें लग्न नरसिंहाशीं झालें. हा नरसिंह रानावनांत भटकत होता. त्याला चेंचू लोकांनीं बांधून मारण्याचा बेत केला होता, पण एका ब्राह्मणानें त्याला वांचवलें. पुढें त्यानें युक्तीनें चेंचूंत दुफळी निर्माण केली. निरनिराळ्या टोळ्यांना निरनिराळे प्रदेश राहण्यासाठीं दिले व एकाला सर्परूप देऊन लोक तुझी पूजा करतील असें सांगितलें. ही कथा बरीच लांब असून त्यांत नरसिंह हा श्रीकृष्णच असें शेवटीं सांगितलें आहे. त्याचप्रमाणें चेंचू लोकांचा नागांशीं संबंध जोडला आहे. नरसिंहाचीं देवळें दक्षिणेंत आहेत. नरसिंह, नरसय्या वगैरे नांवेंही पुष्कळ आढळतात. शातवाहनांपूर्वी नरसिंह म्हणून कोणी राजा होऊन गेला असावा व त्याचा अम्मल तेलंगण, कर्नाटक व महाराष्ट्रावर असावा असें दिसतें. आपल्याकडे नाग–नरसोबा ही जोडी ऐकूं येते. नागाचा नरसोबाशीं काय संबंध तें समजत नाहीं. जुन्या लेण्यांतून राम व कृष्ण ह्यांच्या मूर्ति दिसत नाहींत पण वराह व नरसिंह हीं रूपें मात्र दिसतात. नरसिंहपूजा जुनी असून पुढें दशावतारांत कृष्णपूजेचेहि आधीं त्याला स्थान मिळालें असें दिसतें. जुन्या नरसिंहाचा पराभव करून शातवाहनांनीं राज्य स्थापिलें कीं काय अशी शंका येते. शातवाहन नांवाचा अर्थ काय याबद्दल अति तर्कवितर्क आहे. शात ह्या शब्दाचींच सात, साद, साल, शाल व हाल अशीं रूपें आहेत. ( लीलावई काव्यांत 'गोदा' नदीला 'गोला' नदी म्हटलें आहे. ) साद या शब्दाचा अर्थ मुंडारी भाषेंत घोडा असा आहे. सादोम म्हणजे घोड्याचा वंशज. दुसऱ्याही एका शब्दांत शालि म्हणजे घोडा हा अर्थ सांपडतो. तो शब्द घोड्याबद्दल दोन स्वतंत्र शब्द मिळून झाला आहे. असे शब्द संस्कृति संगमाचे द्योतक असतात. उदा० करेणु = हत्ती हा संस्कृत शब्द संस्कृत करि व द्राविड आने (दोन्हीचा अर्थ हत्ती) ह्या दोन शब्दांच्या जुळणीनें झाला आहे. शालिहोत्र म्हणजे घोडा. शालिहोत्री म्हणजे घोड्याचें वैद्यक जाणणारा असा शब्द संस्कृतांत सांपडतो. शाल किंवा शालि म्हणजे घोडा (मुंडारी) व होत्र म्हणजेहि घोडाच. ह्या शब्दापासूनच सध्याचा घोटक–घोडा हा शब्द आला आहे. ( होत्र शब्द मूळ कोणत्या भाषेंतील तें नक्की समजत नाहीं. ) शातवाहन कथेंत राजानें मातीच्या घोड्यांचे खरे घोडे करून लढाई जिंकली असें आहे.

शालिवाहन शब्दाचा अर्थ घोडा ज्याचें वाहन आहे असाहि करतां येईल. घोड्याचा वंशज हा अर्थहि आश्चर्य वाटण्यासारखा नाहीं. कारण शालिवाहना-सारखाच पराक्रमी जो विक्रम तो गर्दभिल वंशाचा होता व तो पहिल्यानें गाढव व मग राजपुत्र झाला अशी त्याची कथा आहे. श्वेताश्वतर उपनिषद ज्या ऋषीच्या नांवावर आहे, त्या श्वेताश्वतर शब्दाचा अर्थ 'पांढरें खेचर' असा आहे. अश्व शब्द ज्यांत आहे अशीं जुनीं कितीतरी नांवें महाभारत व पुराणांत आहेत. आपण सध्यां तीं सर्व बहुव्रीहि समास म्हणून सोडवतों. ( चित्राश्व, हर्यश्व, अश्वपति, युवनाश्व वगैरे ). कदाचित् तीं कर्मधारयही असतील. पुरुषव्याघ्र, नरर्षभ जसे असतात, तसे पुरुषअश्व सुद्धां असण्यांत कांहींच नवल नाहीं. ज्यांचें सामर्थ्य अश्वावर अवलंबून होतें अशा पशु-जीवि भटक्या आर्यांना अश्वाचें कौतुक वाटलें तर कांहींच नवल नाहीं. शातवाहन हे बाहेरून आलेले, मध्य आशियांतील मिश्र आर्य–मोंगोल वंशाचे असण्याचा संभव आहे. पण त्यांचें नांव मुंडारी भाषेंतलें कां असावें तें कळत नाहीं. ज्या नागमुंड लोकांचा पराभव करून त्यांनीं राज्य स्थापिलें त्यांनीं हें नांव त्यांना दिलें कीं, ते आले ते हें नांव घेऊनच आले, कळत नाहीं. मुंडारी भाषेंतील पुष्कळ शब्द माग्यार ( हंगेरींतील लोक ) भाषेंत सांपडतात असें त्या शब्दकोशावरून दिसतें. तेव्हां आर्य व मोंगोल दोघांनाहि तो शब्द माहित असण्याचा संभव आहे व मुंडारी भाषेंत मोंगोल शब्द आहेत. शातवाहनांना संस्कृत माहीत नव्हतें, त्यांनीं प्राकृताला आश्रय दिला, महारठी नांवाच्या मांडलिक राजांशीं लग्नसंबंध जोडला असें दंतकथा व शिलालेखांवरून दिसतें. अश्मक देशाचा मात्र दाक्षिणात्य संस्कृतीशीं घनिष्ठ संबंध आहे. पूर्वेला व दक्षिणेला तेलगू भाषिकांचा प्रदेश आहे व त्यांना जिंकून व दक्षिणेला रेटून शातवाहनांनीं प्रतिष्ठानला राज्य स्थापिलें असावें असें कथेवरून दिसतें. जो सांस्कृतिक संघर्ष अश्मक विभागांत झाला तसाच महाराष्ट्राचा पांचवा विभाग जें कृष्णाखोरें ऊर्फ 'कुंतल' देश तेथें झाला. भीमेचें व कृष्णेचें खोरें मराठ्यांनीं व कन्नडिगांनीं व्यापलेलें आहे व तेथेंहि भाषेच्या सीमा निश्चित नाहींत. दक्षिणेला कर्नाटकाच्या थेट गाभ्यापर्यंत मराठी शिलालेख ( श्री चाउंडराये करवियले ) सांपडतो हें कसें ह्याचें फार आश्चर्य वाटतें.

पण खिस्ती शकानंतरचा महाराष्ट्र, कर्नाटक व आन्ध्र ह्या प्रदेशांचा राजकीय व धार्मिक इतिहास पाहिला तर ह्या घटनेचा अर्थ कळतो.

## महाराष्ट्रांतील राजांचें उत्तरेकडील व दक्षिणेकडील राजकारण

शातवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट व यादव ह्या घराण्यांनीं महाराष्ट्रावर एकामागून एक राज्य केलें. महाराष्ट्रांतील बुद्ध लेणीं शातवाहनांच्या व वाकाटक आणि चालुक्यांच्या कारकीर्दींतील आहेत. त्यांतील सर्व लेख प्राकृतांतील आहेत. लीलावती ह्या अपभ्रंश भाषेंत लिहिलेल्या काव्यांत सुप्रसिध्द बौद्ध पंडित नागार्जुन हालाचा मित्र व हितोपदेशक होता असें म्हटलें आहे. शातवाहनांच्या राजकारणाचे प्रमुख धागे उत्तरेकडील राजघराण्यांशीं जोडलेले दिसतात. त्यांचा अंमल पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत चालत होता. त्यांनीं दक्षिणेला तेलंगण व कर्नाटकावरहि राज्य केलें. पण त्यांच्या मुख्य लढाया पश्चिमेकडील क्षत्रियांशीं व पूर्व-उत्तरेकडील कलिंग देशांतील खारवेल ह्या राजांशीं झाल्या. त्याचेसंबंधीं राठ आणि महारठ ह्यांचीं नांवें शिलालेखांत येतात. ह्यांचे प्रमुख शिलालेख पश्चिम महाराष्ट्रांतच आहेत. त्यांनीं माळवा जिंकला. क्षहरातानें त्यांचा पराभव केला. नहपान क्षहरातानें पुणें ते सोपारा हा सबंध प्रान्त जिंकून घेतला, पण शातवाहनांनीं दोनतीन पिढ्यांतच गेलेलें राज्य परत मिळवलें, एवढेंच नव्हे, तर राज्यविस्तारहि वाढवला. पण परत कांहीं पिढयांनीं त्यांना क्षत्रपाशीं झगडा करावा लागला. उज्जयिनीच्या रुद्रदामनानें शातवाहन वासिष्ठीपुत्र शातकर्णीचा पराभव केला, पण जांवई म्हणून जिवानिशीं सोडून दिलें असा उल्लेख आहे. शातवाहन हे सर्व महाराष्ट्राचे पहिले राजे. त्यांच्या जवळजवळ ५०० वर्षांच्या अमलांमध्यें त्यांचीं सर्वांत मोठीं युद्धें उत्तरेकडून पश्चिम किनाऱ्यानें खालीं सरकणाऱ्या क्षहरात व क्षत्रप ह्यांशीं झालीं. खिस्ती शकाच्या सुरुवातीला हिंदुस्थानांत उत्तरेकडून हे लोक आले. ते इराणी कीं बॅक्ट्रियी तें माहीत नाहीं. त्यांचीं नांवें संस्कृताशीं मिळतीं वाटतात, पण कांहीं फारच चमत्कारिक आहेत. स्वतः शातवाहन कोठचे हेंही माहीत नाहीं. उत्तरेकडून, पश्चिम गुजरातेंतून सरकणाऱ्या

जातींपैकीं तर ते नव्हते ना ? ते सर्वांच्या आधीं येऊन त्यांनीं राज्य स्थापलें व मागाहून येणाऱ्यांना टक्कर दिली. ( रठी, महारठी लोक हे अर्वाचीन रेड्डी व मराठे ह्यांचे पूर्वज असावे असें वाटतें. ) कांहीं कां असेना, शातवाहन काळ महाराष्ट्राच्या एकीकरणाचा व सीमा–निश्चितीचा काळ होता आणि त्यांच्या उत्तरेकडच्या लढायांमुळें आजच्या महाराष्ट्राचें स्वरूप कायम झालें हेंही निश्चित. शातवाहनांमागून त्यांचे मांडलिक शक, अभीर व इक्ष्वाकु ह्यांचे ताब्यांत पश्चिम व उत्तर महाराष्ट्र गेला. इ. स. ३०० च्या पुढें पश्चिम महाराष्ट्रांतील त्रिकूट ह्या स्थानापासून त्रैकूटक नांव घेतलेल्या राजवंशानें आपलें राज्य उत्तर–कोंकण व लाट ( दक्षिण गुजरात ) ह्या प्रदेशांत स्थापलें. त्रिकूट हें स्थळ रघुवंशांत येतें. तें जुन्नरच्या आसपास असावें असा तर्क आहे. त्रिकूटापर्यंत पोंचून तेथून रघु पारसीक देशाला गेला असें वर्णन आहे. जुन्नरच्या नाणेघाटांतून खालीं चेउलला पोंचतां येतें व तें पूर्वी एक सुप्रसिद्ध बंदर होतें. तेथून पारसिकांच्या देशांत जाण्यासारखें होतें हें लक्षांत ठेवावें. (प्रतस्थे अस्थल वर्त्मना ?)

ह्याच सुमाराला वाकाटकांनीं विदर्भांत राज्य स्थापिलें, व त्यांच्या दोन शाखांनीं दोन शतकें तेथें राज्य केलें. उत्तर म्हैसूर व कारवारांत शातवाहनांची एक शाखा चुटु ह्या नांवानें राज्य करीत होती. ती पुढें पल्लवांची मांडलीक झाली.

येथपर्यंतच्या महाराष्ट्रांतील राजांच्या राजकारणाचे धागे उत्तरेसच होते. ह्यापुढें मात्र इ. स. ५०० पासून बदामी चालुक्यांचा उदय झाला व तेव्हांपासून हें चालुक्य घराणें महाराष्ट्राचें स्वामी असेतोंपर्यन्त, म्हणजे सुमारें इ. स. ७५० पर्यन्त, त्यांचें सर्व बळ दाक्षिणात्यांशीं म्हणजे पल्लव, चोल, पांड्य व केरल ह्या चौकडीशीं भांडण्यांत खर्च झालें. पण बदामीच्या चालुक्यांच्या ज्या विजयानें त्यांची कीर्ति दिगंत पसरली तो म्हणजे कनौजच्या हर्षवर्धनावर मिळविलेला विजय होय. परत एकदां महाराष्ट्राच्या उत्तरसीमा बिनधोक झाल्या व पश्चिम व उत्तर महाराष्ट्रावर चालुक्यांच्या मांडलिकांनीं राज्य केलें. ह्यानंतर आठव्या शतकांत चालुक्यांचेच उत्तरेचे मांडलिक राष्ट्रकूट राज्यावर आले. राष्ट्रकूटांचीं घराणीं

वऱ्हाड, सातारा व लाट येथें पसरलेलीं होतीं, ( हे मूळचे लातूरचे ) व मूळ दक्षिणेकडचीं असलीं तरी उत्तरेचीं झालेलीं वाटतात. त्यांनींहि दक्षिणेकडे स्वाऱ्या केल्या तरी उत्तरेचें लक्ष कमी केलें नाहीं. कलिंग, कोसल व माळवा देश त्यांनीं जिंकले व माळव्यांतील गुर्जरांशीं पिढयान्-पिढया लढून त्यांना नष्ट केलें. चालुक्यांखेरीज इतर राजांचें राजकारण व राजकीय महत्त्वाकांक्षा उत्तरेशीं निगडित होत्या. चालुक्यांनाहि अखिल भारतीय स्थान मिळालें ते`कांचीच्या पल्लवांचा पराभव करून नव्हे तर उत्तरेच्या राजघराण्याचा पराभव केला म्हणून. गंगेंत देह ठेवण्याची जी धडपड धार्मिक लोक करीत तीच धडपड गंगेला राज्य भिडवण्यासाठीं राजे करीत.

आंध्र व कर्नाटक अशा दोन संस्कृतिसंपन्न राष्ट्रांशीं बरोबरी करून मराठीनें आपल्या दक्षिण सीमा पक्क्या केल्या, एवढेंच नव्हे तर मराठी भाषा कर्नाटकाच्या गाभ्यापर्यंत पोचली. ह्याला अनेक सांस्कृतिक कारणें आहेत. दाक्षिणात्य हे पहिल्यापासूनच धार्मिक प्रवृत्तीचे होते. वेद, श्रुति, स्मृति, पुराणें व महाभारत—रामायणादि ग्रंथांचा अभ्यास दक्षिणेंत अतिशय आस्थेनें होई. प्रख्यात सूत्रकार बौद्धायन व आपस्तंब दाक्षिणात्य होते. बृहत्कथेंत अपाणिनीय अशा ऐन्द्रादि व्याकरणांचा उल्लेख येतो, तीं दाक्षिणात्यांनीं रचिलेलीं होतीं असें दिसतें. शक, क्षत्रप, यवन व मागून म्लेच्छ वगैरे लोकांच्या होणाऱ्या अव्याहत आक्रमणामुळें वैदिक परंपरा उत्तरेला नष्ट होत चालली, पण दक्षिणेला अगदीं परवां परवांपर्यन्त ती जिवंत राहिली. ह्याप्रमाणें द्राविडांच्या बोल—भाषा जरी निराळ्या असल्या तरी धर्मभाषा संस्कृतच होती. संस्कृताचें अध्यापन, अध्ययन व जतन ते करीत व भारतीय संस्कृतीच्या अखंडत्वाचा एक महत्त्वाचा दुवा दाक्षिणात्यांच्या प्रयत्नांमुळें बळकट राहिला असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. संस्कृत भाषेच्या ह्या वर्चस्वामुळें संस्कृतोद्भव मराठी कन्नडिगांना फारशी परकी वाटली नाहीं असें दिसतें. शातवाहन कालांत व थोडी नंतर बौद्ध लेणीं महाराष्ट्रांत खोदलीं गेलीं. येथील बुद्ध भिक्षूंनीं बौद्ध धर्माचा प्रसार दक्षिणेंत केला असणार व त्यामुळें पुन्हां एकदां संस्कृतोद्भव भाषेचा

दक्षिणेंत धर्मभाषा म्हणून शिरकाव झाला. दिगंबर जैन खिस्ती शकाचे सुरवातीस कर्नाटकांत पोचले होते असें दिसतें. सर्वांत जोरदार धर्मप्रसार जैनांचा झाला. चालुक्य व राष्ट्रकूट दोघेहि जैनानुयायी होते व त्यांच्या आश्रयाखालीं पुष्कळ महत्वाचे जैन ग्रंथ जैन महाराष्ट्रींत लिहिले गेले. पुष्पदंताचें हरिवंशपुराण राष्ट्रकूट राजांच्या अमदानींत मान्यखेट (मालखेड) येथें रचलें गेलें. कर्नाटकाच्या गाभ्यांत महाराष्ट्री भाषेंत ग्रंथनिष्पत्ति राजाश्रयानें होत होती असें स्पष्ट दिसतें. आजहि जैनधर्मीय महाराष्ट्राच्या दक्षिण व पूर्व सीमेवर आहेत. कोल्हापूर, सांगली, सातारा, सोलापूर येथें जैनांची वसति आहे. जैन धर्माचा प्रसार गुजरातेंतून झाला. बरेच जैनधर्मीय गुजरातेंतून येऊन महाराष्ट्रांत–कर्नाटकांत स्थायिक झालेले दिसतात. कर्नाटकांतील वैश्य समाज गोरा, रुंद तोण्डाचा व गोल डोक्याचा आहे, असें त्यांच्या मापावरून आढळलें. हल्लीं जरी हा समाज लिंगायत असला तरी तो पहिल्यानें जैन असावा असें वाटतें. चालुक्यांच्या राजवटींत बसवानें लिंगायत संप्रदायाचा जोरदार प्रसार केला, तेव्हां बऱ्याच जैनांना लिंगायत केलें. लिंगायत संप्रदायानें कानडी भाषेचाहि पुरस्कार केला. म्हैसूरला श्रवणबेळगोळा येथें जैनांची संघटित वसति आजही आहे व गोमतेश्वराच्या मूर्तीच्या पायाशींच वर सांगितलेला शिलालेख आहे हें पाहिलें म्हणजे त्याच्या उत्पत्तीची मीमांसा लागते. हा शिलालेख मराठ्यांच्या आक्रमक राजसत्तेचें प्रतीक नसून जैनांच्या धर्मप्रसाराचें आहे.

संस्कृत भाषेच्या वर्चस्वामुळें कानडी, तेलगू व मल्याळी भाषांची वर्णमाला, विशेषतः व्यंजनें, संस्कृताबरहुकूम बनवलेलीं आहेत. फक्त तामिळ लोकांनीं मात्र आपली मूळ वर्णमाला ठेवलेली आहे.

ह्या सर्व कारणांमुळें मराठीला आपल्या दक्षिणसीमा घट्ट धरून ठेवणें शक्य झालें. मराठी भाषेचें कर्नाटकांत आक्रमण होऊन सबंध प्रदेशाचा प्रदेश मराठी भाषिकांनीं आत्मसात् केला असें इतिहासावरून दिसत नाहीं. चालुक्यांची बदामी आजहि कानडी आहे. पश्चिमेकडे कानडीची व मराठीची जी सरमिसळ दिसते, ती पूर्वीपासून असावी असें वाटतें.

किनाऱ्याची पश्चिमपट्टी व पश्चिमेकडील डोंगराळ वनप्रदेश कानडी भाषिकांनीं मागून व्यापला असावा असें दिसतें.

## मराठी भाषा

साधारणपणें नवव्या-दहाव्या शतकापासून अर्वाचीन हिंदी भाषांचा उत्कर्ष झाला. त्याच्या आधीं त्याच्या बोलभाषा असतील,पण ह्या काळापासून त्यांत उत्तम प्रतीचें वाङ्मय रचलें जाऊं लागलें. द्राविड वाङ्मय, विशेषतः तामिळ वाङ्मय ह्याहि आधीचें आहे. (इ. स. २००-३०० च्या सुमाराचें असें कांहीं म्हणतात.) तेलगू त्या नंतरचें व कानडी सर्वांत मागूनचें. अर्वाचीन भाषांमुळें शेजारच्या प्रांतांना आपण कांहींतरी निराळे आहोंत ही भावना उत्पन्न होऊन भाषावार प्रांतांची भावना रुजली. ह्या भावनेचें पोषण मुख्यत्वें संतवाङ्मयामुळें झालें. आपल्या भाषेचा व प्रांतांचा अभिमान ह्या वाङ्मयांत प्रतिबिंबित झालेला दिसतो.

हिंदुस्थानांत सर्वांत दक्षिणेकडील बोलली जाणारी संस्कृतोद्भव भाषा म्हणजे कारवारी-कोंकणी, ही भाषा बोलभाषाच राहिल्यामुळें ती लौकरच नाहींशी होण्याची भीति आहे. कारवारच्या दक्षिणेलों मल्याळी भाषिकांचा मुलूख लागतो व खुद्द कारवारचा कांहीं भाग व सर्व पूर्व हद्द कानडी भाषिकांची आहे. उत्तरेला रत्नागिरी-कोंकणीच्या द्वारें त्यांचा संबंध मराठी भाषेशीं येतो. कारवारी कोंकणींत लिखित वाङ्मय नसल्यामुळें तेथील लोक कानडी वाङ्मय वाचतात, लिहितात व समृद्ध करतात. येथील सुशिक्षित समाज सर्व दक्षिण हिंदुस्थानभर पसरलेला आहे व तो त्या त्या भाषेची सेवा करतो. महाराष्ट्रांतील कोंकणी बोलणाऱ्या सारस्वतांची परंपरा सर्वांना परिचित आहेच. या सर्वांचा परिणाम असा कीं, एका अत्यंत विद्वान ब्राह्मण जमातीची मायबोली असूनही कारवारी-कोंकणी अद्यापपर्यंत बोलभाषाच राहिली व कारवार कर्नाटकांत गेल्यामुळें ती लवकरच बोल-भाषा म्हणून तरी राहील कीं नाहीं, याची शंका आहे.

मराठीच्या रत्नागिरी-कोंकणी, खानदेशी व वऱ्हाडी या उपभाषाहि बोलभाषाच आहेत. मोठमोठ्या पर्वतराजींनीं विभागलेल्या ह्या बोलभाषाहि कदाचित् दुसऱ्या भाषिकांच्या आक्रमणापुढें नष्ट झाल्या असत्या पण ह्या

सर्वांच्या एकीकरणाचें, किंबहुना महाराष्ट्रीयत्वाच्या जाणिवेचें महत्कार्य देशावरच्या मराठीनें केलें. राजा रामचंद्राच्या नगरांत मराठींतील प्रौढतम ग्रंथ ६०० वर्षांपूर्वी लिहिला गेला व तो प्रौढपणा व ती स्वयंसिद्धता मराठीनें कधींहि गमाविली नाहीं. यादवांच्या राज्यांत ती राजभाषा म्हणून मिरविली. महानुभावांनीं धर्मभाषा म्हणून तिला एक वेगळेंच स्थान देऊन काबूल–कंदाहारपर्यंत पोचवलें. संतांची भाषा म्हणून ती सर्व लोकांच्या तोंडांत खेळली. महाराष्ट्राचीं कुलदैवतें नाशिकचा रामराया, पंढरीचा विठोबा, तुळजापूरची भवानी व जेजुरीचा खंडोबा हीं सर्व मध्य महाराष्ट्रांत आहेत व कोंकण, खानदेश आणि वऱ्हाड येथून हजारों यात्रेकरूंनीं मध्य महाराष्ट्रांतील संतांची वाङ्मयनिर्मिति आपापल्या गांवापर्यंन्त नेऊन भिडविली. वऱ्हाड नागपूरच्या संत कवींचें काव्य देशावरच्या मराठी भाषेला फार जवळचें आहे. अशा तऱ्हेनें संतांच्या वाणीमुळें मध्य महाराष्ट्राची मराठी ही श्रेष्ठतम अशी दृढभावना होऊन गेली व तिचें लोण दूरपर्यन्त पोचल्यामुळें महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतल्या उपभाषांना तिच्या वैभवाचा आधार मिळाला. ही भाषा सर्वांची होती. त्यांतील वाङ्मयनिर्मिति सर्व जातींनीं इतक्या उत्कृष्ट तऱ्हेनें केली आहे कीं, कोणतें श्रेष्ठ हें सांगणें अशक्य आहे. ज्ञानेश्वर आणि एकनाथ, नामदेव आणि तुकाराम, चोखा आणि सेना, नामदेव आणि भास्करभट्ट, मुक्ताई, महदाइसा आणि जनाई–सर्व जातींच्या स्त्रीपुरुषांची ही निर्मिति आहे. त्यांचें वैशिष्ट्य हेंच कीं, सर्व मंडळी मध्य महाराष्ट्राची होती. मराठी संतांच्या ह्या सांस्कृतिक कार्याला राजकीय घडामोडींचीहि जोड मिळाली. शिवरायांच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्रांत स्वातंत्र्याची जी ज्योत पेटली ती आजतागायत जळती आहे. त्यांतल्या त्यांत त्या वेळच्या राजसत्तेंत सर्वांत जुलुमी व बलाढ्य अशा राजसत्तेशीं मराठ्यांनीं सतत पंचवीस वर्षें जी अभूतपूर्व झुंज दिली त्यामुळें सबंध हिंदुस्थान खडबडून जागें झालें व मराठ्यांना जें राजकीय स्थान मिळालें त्यांत मराठी भाषा वांटेकरी झाली. पेशव्यांच्या काळीं नागपूरकर भोसल्यांनीं मराठीची पूर्व सरहद्द घट्ट केली, एवढेंच नव्हे तर जे कांहीं समाज मराठी-हिंदीच्या सरहद्दीवर होते त्यांपैकीं बऱ्याच जणांनीं राज्यकर्त्यांची भाषा म्हणून मराठीचा स्वीकार केला. शिंदे

होळकरांमुळें मध्य भारत व गायकवाडांमुळें गुजरात हे कांहीं खासच मराठी भाषिक झाले नाहींत, पण उत्तरेकडच्या ह्या मराठी राज्यकर्त्यांनीं मराठीवर होणारें उत्तरेकडचें आक्रमण थांबवलें हें निर्विवाद आहे. जी गोष्ट उत्तरेकडची तीच दक्षिणेकडची. तेलंगण व कर्नाटक हे जुन्या व समृद्ध संस्कृतीचे प्रदेश आहेत. त्यांच्या कितीतरी पद्धति मराठ्यांनीं उचलल्या आहेत. पण भाषेच्या बाबतींत मात्र तेलगूचें व कानडीचें मराठीवर आक्रमण होऊं शकलें नाहीं; व त्याला वर दिलेल्या कारण परंपरेखेरीज मराठ्यांचें राजकारणांतील वर्चस्व हें आणखी एक कारण आहे.

मध्ययुगांतही भाषेच्या बाबतींत मराठीची आई जी महाराष्ट्री तिचें वर्चस्व दक्षिणेंत होतें व तींत उत्तम ग्रंथांची उत्पत्ति होत होती. कोऊहल कवीनें रचिलेल्या लीलावई काव्यांत तो स्वतःच तें काव्य मरहट्टदेशी भाषेंत लिहिल्याचें सांगतो. काव्याचा काल सुमारें खिस्ताब्द८०० असावा असें तज्ञांचें मत आहे. त्याच्याहि आधीं शातवाहनानें संपादिलेली तिसऱ्या किंवा चौथ्या शतकांतील गाथासप्तशती किंवा गाहाकोस प्रसिद्ध आहे. निरनिराळ्या कवनांच्या ह्या संग्रहांत खुद्द कविवच्छल हालाचेंहि काव्य आहे. शातवाहन राजे प्राकृताचे अभिमानी होते व त्यांनीं प्राकृताच्या वैय्याकरणांना व पंडितांना आश्रय देऊन प्राकृतांतील वाङ्मय संपन्न केलें. शातवाहन हें राजाचें नांव खिस्तपूर्व दुसऱ्या शतकापासून तों थेट सप्तशति हालापर्यंत आढळतें. ह्यांतील एका शातवाहनाची ( खिस्तपूर्वीच्या शातवाहनाची ) राणी पंडिता होती. ती राजाजवळ विनोदानें जें संस्कृत बोलली तें राजाला कळलें नाहीं म्हणून ती हंसली व राजा अपमानित होऊन निघून गेला. राजानें सहा महिन्यांत भाषा शिकण्याचा निश्चय केला व तो जी भाषा शिकला ती प्राकृत. हा कथाभाग बृहत्कथेच्या आरंभीं येतो व त्यांत वररुचीचें नांव प्रामुख्यानें येतें. शातवाहन राजे यज्ञ करणारे होते, तसेंच नागार्जुन हा बुद्धयति व कालकाचार्यादि जैन पंडितहि त्यांचे गुरु व मित्र होते. शातवाहनांचें नांव प्रतिष्ठानपुरीशीं निगडित आहे व त्यांच्या आश्रयाखालीं प्राकृत भाषा प्रतिष्ठानला उर्जितावस्थेंत आली. या घटनेचा परिपाक म्हणजेच त्याच प्रतिष्ठानपुरींत

राजाश्रयाखालीं असलेल्या मराठींत ज्ञानेश्वरीची निर्मिति होय. मराठी वाङ्मयाच्या प्रौढत्वाची, स्वयंसिद्धतेचीं बीजेंहि ह्या प्राकृत वाङ्मयांत आहेत. बृहत्कथेला जगांतील कथा–वाङ्मयांत तोड नाहीं. ती कोणत्याहि पंथाची नाहीं. ती स्वतंत्र व बहुजनसमाजाभिमुख आहे. अद्‌भुतता व वास्तवता यांचें अजब मिश्रण यांत आढळतें. हालाच्या सप्तशतींतील काव्यहि लोकवाङ्मय आहे. कुठल्या तरी राजाच्या राजकवीनें केलेलें तें काव्य नसून महाराष्ट्रांत प्रचलित असलेल्या लोकप्रिय काव्याचें तें संकलन आहे. त्यांत राजाच्या दरबाराचें चित्रण नसून गांवगाड्याचें, पाटलाचें, पाटलाच्या सुनेचें, म्हणजेच महाराष्ट्राच्या साध्या ग्रामीण जीवनाचें चित्र पहावयास सांपडतें. लीलावई ही अद्‌भुतरम्य कथा हाल राजाबद्दल आहे. त्यांतहि महाराष्ट्राचा प्राण जें प्रतिष्ठान नगर व तेथील गोला ऊर्फ गोदावरी नदी व तींत नहाणाऱ्या, अंगाला हळद फासणाऱ्या, महाराष्ट्र सुंदरींचें वर्णन आढळतें. ह्याशिवाय जैन महाराष्ट्रीची काव्यसंपत्ति अमाप आहे. ही काव्य-निर्मिति महाराष्ट्रांत, तशीच कर्नाटक–तेलंगणांतहि होत होती व त्यांतलें बरेंचसें काव्य गुजरातेंत जैन मठांत जतन झालेलें, गुजराती संशोधन-मंदिरातर्फे प्रसिद्ध होत आहे.

आठव्या शतकांत लिहिलेलें पुष्पदंताचें जैनमहाराष्ट्री भाषेंतील महाकाव्य हरिवंशपुराण हें मान्यखेट येथें लिहिलेलें आहे. म्हणजे मराठीची वाङ्मयीन परंपरा ही दक्षिणेंतील प्राकृताच्या परंपरेंतीलच आहे. प्राकृत परंपरेची जोरदार सुरुवात संस्कृत न जाणणाऱ्या शातवाहन वंशांतील लोकांनीं केली. ह्यांचें शकराज असेंहि एक बिरुद आढळतें. महाराष्ट्रांत बाहेरून घुसलेले, घोड्यावर बसण्यांत तरबेज असलेले हे क्षत्रिय म्हणजेच पृथुमस्तकी-यांचें महाराष्ट्रांत आगमन तर नव्हे ना अशी शंका मनाला चाटून जाते. शातवाहनकालीन उत्खननांत पृथुमस्तकीयांचे सांगाडे सांपडले तर ह्या प्रश्नावर कांहीं प्रकाश पडेल. तोंवर फक्त अनुमानावरच भागवावें लागेल. एवढें मात्र खरें कीं मायलेकींच्या भाषासंसाराची कथा बऱ्याच अंशीं सारखी आहे. महाराष्ट्री ही राजभाषा होती. जैनांनीं तिला दक्षिणेकडची धर्मभाषा बनवली. तिचा प्रसार महाराष्ट्राच्या आसपास विशेष झाला व ती

महाराष्ट्राबाहेरहि प्रसार पावल्यामुळें महाराष्ट्राची भूमि परक्या भाषेच्या आक्रमणापासून नेहमींच अलिप्त राहिली.

कोऊहल कवि महाराष्ट्राचें वर्णन करतांना खालील विशेषणें लावतो : हा महाराष्ट्र देश 'णीसेस-सस्स-संपत्ति-पमुअआसेस-पामर-जणोहो,सुव्वसिय—गाम-गोहण-भंभारव-मुहलिय-दियंतो, णीसेस-सुह-णिवासो, आसय विसयो' व 'सुसणिद्धघास-संतुह,-गोहणालोय-मुइय-गोयालो' असा आहे. सर्व तऱ्हेच्या धान्याच्या विपुलतेमुळें गरीब गुरिबांना आनंद देतो असा हा देश ( निःशेष-सस्य-संपत्ति-प्रमुदिताशेष-पामर-जनौघः ); उत्तम रीतीनें वसव-लेल्या, चांगलीं घरें असलेल्या गांवांतून गोधनांच्या हंबरण्यानें दिशा भरून गेल्या आहेत असा ( सुष्ठूषितग्रामगोधनभंभारवमुखरितदिगंत: ); सर्वत्र रहाण्यास सुखदायक ( निःशेष सुखनिवासः ); जेथें लोक आश्रयास येतात असा ( आश्रयविषयः ); व कोंवळ्या, लुसलुशीत गवतानें संतुष्ट असें गोधन पाहून आनंदित झालेले गवळी जेथें आहेत असा देश ( सुस्निग्धग्राससंतुष्टगोधनालोकमुदितगोपालः ); असें महाराष्ट्राचें वर्णन आहे.

कोऊहल कवीचें वर्णन आणखीही पुष्कळ लांबलचक आहे. नेहमीं-प्रमाणें त्यांत निरभ्र चांदण्या रात्री, फुलांचा सुगंध, यथेच्छ दारू पिणारे लोक, प्रिया व प्रियकर, सगळें आलें आहे. म्हणून वर निवडलेलीं विशेषणें सहेतुक किंवा मुद्दाम निवडून लावलीं आहेत असें म्हणतां येणार नाहीं. ह्या देशांत प्रतिष्ठान नगर आहे व तेथील ' मरहट्टिया अंगाच्या हळदीनें जिचें पाणी रंगलें आहे (पिंजरलेलें ) अशा गोला नदींत रोज आंग धुतात' हें वर्णन मात्र अगदीं प्रादेशिक वाटतें. ( मरहट्टिया-पओधर हलिद्द परिपिंजरंबुवाहीए धुव्वन्ति जत्थ गोलाणईए तद्दियासियं पावं-त्या दिवशींचें पाप धुतात—पर्यायानें अंग धुतात. ) त्याचप्रमाणें हा जुना कवी आपल्या भाषेला ' मरहट्ट देसी भासा ' असें नांव देतो. पण भाषेबद्दल अभिमान नसून स्त्रियांना समजेल, मधुर वाटेल अशी भाषा म्हणून थोडा कमीपणा घेऊनच कथा सांगतो.

ही भाषा सध्यांची मराठी नव्हे, त्यावेळचीहि बोलभाषा नसेल, पण त्यांतील बरेच प्रयोग सध्यांच्या मराठींतल्यासारखे वाटतात. ज्ञानेश्वरानें मराठी लिहिली ती कोणत्या आत्मविश्वासानें हें सर्वांना ठाऊकच आहे

महानुभावांनीं सर्वच स्वसंप्रदाय-वाङ्मय मराठींत लिहिलें, एवढेंच नव्हे तर त्यांतील बरेंचसें गद्यांत आहे. त्या गद्यांत अणुमात्रहि बोजडपणा नाहीं, तर बोलभाषेचा व संवादाचा सुटसुटीतपणा आहे. सर्वच विवरण प्रश्न करणारे व उत्तर देणारे अशा धर्तीवर असून त्याला संभाषणाप्रमाणें ओघ आहे. ह्यांचा महाराष्ट्राबद्दल अभिमान दांडगा होता. महाराष्ट्र ही त्यांची धर्मभूमि होती.

अशा तऱ्हेनें प्राकृत भाषेच्या परंपरेंत मराठी पहिल्यापासून आत्मविश्वासानें पुढें सरसावली. मराठी वाङ्मयांत मनांत भरणारी पहिली गोष्ट म्हणजे प्रौढपणा व स्वतंत्रपणा. मराठीच्या पहिल्या ग्रंथकारांचें कार्य संस्कृत वाङ्मयांतील भागवत परंपरा मराठींत उतरविण्याचें असलें तरी तें भाषांतराच्या स्वरूपाचें नसून स्वानुभवावर आधारलेलें म्हणून स्वतंत्र होतें.

ज्ञानदेव व मुकुंदराय, भास्करभट्ट व नरेन्द्र ह्यांचें लिखाण दुसऱ्या कसल्या तरी वाङ्मयाची छाया असल्यासारखें वाटत नाहीं. त्याचप्रमाणें मराठी वाङ्मय जन्माला आलें तें प्रौढावस्थेंतच. वाङ्मयाच्या बाल्यावस्थेचीं लक्षणेंच त्यांत नाहींत. भावनांच्या आविष्कारांत एक प्रकारचा बळकटपणा, खंबीरपणा व धार दिसते. विष्णुदास मेणाहून मऊ खरे, पण त्यांचें वाङ्मय भावनाविवश, रडवें व हळवें असें कुठेंहि आढळत नाहीं. कारुण्य, वत्सलता, मानवी मनाच्या दौर्बल्याचें चित्रण वास्तव असून त्यांत उपरोध, उपहास, धिक्कार व क्रोध यांचेंहि भरपूर मिश्रण आहे. संसारांतून लक्ष काढून हरिचरणीं लावा असें सांगणाऱ्या ह्या लोकांचें मानवी संसाराचें अवलोकन सूक्ष्म होतें व त्याचा वाङ्मयांत उपयोग केल्यामुळें तें कंटाळवाणें वाटत नाहीं. मराठ्यांचा बुद्धिवाद कधीं लोपत नाहीं. रामदासासारख्यांच्यांत काव्य लोपतें पण बुद्धिवाद कायम रहातो, तर तुकारामात काव्य व बुद्धिवाद ह्यांचा अपूर्व अद्भुत संगम दिसून येतो.

अगदीं अलिकडच्या काळांतील मराठीचा संसार पाहिला तरी केवळ प्रेमिकांच्या गोष्टी लिहिणारे कांहीं ग्रंथकार वगळल्यास मराठीनें आपलें पूर्वीचें कणखर, बुद्धिवादी स्वरूप कायम ठेविलें आहे असें दिसतें. मराठी रंगभूमी व नाट्य ह्यांचा आविष्कारहि एकदम प्रौढावस्थेंत झाला.

मराठी काव्यपरंपराहि स्वतंत्र, युयुत्सु व प्रौढ अशी आहे. या सर्वांचें श्रेय जसें कवी व लेखक ह्यांना आहे, तसेंच कठोर टीकाकारांनाही आहे. ज्ञानेश्वर तुकारामापासून तों तहत आतांपर्यंतच्या लोकहितवादी, चिपळूणकर, आगरकर, वरेरकर, अनिल, मर्ढेकर ह्या सर्वांवर तुटून पडणाऱ्या टीकाकार वर्गाचीहि परंपरा अखंडित व अविछिन्न आहे.

## महाराष्ट्राची वसाहत एक, कीं तीन स्वतंत्र वसाहतींच्या एकीकरणानें झालेली ?

महाराष्ट्राच्या तीन विभागांत निरनिराळया उपभाषा बोलतात, व त्यांच्या एकीकरणाचें कार्य संतवाङ्मयानें केलें, हें आपण पाहिलेंच. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीनें ह्या तीन उपभाषा मूळपासूनच एका भाषेच्या उपभाषा आहेत, कीं त्या पहिल्यानें थोडथोड्या भिन्न असून मागून त्यांचें एकीकरण झालें हें कळणें आवश्यक आहे. कारण महाराष्ट्र भूमीचा विस्तार पश्चिम समुद्रापासून हळबी मुलुखापर्यंत आहे. या सबंध पट्ट्यांत एकराष्ट्र व एकराज्य नव्हतें. अशा परिस्थितींत एवढा मोठा मुलूख एकभाषिकांचा झाला कसा ह्या प्रश्नाचें उत्तर देणें आवश्यक आहे. पूर्वेकडून पश्चिमेकडे हळुहळू मराठी भाषा आक्रमण करीत गेली कीं पूर्व टोकाकडे जसें नव्या ऐतिहासिक कालांत कित्येक जमातींचें मराठीकरण झालें तसें तें होत गेलें हें समजणें आवश्यक आहे. जर मराठीचे तीन मुलूख आरंभीं थोडे भिन्न-भाषिक असून संतवाङ्मयाच्या प्रसारामुळें त्यांचें एकत्र दृढीकरण झालें असेल तर संतवाङ्मयाची कामगिरी अमोलच समजली पाहिजे.

ह्या तीन प्रदेशांतील कुटुंबव्यवस्था थोडथोडी निराळी आहे हें मागें पाहिलेंच. उत्तर महाराष्ट्रांत दिएरवटू आहे. मध्य व दक्षिण महाराष्ट्रांत तो नाहीं. त्याचप्रमाणें गांवगाड्याचें पूर्णत्वास गेलेलें स्वरूप मध्यमहाराष्ट्रांत जसें सांपडतें तसें उत्तर महाराष्ट्रांत किंवा पश्चिम महाराष्ट्रांत सांपडत नाहीं. उत्तर महाराष्ट्रांत कांहीं वसाहत अर्वाचीन आहे व गांवेंच्या गांवें एका जातीच्याच लोकांनीं बसवलेलीं आहेत. उदाहरणार्थ यावल, रावेर वगैरे खानदेशच्या तालुक्यांतील बहुसंख्य गांवें लेवांचीं आहेत. कांहींत नुसते गुजर आहेत. वऱ्हाडांत कांहीं गांवें मध्य भारतांतून आलेल्या व स्वतःस

रजपूत म्हणवणाऱ्या जमातींचीं आहेत. खैरे कुणबी, झाडे कुणबी एका विशिष्ट मुलुखांतच सांपडतात. आंध, माना, कोहाळी ह्यांचा मुलूखहि असाच मर्यादित आहे. ह्या पट्टया एकेका जमातीनें वसविलेल्या दिसतात. तसें मध्य महाराष्ट्राचें नाहीं. तेथें निरनिराळ्या कुळींचा निरनिराळा प्रदेश आहे. पण सर्व आपणांस कुणबी व मराठे म्हणवतात व ह्याखेरीज सर्व खेड्यांतून निरनिराळ्या जातींचीं स्थायिक, हक्कदार, बलुतेदार घराणीं आहेत.

कोंकणांत ग्रामसंस्थेचें स्वरूप देशापेक्षां निराळें आहे. एवढेंच काय, तर गांवढे उर्फ गांवठाण म्हणून निराळी वास्तु सर्वत्र आढळत नाहीं. गांवठाणाचा अभाव दक्षिणेकडे, विशेषतः मलबारांत फारच डोळ्यांत भरतो. शेंकडो मैल प्रवास केला तरी दोन्ही बाजूचें कुंपण संपत नाहीं व एकेक गांव मैलमैल पसरलेलें असतें. हा प्रकार भौगोलिक परिस्थिति व शेतीची पद्धत ह्यांमुळें घडतो. एका बाजूला डोंगर व एका बाजूला समुद्र असला व प्रत्येक घराची नारळी पोफळींची बाग असली म्हणजे गांवाला रुंदी मुळीं नसतेच. एकच लांब रस्ता व त्याच्या बाजूला घरें व घरामागें वाड्या अशी ग्रामरचना दिसते. कित्येकदां तर घर व वाडी आणि त्याच्या भोंवतालचीं भातशेतें अशी एकाच्या मालकीची जमीन संपली, कीं परत दुसरें घर व भोंवतीं भातशेतें आणि लहानशी वाडी असा देखावा मैलमैल दिसतो. एका घराचें दुसऱ्या घरापासून अंतर फर्लांग, दोन फर्लांग, कधीं कधीं अर्धा मैलसुद्धां असतें. अशा तऱ्हेच्या विस्कळित वस्तीला देशावरचें गांवाचें स्वरूप कसें असणार? ह्याउलट देशावर आगगाडीनें प्रवास केला, तर मैलनमैल पसरलेली काळीभोर शेतजमीन, व मधून मधून आढळणारे घरांचे पुंजके असें गांवठाणाचें दृश्य सांपडतें. गवळी, तेली, सुतार, अशी मंडळी दर गांवांत असतात. मुलींच्या ओव्यांत एकमेकांवर अवलंबून असलेल्या निरनिराळ्या जातींचीं नांवें येतात.

माझ्या सोबतीनी वाण्या बामनाच्या पोरी । तांब्याच्या घागरी भेट होईल गंगेवरी ॥

पंचमीच्या सुप्रसिद्ध गाण्यांतील नायिका वारुळाला जाते, ती दर आळींतील मुली घेऊन जाते. " निम्म्या वाण्या बामनाच्या । निम्म्या साळ्या हो माळ्याच्या । निम्म्या कोष्टी तांबोळ्याच्या ॥ "

अशा सर्व मुली जातात. तसेंच चांगुणेच्या गाण्यांत, श्रवणाच्या गाण्यांत प्रत्येक ठिकाणीं त्याच्या आळींतील जमात व त्यांचें सहाय्य ह्यांचें वर्णन आहे. चांगुणेपुढें पेंच पडला तशी ती गेली भोयाच्या वाड्याला.

अरे अरे भोई दादा, अरे अरे भोई दादा, माजा मैतर होशील —मंगर मासा आणून देशील ॥

अरे अरे धनगर दादा, अरे अरे धनगर दादा, माजा मैतर होशील— पाळीव बकरा आणून देशील ॥

त्याचप्रमाणें श्रवण तांबट आळीला जातो, बुरूड आळीला जातो व त्याची बायको त्याला धनगर आळीला जाऊन कांबळ आणयला सांगते व म्हणते कीं "ह्या आईबापांची मोट बांधून, द्यावी गंगेंत सोडून ।— जाईल काशीला भिडून । येईल तीरथ घडून ॥" कशाला उगाच कावडीची यातायात ! अशा प्रकारें निरनिराळ्या जमातींचें खेडेगांवांतील एकत्र वास्तव्य व त्यांचें एकमेकांवर अवलंबून असलेलें जीवन मध्य महाराष्ट्रांत व वऱ्हाडांत दिसतें. पण कोंकणांत दिसत नाहीं. कोंकणांत सधन माणसांची भातशेती व वाडी असते. शेतावरचे गडी वंशपरंपरा काम करणारे असतात व कांहीं थोड्या गोष्टींखेरीज जवळ जवळ सर्व संसारोपयोगी वस्तू घरच्या घरीं मिळतात. कोंकणांत घरोघर गाय बैल असतो पण गांवांत—मोठमोठ्या गांवांतही—दूध विकत मिळण्याची पंचाईत असते. दही विकत घेणें ही गोष्टसुद्धां तिकडच्या लोकांना कशीशी वाटते. ह्या उलट मराठवाड्यांत व खानदेशांत दरगांवीं सकाळीं उत्तम दही विकत मिळतें. कोंकणांत बायका घरोघर ताक करून लोणी काढतात व तूप कढवतात. देशावर हा प्रकार नाहीं. कोंकणांत उंडीच्या झाडाच्या फळापासून घरच्या घरीं कडू तेल गाळून तें दिव्यासाठीं वापरतात. रतांबीचें गोडें तेल काढून तें फोडणीस वापरतात. घरच्या माडाच्या झांपांनीं घर शाकारतात. माडाच्याच हिरकुटाच्या केरसुण्या घरीं बांधतात. एक ना दोन, हजारों बारीक सारीक वस्तू घरीं होतात. बाहेरून फार थोडें आणावें लागतें. घराचा कारभार स्वयंपूर्ण असतो म्हणून गांव ही संस्था परिणत झालेली नाहीं. या परिस्थितीचें चित्र ग्रामनामांत आढळतें. मध्य महा-

राष्ट्रांत ' गांव ' हा प्रत्यय ग्रामनामापुढें दिसतो, तर पश्चिम महाराष्ट्रांत ' पाडा,' ' वाडी,' ' गांव ' ह्या जोडीला ' घर ' हाही प्रत्यय दिसतो. उदाहरणार्थ सायघर, दांडेघर, देवघर वगैरे. ग्रामनामांच्या बाबतींत महाराष्ट्राच्या तीन विभागांत जरा निरनिराळीं ग्रामनामें आढळतात व त्यावरूनहि मनांत प्रश्न उद्भवतो कीं, तीन वसाहती निरनिराळ्या होऊन मग त्यांचें एकीकरण झालें कीं कसें ? जसें ' घर ' हा प्रत्यय कोकणांत व भातशेती असलेल्या मावळांत सांपडतो, तसाच ' फळ ' हा प्रत्यय वऱ्हाड-नागपूरच्या बाजूला गोंड मुलुखांत विशेष आढळतो. फळ प्रत्ययाचीं दोन ग्रामनामें पुण्याच्या पूर्व विभागांत व नगर जिल्ह्यांत सांपडतात. कांहीं औरंगाबाद, नांदेड व नंतर बरींच चांदा व वणी या विभागांत सांपडतात. अशा तऱ्हेचें ग्रामनाम वर्धा नदीच्या तीरावरील गोंड विभागांतून पश्चिम महाराष्ट्रांत पोचलेलें दिसतें. तें कोणी आणलें ? गोंडांनीं कीं इतर दुसऱ्या कोणत्या तरी जमातीनें ? नागपूर प्रांतांतील कन्हान व भंडाऱ्याजवळची वैनगंगा ह्याच ताम्रपटांतील ' कण्हवेण्णा किंवा कण्हवेण्णा ' असें प्रा. मिराशींनीं सिद्ध केलें आहे. तर मग पश्चिम महाराष्ट्रांत महाबळेश्वरास उगम पावणाऱ्या कृष्णा व वेण्या ह्या नद्यांचीं नांवें कोणा वसाहतकारांनीं दिलीं ? गोवें प्रांतापासून तों सर्व महाराष्ट्रभर, एवढेंच नव्हे तर गुजरातेंत नर्मदा नदीपर्यंत, अंकोलें-अकोळें, अक्कल असें प्रथमपाद असलेलीं ग्रामनामें आढळतात. अंकोले-अक्कोले, अकोळनेर, अक्कलकोट, अक्कलखोप व भडोच जवळचें अंकलेसर हीं त्यांतील कांहीं नांवें आहेत. हीं नांवें कोणीं दिलीं ? देणारे लोक पूर्वेकडून पश्चिमेकडे किंवा उत्तरेकडून दक्षिणेकडे कीं उलट दिशेनें गेले वगैरे प्रश्न सर्व महाराष्ट्रीय ग्रामनामांच्या अभ्यासानें सुटतील. पण ते नीट सुटण्यास तेलंगण, कर्नाटक, गुजरात व मध्य हिंदुस्थान येथील ग्रामनामांच्या अभ्यासाचीही जरुरी आहे. या अभ्यासांत पुण्याला प्रा. कत्र्यांसारख्या विद्वान भाषा पंडिताचें साह्य मला मिळत आहे हें सांगणें इष्ट आहे. दुर्दैवानें अभ्यास अद्याप अपूर्ण असल्यामुळें सध्यां वरील प्रश्नांचीं उत्तरें देणें अशक्य आहे.

धारवाडचे संशोधक श्री. शं. बा. जोशी यांच्या मतें मराठींतील बरींच नामें व ग्रामवाचक प्रत्यय हीं कानडींतून आलीं आहेत. कानडी भाषिक

लोक पूर्वी उत्तरेस गंगाकिनाऱ्यापर्यंत पसरलेले होते व आर्यांनीं त्यांना दक्षिणेकडे रेटलें, पण त्यांच्या वसतीचें चिन्ह ग्रामनामांच्या रूपांत अजून शिल्लक आहे असा हा दावा आहे. मराठी ग्रामनामें अभ्यासतां या विधानाची यथार्थता मला पटत नाहीं. पण हा वाद न करतां सर्व दृष्टीनें अभ्यास केल्यावर मगच या प्रश्नाचा नीटपणें निकाल लागेल. गोदावरी नदीकांठचा प्रदेश हा संस्कृति–संगमाचा प्रदेश होय. दक्षिणेकडून द्रविडांनीं व उत्तरेकडून संस्कृत भाषिकांनीं त्यावर आक्रमण केलें. मूळच्या आदिद्राविड लोकांशींहि त्यांचा संघर्ष झाला असला पाहिजे. तेच आज रानावनांतून राहणारे आदिवासी. दक्षिण व उत्तरेच्या लोकांनीं व मागाहून पश्चिमेच्या मार्गानें आलेल्या पृथु–मस्तकीयांनीं जी वसाहत केली तीच सध्याचें महाराष्ट्र असें माझें मत आहे. हे पृथुमस्तकीय कर्नाटकांतहि दूरवर पसरले आहेत. अशा परिस्थितींत मराठी–कानडी वादांत न शिरतां पुढचा अभ्यास चालू ठेवणें हाच एक मार्ग दिसतो. दक्षिण महाराष्ट्रांत द्राविड ग्रामनामें असण्याचा संभव आहे, हें आतांपर्यंतच्या सर्वच विवेचनावरून कळून येईल.

महाराष्ट्राची वसाहत पूर्वेकडून पश्चिमेकडे किंवा पश्चिमेकडून पूर्वेकडे अशी एका दिशेनेच झाली नसून कमींत कमी दोन स्वतंत्र विभागांत झाली असावी असें दिसतें. ते विभाग म्हणजे अपरांत ऊर्फ कोंकण व विदर्भ हे पश्चिम व पूर्व सरहद्दीवरील प्रांत होत. महाराष्ट्राचा सांस्कृतिक गाभा जो गोदातीर तो पहिल्यानें उत्तर महाराष्ट्रांतूनच वसवलेला असला पाहिजे व तेथूनच संस्कृतोद्भव भाषा तेथें रुजली असली पाहिजे. नंतर पश्चिमेकडून रुंद डोक्याच्या लोकांनीं आंत शिरून मध्य महाराष्ट्राची राजधानी व भाषा आत्मसात् केली असावी.

त्याचप्रमाणें महाराष्ट्रांत किती अंशानें आदिवासी लोकांचें मिश्रण झालें आहे हें अभ्यासणेंही जरूर आहे. ग्रामनामांपैकीं कांहीं प्रकार आदिवासी ग्रामनामांसारखे (उदा. " फळा " न्त व " पल्ली, वली, " अन्त ग्रामनामें ) वाटतात. पण त्याचें नक्की उत्तर मध्य भारतांत पूर्वपश्चिम पसरलेल्या आदिवासींच्या समाज–जीवनाचा व भाषेचा अभ्यास

साकल्यानें केल्याखेरीज देणें शक्य नाहीं. आदिवासी म्हणजे संस्कृतिहीन रानटी लोक नसून त्यांचें स्वतःचें असें एक समाज-जीवन आहे, गांव वसवण्याच्या कांहीं अगदीं स्वतंत्र पद्धति आहेत, हें विसरतां कामा नये. भारतीय संस्कृतीच्या निर्मितीचा एक वांटा ह्या लोकांकडे आहे व म्हणून नुसत्या संस्कृत-द्राविडाच्या अभ्यासानें भारतीय संस्कृतीचें स्वरूप यथार्थपणें समजावयाचें नाहीं. मराठी संस्कृतींत व पिंडांतही त्यांचा वांटा आहेच आहे. पण कोणता व किती हें सध्यां सांगण्याचें सामर्थ्य लेखिकेला नाहीं.

### मराठी धर्म व संप्रदाय

मराठी वाङ्मयाचें अंतरंग समजण्यास संतकवींचा अभ्यास करावा लागतो व म्हणून ह्या विभागांत महाराष्ट्रांतील धर्म व संप्रदाय यांच्या स्वरूपाचें अति थोडक्यांत दिग्दर्शन करणें योग्य होईल.

भाषेच्या बाबतींत जरी मराठीनें द्राविड भाषेंतील शब्द व वाक्प्रचार उचलले तरी तिचें संस्कृतोद्भव भाषेचें स्वरूप कायम राहिलें आहे. तीच गोष्ट धर्म व संप्रदाय यांचा इतिहास पाहिल्यास दिसून येते. हिंदूंचा आपल्या दैवतांशीं संबंध कधीं प्रेमाचा, कधीं रागाचा व कधीं तर स्पर्धेचाहि असतो. पृथ्वीवरील राजे इंद्र होतील म्हणून इंद्रांनीं योजिलेल्या नाना युक्त्या सर्वांना माहीत आहेतच. देवांवर रागावून विश्वामित्रानें प्रतिसृष्टि निर्माण केली ही कथाहि माहीत आहे. ह्या देव-मानवांच्या संबंधाचें मूळ पूर्वज—पूजनांत आहे. देव हे मानवांचे पूर्वज आहेत व ते ज्या तऱ्हेचे यज्ञयाग करून स्वर्गांत गेले त्या तऱ्हेचें आचरण करून मानवांनाहि दैवतासमान होतां येतें. सूर्याचा मुलगा जो मनु त्यापासून क्षत्रियांची व इतर मानवांची उत्पत्ति झाली हें सर्वांना माहीत आहेच. देव व मनुष्य हीं एकमेकांपासून सर्वथैव भिन्न अशीं तत्वें नसून त्यांचें असें जवळचें नातें असल्यामुळें देवांबद्दलची हिंदू कल्पना व ख्रिस्ती व इस्लामी कल्पना अगदीं भिन्न आहेत. आपल्याकडे देव म्हणजे विशिष्ट स्थानाप्रत पोचलेला मानव व मनुष्य म्हणजे अजून देव न झालेला प्राणी अशी भूमिका आहे, व ती आजतागायत कायम आहे. ह्या संबंधामुळेंच मनुष्य जन्मतो तो हिंदू धर्मांत जन्मतो. सनातन धर्माचा वारसा त्याला वंशपरंपरा आलेला असतो.

भारतांतील आईबापांच्या पोटीं आला कीं, तो त्या धर्माचा होई. भारताच्या मानवतेबरोबरच ह्या धर्माचें विकसन झाल्यामुळें त्याला निराळें नांव कधींही नव्हतें. तोच एकमेव, सर्व भारतीयांना आपल्या अंतरंगांत घेणारा असा धर्म होता. त्यांत निरनिराळे संप्रदाय निर्माण झाले व इसावी व महंमदी धर्मांच्या आक्रमणामुळें त्याला इतरांनीं दिलेलें हिंदू हें नांव प्राप्त झालें. कांहीं विशिष्ट जातींकरितां संस्कार सांगितलेले आहेत. पण ते संस्कार न करणाऱ्या किंवा त्यांतील कित्येक गाळून टाकणाऱ्या जमातीहि हिंदू धर्मांत आहेत.

ब्रह्म तत्त्वाचा बुद्धिविलास म्हणजे वस्तुमय जग. त्यांतील सर्व वस्तूंत तें तत्व भरून आहे. जड, अचेतन वाटणाऱ्या वस्तु, क्षुद्र जीव व मनुष्य अशी चढत्या श्रेणीची सृष्टि आपणांस दिसते. ती श्रेणी मानवांशींच कां थांबावी ? मानवांपेक्षा बुद्धीनें व शक्तीनें वरचढ असेही जीव-प्रकार असूं शकतील. ब्रह्म तत्वाचा आविष्कार कदाचित् त्यांत जास्त उत्कटतेनें झाला असेल. हे जीव कल्याणकारी किंवा भीतिप्रदहि असतील. तींच निरनिराळीं दैवतें. सृष्टीच्या क्रिया-प्रक्रियांपैकीं निरानिराळ्या तऱ्हेच्या प्रक्रिया निरानिराळ्या दैवतांत प्रामुख्यानें विकासलेल्या असतील. कांहीं आनंदमय धारणाशक्तीचा आविष्कार असतील. तर कांहीं तितक्याच महत्त्वाच्या संहारशक्तीच्या निदर्शक असतील. मानवाचा या दैवतांशीं संबंध तात्पुरत्या स्वरूपाचा आहे. या दैवतांच्या द्वारां स्वतः व ब्रह्म यांचें ऐक्य अनुभवलें कीं, दैवतें व मनुष्य हें द्वित्व मुळीं टिकतच नाहीं, असा उपनिषदांपासून आलेला सर्वमान्य सिद्धांत आहे; म्हणूनहि देव व मानव यांचें नातें इतर धर्मांपेक्षा निराळें पडतें.

सर्व मानवजातींत दिसून येणारी अतिप्राचीन काळची पूर्वज-पूजा, पूर्वजांना देवांचें स्थान, देवांपासून मानवांची उत्पत्ति, ह्या गोष्टी इतरहि प्राचीन धर्मांत दिसून येतात. भारताच्या इतिहासांतील महत्वाची घटना म्हणजे अतिप्राचीन काळीं देवमानवांच्या ह्या कौटुंबिक संबंधाचें, तत्व-ज्ञानाच्या द्वारें, ब्रह्म सिद्धांतांतील अद्वैती एकीकरण ही होय. दुसरी महत्वाची घटना म्हणजे एकदां प्रस्थापित झाल्यावर हा अद्वैत सिद्धांत

इतका दृढमूल झाला कीं, भारतीय जनता तो कधींहि विसरली नाहीं. व त्याचबरोबर अनेकदैवतवाद हा या अद्वैत सिद्धांताच्या विरुद्ध नाहीं, तर त्याला पोषकच आहे, हीहि गोष्ट कधीं त्यांच्या दृष्टीआड झाली नाहीं.

या दोन घटनांमुळें "भुवनेश्वर" शंकर, "जगन्नाथ" श्रीकृष्ण व "विश्व-व्यापी" कोणार्क, तीस चाळीस मैलांच्या परिसरांत एकमेकांचा द्वेष न करतां नांदू शकतात. ही भावना मध्ययुगांतील भक्तिमार्गांतील नाना पंथांच्या भक्ति-रसाच्या प्रवाहांत जवळ जवळ बुडत चालली होती. पण इतर लोकांच्या अंतः-करणांतच काय, पण परम वैष्णवांच्या काव्यांतूनहि ती दिसून येते. अनेकदैवत-वादामध्यें दैवतांच्या उच्चनीच अशा श्रेणी असतात. पण एकेका वर्गांत बरींच दैवतें असतात व एका वर्गांतील दैवतांच्यांत अनुक्रम न लावतां उच्चनीचते-बद्दल साधारणपणें मुग्धता स्वीकारण्यांत येते. निरनिराळ्या दैवतांची निर-निराळ्या वेळीं पूजा करण्यांत येते. कारण दैवतांमध्यें श्रमविभागाचें तत्व दिसून येतें. कांहीं पावसाचीं दैवतें, कांहीं रोगराईचीं दैवतें, कांहीं ग्रामदैवतें, कांहीं क्षेत्रदैवतें अशीं असतात व त्या त्या वेळीं त्यांना वर्चस्व असतें. बाळंतिणीच्या पांचव्या दिवशींच्या रात्रीं कोणी शिव, विष्णू पूजीत नाहींं, त्यावेळीं पोराचें भविष्य लिहिणारी सटवाईच मुख्य असते व तिलाच पहिला मान असतो. अनेकदैवतीय धर्मामध्यें मध्यवर्ती धर्मसंस्था व धर्मगुरूहि नसतात. कांहीं यज्ञयाग सांगितलेले असतात पण ते करणारे ब्राम्हण एकमेकांचे प्रतिस्पर्धी असतात. प्रत्येक ब्राम्हण आपणाला अग्रेसर-त्वाचा मान असावा म्हणून झटत असतो. प्रतिस्पर्ध्यांची फजिती व्हावी म्हणून त्याचा प्रयत्न असतो. निरनिराळ्या शाखा, उपशाखा प्रस्थापित होतात व त्यांत सारखी स्पर्धा चालते. एकच ग्रंथ जर आपण मानला तरी त्याचा अर्थ लावणारे निरनिराळे टीकाकार आपापला स्वतंत्र अनुयायी वर्ग तयार करीत असतात. म्हणून केन्द्रीय धार्मिक सत्ता अशी नसते. त्याचप्रमाणें निरनिराळ्या दैवतांचीं कमीअधिक प्रमाणांत जागृत स्थानें असतात व त्यांना प्रत्येकाला कांहींना कांहीं महत्त्व असतें. त्यांमुळें एक पीठ, एक सर्वोच्च देवस्थान व बाकीचीं खालच्या दर्जाचीं असें नसतें. या सर्वांचा परिणाम मोठा विलक्षण होतो. आचारधर्महि प्रत्येकाचा एक

नसतो. कांहीं कांहीं गटांचा एक असतो व तो अगदीं बांधलेला असतो. इतरांचीं हीं बंधनें सैल असतात. अमकें धार्मिक व अमकें लौकिक ही सीमारेषा पुसट होते. धार्मिक विधींत लोकाचार घुसडले जातात व त्यांना धार्मिक विधीचें पावित्र्य लाभतें. याउलट लोकाचारच काय पण जीवनांतील प्रत्येक कृत्य धार्मिक पायावर उभारलेलें असतें. बाहेरच्या लोकांना हिंदूचें आयुष्य धार्मिक बंधनांनीं जखडल्यासारखें दिसतें, तें त्यामुळेंच. पण हिंदुत्व ही गोष्टच इतकी अनाकलनीय आहे कीं कांहीं केलें तरी, वा कांहीं न केलें तरी, मनुष्य हिंदुत्वाला मुकत नाहीं, हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. हिंदुस्थानांतील मनुष्य जसा भारतांतील हवा व पाणी श्वासतो व पितो, तसेंच तो हिंदुत्वांत जन्म घेतो व हिंदुत्वांत मरतो. हा धर्म ह्या समाजाचें अंतरंग त्याचप्रमाणें बाह्य जग आहे. तो सारखा बदलत आहे. प्रत्येकाची धर्माची व्याख्या निरनिराळी आहे. आचार निरनिराळे आहेत. तरी त्याचें नांव मात्र एकच आहे. खिस्तपूर्व युगात शक, पार्थ, कुशान, असे कितीतरी मानवसंघ येत होते, कांहीं पिढ्यांत भारतीय होत होते व हिंदूंच्यांत मिसळून जात होते. बौद्ध व जैन हे संप्रदायहि कांहीं थोड्या अवकाशांतच परत अनेकदैवतवादावर पोंचले. खरें म्हणतां त्यांनीं अनेकदैवतवाद सोडला नव्हता. पण त्याच्या जोडीला गुरुमहात्म्य आणून बसवलें. खिस्ती व इस्लामी एकेश्वरी वादानें व धार्मिक वेडानें हिंदूंना आपल्या निराळेपणाची पहिल्यानें जाणीव दिली. त्यांच्या केन्द्रित सुव्यवस्थित धर्मसंस्थेपुढें हिंदूंचा विकेन्द्रित अनेकदैवतवाद अव्यवास्थित व विस्कळित दिसूं लागला आणि बौद्ध आणि जैन संप्रदायांच्या प्रचारामुळें हिंदूंच्या कर्ममार्गाचें स्तोम कमी होऊन भक्तिमार्ग व गुरुमार्ग त्यांत शिरला व सबंध धर्मसंस्था जरी केन्द्रित झाली नाहीं तरी निरनिराळ्या देशांत निरनिराळे केन्द्रित पंथ निर्माण झाले. त्यांतील बरेच आजतागायत कायम आहेत.

महाराष्ट्राचा इतिहास पाहिला तर असें दिसून येतें कीं, शातवाहनां-पासून तो यादवांपर्यंतच्या सर्व राजांनीं निरनिराळ्या पंथाला आश्रय दिलेला आहे. खिस्तपूर्व ३०० ते खिस्ताब्द ५०० पर्यन्तचीं मध्य महाराष्ट्रांतील

धार्मिक मंदिरें म्हणजे फक्त बौद्ध लेणींच शिल्लक उरलीं आहेत. उत्तरेला वाकाटकांच्या कारकीर्दीत मात्र गुप्त स्थापत्य पद्धतीनें बांधलेलीं देवालयें व त्यांचे अवशेष रामटेकला सांपडतात. शातवाहन हालाच्या सप्तशतींत गौरी मंदिराचा उल्लेख आहे, पण त्याकाळचें एकहि हिंदू मंदिर शिल्लक नाहीं. त्यावेळचे शातवाहनांचे शिलालेख आहेत त्यावरून ते राजे स्वतः यज्ञयाग करणारे वैदिक संस्कृतीचे अभिमानी होते असें दिसतें. शात-वाहनांमागून आलेले, वराहचिन्ह धारण करणारे, चालुक्य राजे वैष्णव होते. त्यांच्या अंमदानींत वैष्णव लेणीं बदामीला कोरलीं गेलीं. पण त्यांच्याच राण्यांनीं व इतर वल्लभस्त्रियांनीं पट्टदकल, ऐहोळे व महाकूट येथें मोठमोठीं सुंदर शिवालयें बांधलीं. त्यांच्या मागून आलेल्या राष्ट्रकूट राजांनीं वेरूळ येथें ब्राह्मणी लेणीं कोरवलीं. त्यांत दोन वैष्णव असलीं तरी बाकीचीं सगळीं शैव आहेत. राष्ट्रकूटांच्या मागून आलेल्या यादवांचीं थोडीशीं देवळें चांगल्या अवस्थेंत व बरींच भग्नावस्थेंत महाराष्ट्रांत सर्वत्र विखुरलेलीं आहेत. पण त्यांतीलही बहुसंख्य शिवालयें आहेत. यादवांच्या अमदानींतील उत्कृष्ट देवळें म्हणजे सिन्नरचें आयेश्वराचें व खिद्रापूरचें कोपेश्वराचें मंदिर. त्याचप्रमाणें शिलाहारांचें अंबरनाथचें देऊळ व पूर्व व पश्चिम खानदेशांतील कांहीं देवळें शिवाचींच आहेत. वैष्णव लेण्यांतून मुख्यत्वें महावराह, नरसिंह, वामन, व वामनाचेंच स्वरूप जें त्रिविक्रम तीं दिसतात. एके ठिकाणीं अनंतशायी आहे. या मूर्ति भव्य व डोळ्यांत भरतील अशा कोरलेल्या आहेत. कृष्ण चरित्रांतील प्रसंग लहान लहान कोरलेले आहेत. पण कृष्णमूर्ति कोठेंच नाहीं. एकदोन ठिकाणीं कालियामर्दन व मुरलीधर कृष्णाचीं रूपें आहेत. पण तीं मध्य-युगाच्या उत्तर कालांतील देवालयांतून आहेत. बांधलेल्या मंदिरांच्या आधींचीं, पण ब्राह्मणी लेण्यांच्या मागून घडवलेलीं, जैन लेणीं महाराष्ट्रांत वेरूळ, चाम्हारलेणीं, अनकाई येथील प्रसिद्ध आहेत. पण जैन धर्म असा दक्षिण महाराष्ट्रांतच टिकून आहे. राष्ट्रकूट राजे जैनांचे अभिमानी होते व नवव्या शतकापासून त्यांनीं जिनसेन व भद्रबाहू ह्या प्रख्यात जैन साधूंचें शिष्यत्व पत्करलें होतें. जैनांचें आदिपुराण व पुष्पदंताचें हरिवंशपुराण हे ग्रंथ त्यांच्याच आश्रयामुळें लिहिले गेले. या राजाची राजधानी

मान्यखेट येथें होती ब जैन धर्माचा प्रसार कर्नाटकांत ब दक्षिण महाराष्ट्रांत जितका झाला तितका इतरत्र झाला नाहीं. त्यांच्या उत्तेजना-मुळें जैन महाराष्ट्री कर्नाटकांत घुसली ब त्यामुळेंच "श्री चाउंडराये करवियले" हा मराठी शिलालेख श्रवणबेळगोळा येथील गोमतेश्वराच्या मूर्तीवर कोरला गेला असें म्हटल्यास बावगें होणार नाहीं. कांहीं अपवाद सोडल्यास महाराष्ट्रांत बुद्धसंप्रदायाचा लोप फार प्राचीन काळीं, साधारण-पणें सातव्या शतकापर्यन्त झाला.* बौद्ध आपलीं लेणीं कोरीत असतांनाच इतर हिंदू दैवतें महाराष्ट्रांत होतीं ह्याबद्दल शंका नाहीं. लेण्यासाठीं लोक दानें देत होते, जमिनी देत होते; राजेहि मदत करत होते. "राहूं देत बिचारे भिक्षू" अशीच ती भावना असावी. पण त्यांचीं दैवतें मात्र निराळीं होतीं. मुख्यत्वें शिव व देवी हीं महाराष्ट्राचीं मूळपासूनचीं व रंकापासून रावापर्यन्तचीं दैवतें आहेत. त्यांच्याच पोटीं कार्तिकेय स्कंदाचें स्वरूप खंडोबा ह्याचा व गणपतीचा उदय झाला. खंडोबाची व गणपतीची पूजा मात्र बरीच अलीकडची दिसते. महाराष्ट्रांतील वैष्णवपंथाची सुरुवात नाथ-पंथापासून झाली असावी असें दिसतें. त्यामुळें रामानुज व माध्व यांच्या मतांपासून व त्यांतील भांडणापासून महाराष्ट्र अलिप्त राहिला. मानभावांचा कृष्णपंथ गुजरातेंतून महाराष्ट्रांत आला. त्यांत जैनधर्माचे कांहीं आचार व तत्वें दिसतात. मानभावांच्या विस्ताराचा प्रदेश मोठा असला तरी तो एकांगीपणामुळें व मूर्तिपूजेच्या धिक्कारामुळें महाराष्ट्र-परंपरेंत बसला नाहीं व उत्कृष्ट लेखकांची जोड मिळूनहि लोकप्रिय झाला नाहीं. या पंथांत गुरुपरंपरा ब गुरुभक्ति पराकोटीला गेलेली दिसते. "यानि अस्माकं सुचरितानि गृहीतव्याणि नो इतराणि" ही भाषा जाऊन गुरुभक्ति संपूर्णतया आंधळी झाली व दैवताची पूजाअर्चा जाऊन त्या जागीं गुरु जिवंत असतां गुरूची पूजा व त्याच्या प्रयाणानंतर त्याच्या पादुकांची पूजा व पीठाधिपतींची पूजा असा प्रघात सुरू झाला. महानु-

* कान्हेरी येथें दहाव्या व अकराव्या शतकापर्यंत बुद्ध लेण्यांत पूजा चालत असे. राष्ट्रकूटांच्या एका राजानें (इ. स. ८५० मध्यें) बुद्ध धर्माचा अंगीकार केला होता.

भाव पंथांतहि अद्वैतवाद आहे, पण कृष्णपूजेपुढें व गुरुपूजेपुढें त्याचा लोप झाला.

विठ्ठलभक्तीवर आधारलेला वारकरी संप्रदायहि गुरुप्रधान आहे. गुरु-मुखाशिवाय व गुरूच्या अनुग्रहाशिवाय दैवताची भाक्ति करतां येणें शक्य नाहीं असें ते मानीत, असें दिसतें. गुरूचें स्तोम नाथपंथीयांत विशेष होतें हें मच्छिंद्रनाथ गोरखनाथादींच्या आख्यानावरून स्पष्ट होतें. बरेचसे विठ्ठल भक्तहि नाथपंथीय होते पण नाथपंथीयांनीं अमकाच गुरू केला पाहिजे असा निर्बंध दिसत नाहीं. केलेल्या गुरूची परंपरा आदि-नाथापर्यन्त पोचली म्हणजे झालें, या न्यायानें ज्ञानदेवांचे गुरू त्यांचे बंधु निवृत्तिनाथ होते व ज्ञानदेवांची त्यांचेबद्दलची भावना नुसती गुरूचीच नसून मातापित्यांबद्दल असावी तशी होती, हें ज्ञानेश्वरीच्या दर अध्यायांत प्रत्ययास येतें. गुरु करणें व गुरुमंत्र घेणें हे दोन महत्त्वाचे विधि होते व त्यांत बरीच गुप्तताहि होती. पण खोटा देखावा व लबाडी दिसेल तेथें झोडावयाचें ह्या न्यायानें संप्रदायांतील या दोन गोष्टींवर टीका करून महा-राष्ट्रांतील परमवैष्णव श्री तुकोबारायांनीं या दोन्हींतूनहि मार्ग काढला. तुकोबांना प्रत्यक्ष गुरु कोणीच नव्हता. त्यांच्यावर स्वप्नांत अनुग्रह झाला होता तो व त्यांना मिळालेला गुरुमंत्र हे त्यांनीं उघड करून सांगितले.

कोण जपतप वाहे हे कावाड । म्हणती अवघड या रे नाचो ।।
उघडी समाधि हरिकथा सोहळा । नरनारी बाळा । लहानथोरे ।।....
सुलभ हा मार्ग सांपडला ।। इत्यादि

कोठच्याहि गोष्टींचें अवडंबर माजवावयाचें याचा त्यांना अतिशय तिटकारा, म्हणून त्यांनीं भाक्तिसंप्रदायांतील या दोन गोष्टींचें स्तोम नाहींसें केलें. अजूनहि गुरु करणें व माळ घेणें हे दोन विधी आहेत. पण त्यांतून गुरुमहात्म्याची निष्पत्ती न होतां विठ्ठलाच्या भक्तीची निष्पत्ती होते.

महाराष्ट्रीय वैष्णवांनीं ( विशेषतः ज्ञानेश्वर व तुकाराम महाराजांनीं ) निरनिराळ्या दैवतांच्या पाठीमागें लागणाऱ्या लोकांची निर्भर्त्सना व चेष्टा केली आहे, ती अनेकदैवतवाद अमान्य म्हणून नव्हे तर कोणत्याहि एका ठिकाणीं चित्त स्थिर न करतां लोभाला बळी पडून, निरनिराळ्या दैवतांची

मोठ्या अटीतटीनें आराधना करण्यानें कोणतेंच दैवत साधत नाहीं व परमात्म्याशीं ऐक्य साधण्यास लागणारी समाधी—मनःशांति—लाभत नाहीं म्हणून होय. आजहि महाराष्ट्रांत सर्व लोक, मग ते वैष्णव असोत वा नसोत, महाएकादशी व महाशिवरात्र दोनहि उपवास पाळतात. असें करण्यांत आपण आपल्या विठ्ठलाला बेइमान होत आहों असें त्यांना वाटत नाहीं. सगुण विठ्ठलाची भक्ति करतां करतां ते अद्वैतावर येऊन ठेपतात व दैवतवाद व अहं ब्रह्मास्मि यांची जुनी भारतीय संगती कायम ठेवतात.

तिसरी गोष्ट म्हणजे या नव्या पंथाच्या निर्मितींत महाराष्ट्रांतील सर्व जमातींचा हात असल्यानें तो सर्वांचा पंथ आहे. महाराष्ट्रांतील दैवतें सर्वांचीं आहेत. गुजरातेंतील किंवा त्याहीपेक्षां दक्षिणेकडील कडक सोवळीं वैष्णव मंदिरें पाहिलीं म्हणजे, एका अंत्यजाखेरीज इतर सर्वांना जाऊन विठ्ठलाच्या पायावर डोकें ठेवायला मिळत असे याचें आश्चर्य वाटलें पाहिजे. विठ्ठलपंथ गोरगरिबांचा आहे हें पुढील ओवींत स्पष्ट केलें आहे. गिरीवरला देव द्रव्याचा लालची। दयाळू पांडुरंग तुळशी बुक्यान संतोषी॥ वारकरी ब्राह्मण असो वा मराठा असो, एकमेकाला बरोबरीच्या नात्यानें भेटूं शके हें काय कमी आहे? महाराष्ट्रीय वैष्णव पंथाचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे तो विठ्ठलनिष्ठ आहे. त्यांत राधेला स्थान नाहीं. गुजरातेंतील वल्लभपंथांत भक्त व देव यांचें नातें प्रिया व प्रियकर यांच्या नात्यासारखें समजलें जातें. बंगाल व ओरिसांतील वैष्णव संत जो चैतन्य त्याचें काव्य जरी या धर्तीवर नसलें तरी त्याच्या संप्रदायांत राधेला फार महत्त्व आहे. त्याचे परमशिष्य रघुनाथदास व रूप गोस्वामी यांच्या काव्यांत तर या पंथाची व त्यांतील विशिष्ट मनोवृत्तीच्या आविष्काराची परिसीमा झाली आहे. हे संतवर स्वतःस राधेची दासी मानतात, व दासी म्हणून राधेच्या शृंगारांत जें कृष्णरूप दिसतें त्यांतच स्वतःला धन्य समजतात. रघुनाथदासाच्या स्तवावलींत कृष्णाची भक्ति नसून राधेचीच आहे असें दिसतें. "भजामि राधां अरविंदनेत्राम्। स्मरामि राधां मधुरस्मितास्याम्। वदामि राधां करुणाभरार्द्राम्। ततो ममान्यास्ति गतिर्न कापि॥" त्यांचा भक्तिमार्ग सख्याचा नसून दास्याचा—राधादास्याचा होता.

पादाब्जयोस्तव विना वरदास्यमेव। नायात् कदापि समये किल देवि याचे।
सख्याय ते मम नमोस्तु नमोस्तु नित्यम्। दास्याय ते मम रसोस्तु रसोस्तु सत्यम्॥
राधेच्या निरनिराळ्या शृंगाराचें वर्णन ह्या स्तोत्रांतून आहे, व राधेची दासी म्हणून तिच्या अंगावर भूषणें चढवण्यांत, तिचा शृंगार करण्यांत, तिची दूती म्हणून जाण्यांत स्वतःला किती धन्य वाटेल ह्याचें वर्णन आहे. उत्तरेकडचे कांहीं वैष्णव स्वतःस राधा समजून स्त्रीप्रमाणें शृंगार करण्यांत धन्य मानतात. जगन्नाथाच्या मंदिरांत रोज रात्रीं दोन वाजतां देवाच्या शयनप्रसंगीं जयदेवाच्या गीतगोविंदांतील उत्कृट शृंगारमय अभिसारिका-गीतें म्हटलीं जातात. " निभृत निकुंजगृहंगतया निशि रहसि निलीय वसन्त " अशी सुरुवात व " सखि हे केशीमथनमुदारं। रमय मया सह मदन मनोरथ भावितया सविकारम्॥" हें ध्रुपद आहे. वऱ्हाडांत एक अंध साधुपुरुष होऊन गेले. ते स्वतःस कृष्णाची प्रिया समजून कृष्णाचे नांवें हातांत कंकणें व गळ्यांत मंगळसूत्र बांधीत असें ऐकिलें आहे. महाराष्ट्रांत हा राधासंप्रदाय शिरला नाहीं. प्रत्यक्ष रुक्मिणीसुद्धां विठोबाच्या शेजारीं नाहीं व भक्तांनीं देवाला स्त्रीचीं बिरुदें लावलीं पण तीं मातेच्या नात्याचीं. पतिपत्नीविषयक, प्रियावल्लभविषयक रूपकें अधून मधून सर्व संतकवींच्या काव्यांत येतात. पण तीं फार थोडीं आहेत. भक्ताची आर्तता बालकाच्या मातेविषयींच्या आर्ततेनेंच प्रगट करण्याची रूढी सर्वांमध्यें दिसून येते. " तूं माझी माउली, मी गे तुझा तान्हा, पाजी प्रेमपान्हा " हें वळणच मराठी संतांना जास्त रुचतेसें दिसतें. बायकांच्या ओव्यांतही पंढरपूर माहेर, विठोबा रखुमाई मायबाप, अशीच भावना दृष्टीस पडते.

मराठी लोकांचा त्यांच्या देवतांशीं काय संबंध आहे असें कोणी विचारलें तर त्यांना पुण्यांतील देवतांची यादी दाखवतां येईल. भांग्या मारुती, सोट्या म्हसोबा, खुन्या मुरलीधर, निवडुंग्या विठोबा, पिवळी जोगेश्वरी, लाल जोगेश्वरी, अशा तऱ्हेचीं विचित्र बिरुदें असलेली देवमालिका आढळेल. ह्यांत त्या देवतांचा अपमान करण्याचा हेतु नाहीं. हीं देवाला लावलेलीं फक्त आडनांवें आहेत. एकाच आडनांवाचे लोक नाहींत कां निरनिराळ्या युक्त्यांनीं आपण निरनिराळ्या घराण्यांतले वा गांवाचे आहोंत

हें दर्शवीत ? त्यांतीलच हा प्रकार. पावसकर जोशी, टोकेकर जोशी, अशीं नांवें नसतात कां ? मग त्याच त्याच नांवांच्या निरनिराळ्या आळींतील दैवतांना अशीं आडनांवें देण्यांत बिघडलें काय ? मनुष्य आणि देव यांची जी सनातन गट्टी हिंदुधर्मात आहे त्याचेंच हें निदर्शक आहे. विठोबाला निबडुंग्या म्हटलें तरी तेथें जी गर्दी लोटते ती पाहिली म्हणजे लोकांच्या भक्तीबद्दल शंका येत नाहीं. " चोखा जरी डोंगा । भाव नव्हे डोंगा । कां भुललासी वरल्या सोंगा । " हेंच खरें. म्हणूनच विठ्ठलाला भक्तांच्या किती तरी लाडक्या शिव्या सोसाव्या लागतात. पण त्यामुळें भक्तीला बट्टा लागत नाहीं. जातिसंस्थेमुळें समाजाला जरी विस्कळितपणा आला असला तरी महाराष्ट्राच्या सुदैवानें अजून मराठी वाङ्मय, मराठी संत व मराठी दैवतें सर्वांचीं आहेत. मराठी ब्राह्मण अजून आपली वेदशाखा सांगतात हीहि गोष्ट जुन्या संस्कृतीची अव्याहत परंपरा दर्शवते.

महाराष्ट्रांतील वैष्णवपंथांतील भक्तिमार्ग किती डोळस आहे, बुद्धि-योगाची बैठक किती बळकट आहे व सगुण निर्गुणाच्या संबंधाचें मत किती स्पष्ट आहे हें कोणत्याहि संताचें काव्य पाहिलें तरी दिसून येईल.

" ओम् " या परमपवित्र अक्षराचा जप करण्यास ज्ञानेश्वर सांगतात, तेथें त्या शब्दाचें विवरण म्हणजे बुद्धिविलासाची परिसीमा आहे.

उपजालिया बाळकासी । नांव नाहीं तयापासी । ठेविलेनी नांवेसी । ओ देत उठी ।। कष्टले संसारशिणे । जे देवो येतां गाऱ्हाणें । तयां ओ दे नांवें जेणें । तो संकेतु हा ।। ब्रह्माचा अबोला फिटावा । अद्वैतु द्वैतत्वें भेटावा । ऐसा मंत्रु देखिला कणवा । वेदे बापें ।।

द्वैतअद्वैत, सगुण, निर्गुण, एक ब्रह्म व अनेक दैवतें ह्या सर्व मुद्यांना या तीन ओव्यांत जें समर्पक उत्तर आहे, तें मला तरी कोठल्याहि तत्त्वज्ञान-विषयक ग्रंथांतून आढळलें नाहीं. हाच अर्थ थोड्या निराळ्या तऱ्हेनें खालच्या ओवींत प्रकट केला आहे.

जी विश्वरूपाचिया सागरी । होतो तरंग भावित बांवेवरी । तो इथें निजमूर्तिच्या तीरीं । निगालों आतां ।।

स्वतःचे पूर्वज ते देव इथून सुरुवात होऊन अहं ब्रह्मास्मि या पायरी-

पर्यंत भारतीय धर्म व तत्वज्ञान येऊन ठेपलें. देव व आपण हा भेद व हें द्वैत प्रासंगिक आहे; या भूमिका पालटूं शकतात, हें तुकाराम महाराजांनीं फारच स्पष्टपणें दाखवलें आहे. आम्ही मानतों म्हणून देवाचें देवत्व हें ते बजावून सांगतात.

आमुचेनि भावे तुज देवपण । ते कां विसरोन राहिलासी ॥

देवाशीं नातें दोन्ही तऱ्हेचें असतें.

तुझे पाय माझे भाळ । एकत्रता सर्वकाळ ॥ हेचि देई विटाबाई । पांडुरंगे माझे आई ॥

हें म्हणणारे संतश्रेष्ठच

माझे पाय तुझी डोई । ऐसे करी गा भाक देई ॥

असें म्हणूं शकतात !

त्याचप्रमाणें " दैवाच्या संबंधें विश्वाचि सोयरें " या अभंगांतील विश्वाशीं एकात्मता " Fatherhood of God and Brotherhood of Man " ह्या ख्रिस्ती वचनानें भाषांतर करण्यासारखी नाहीं. ख्रिस्ती धर्मांत येशू आज्ञा करणारा बाप रहातो. मानव चुका करणारीं मुलें राहतात; मानवाव्यतिरिक्त सृष्टीला या धर्मांत मुळीं जागाच नाहीं. देव–मानव हें द्वैत कायम रहातें. एवढेंच नव्हे तर तो सेव्यसेवक भावहि शेवटपर्यंत रहातो. व म्हणूनच स्वर्गाची पोरकट कल्पना प्रामुख्यानें पुढें येते. सबंध ख्रिस्ती धर्म मुळीं स्वर्गनरकाच्या, देवसैतानाच्या द्वंद्वाचें विवरण करण्यासाठीं सांगितला आहे.

तुकारामबुवांचें खालील वचन म्हणजे तत्वज्ञानांतील एका गहन प्रश्नाला थोडक्यांत दिलेलें उत्तर आहे. अद्वैत मतांत जगांतील सुखदुःखें, पापपुण्य ह्यांना स्थान काय, हा तो प्रश्न आहे. विश्व सोयरें होतें, तें कौटुंबिक नात्यानें नव्हे, तर स्वतःच विश्व झाल्यामुळें. " जीवजीवीं देखे सामावले " आणि त्यामुळें " आणिकांचें सुखदुःख उमटतें अंतरीं. " ही परदुःखाची जाणीव कल्पनेवर आधारलेली नसून तें दुःख स्वतःचें होतें, अंतरीं उमटतें, म्हणून ती जाणीव स्वानुभूतीची आहे.

जगांत कोणी दुष्ट असतात, कोणी चांगले असतात हें तरी तारतम्य अशा अवस्थेंत कोठून रहाणार ? ज्या प्रश्नाचा उहापोह करावयाला खुद्द शंकराचार्यांना सबंध मायावाद समजावून सांगावा लागला, तो प्रश्न तुकाराम महाराजांनीं चुटकीसरसा रोजच्या बोलभाषेंत विशद केला आहे.

नाहीं मज कोणी उरला दुर्जन । मायेबापाविण ब्रह्मांडांत ॥

अशा तऱ्हेनें मराठी वैष्णव संप्रदाय थेट उपनिषदांच्या भूमिकेवर जाऊन पोंचतो. त्यामुळें सांप्रदायिक भांडणें, निरनिराळ्या मठांचें प्राबल्य व शैववैष्णवांचें वैर ह्याला त्यांत थारा नाहीं.

महाराष्ट्राचें आणखी एक आवडतें दैवत म्हणजे मारुती. देशावरील प्रत्येक खेड्यांत मारुतीचें देऊळ असतेंच. पुरुषांच्या नांवांतहि हणमंत व मारुती हीं दोन्हीहि नांवें आढळतात. कर्नाटकांत हणमंताप्पा हें नांव आढळतें; 'मारुती' नांव मला आढळलें नाहीं, पण उत्तर कर्नाटकांत असण्याचा संभव आहे. तामिळनाड, आन्ध्र व केरळांत हीं नांवें सांपडत नाहींत. मारुतीची पूजा बरीच अलीकडील दिसते. आठव्या नवव्या शतकानंतर रामपूजा दक्षिणेकडे आली; त्याबरोबरच मारुतीची पूजा पण आली असल्याचा संभव आहे. रामाच्या देवळांत मारुतीची मूर्ति आढळते, पण मारुतीचीं स्वतंत्र देवळें महाराष्ट्राबाहेर आढळत नाहींत. रामदासांनीं ठिकठिकाणीं मारुतीची स्थापना केली व ब्रह्मचर्य व शरीरसामर्थ्य ह्या दोन गुणांमुळें हा देव तरुणांना आदर्श म्हणून पुढें ठेवला. हा विशेषतः तालीमबाजांचा देव आहे. उत्तरेस मारुतीची स्वतंत्र पूजा नसली तरी रामसेवक म्हणून त्याला विशेष मान आहे. उत्तरेकडे कित्येक गांवांतून रामनवमीच्या उत्सवांत हनुमानध्वजाची मोठी मिरवणूक काढतात. ह्या मिरवणुकींत दक्षिण बिहारांतील रांची गांवांत हिंदुमुसलमानांचा मोठा दंगा झाला होता. हनुमानध्वज हा बऱ्याच राजघराण्यांचाही ध्वज आहे. त्यांतील अति प्रसिद्ध घराणें भरतपूरच्या जाट राजाचें आहे. मुसलमानांच्या मध्ययुगीन आक्रमणाला हिंदूंनीं जेव्हां तोंड दिलें त्या सुमारास हनुमान-पूजा विशेष जोरानें फैलावली असें दिसतें. महाराष्ट्रांत बिचाऱ्या हनुमानाकडे खेड्यांतील रखवालदारीचें काम दिलेलें स्त्रीगीतांतून आढळतें : माझ्या

दारावरनं कोण गेलं झपाट्यानं । मारुतीराया गस्त घाली मुकाट्यानं ।।
त्याचप्रमाणें खालील ओवींत मारुतीचें देऊळ वेशीवर असतें तें दाखवलें आहे : वेशीच्या दारीं उभा, वेशीबाई तूझा कंथ । अंगीं शेंदूराची उटी, नांव त्याचें हणमंत ।।

मध्ययुगीन भक्तिमार्गी लोकांनीं रचिलेलीं पद्यें व प्रबंध इतर भाषांतहि अमाप आहेत. तीं सर्व भावमधुर आहेत. पण बुद्धीचें हें प्रौढत्व, हिंदु तत्वज्ञानाचें गाढ व दृढ अधिष्ठान, त्यांत कोठेंहि दिसून येत नाहीं. ज्ञानदेवांनीं पाया रचला व तुकारामांनीं कळस बांधला. एकदां जी परंपरेला सुरुवात झाली, त्यांत कोठेंहि खंड पडला नाहीं. विशेष आश्चर्य म्हणजे बुद्धीची ही घट्ट पकड एकाच जातींत होती असेंहि नाहीं. मराठा, कुणबी, ब्राह्मण, शिंपी, स्त्रिया, कुणीहि या पंथापासून ढळलें नाहीं. महाराष्ट्रीय वैष्णवांनीं महाराष्ट्रांत समतेचा पाया घातला. ती समता खालच्या थरावरची नसून सर्वांना हिमालयाच्या उंचीवर नेऊन साधलेली आहे. कविश्रेष्ठ रवीन्द्रनाथांची गीतांजलि जगद्वंद्य झाली आहे. पण त्यांत एकहि असा तत्वविषयक विचार नाहीं, कीं जो ज्ञानदेवांनीं किंवा तुकाराम महाराजांनीं सांगून टाकलेला नाहीं. आणि भाषेच्या दृष्टीनें पाहिलें तर रवींद्रनाथांच्या नटव्या, संस्कृत–प्रचुर भाषेपेक्षां मराठी कवींची बोली कितीतरी पटीनें सहजसुंदर व भावमधुर आहे. सर्वच कविश्रेष्ठ आहेत. त्यांची तुलना करण्याचें हें स्थळ नव्हे, पण सांगण्याचा हेतू हाच कीं विचारांची प्रौढता व बुद्धीचा प्रखरपणा मराठीच्या अमर वाङ्मयांत पहिल्यापासून आढळतो. ही सांस्कृतिक ठेव जतन करून ती परंपरा जागृत ठेवण्याचें काम पुढील पिढ्यांचें आहे.

उत्तरेकडे बहुजनसमाज अनेकदैवतवादी आहे. पण अगदीं अलिकडल्या काळांत जे पंथ निघाले ते सर्व मूर्तिपूजनाला विरोध करणारे आहेत. देवाला जो मान द्यावयाचा त्याचे पंथसंस्थापक हेच धनी होतात. गुरुपरंपरा पण बळकट आहे. ब्राह्मण वेदशाखेवरून स्वतःचें वर्गीकरण न करतां प्रदेशावरून करतात. जसें कनोजिया, शरयूपारिन्, शाकद्वीपिन् , राढीय ब्राह्मण, वगैरे. गुजरातेंत वैष्णवांनीं जैनांचा प्रसार थांबवून जुन्या हिंदु-

धर्माचें पुनरुज्जीवन केलें. गुजरातेंतील वैष्णव पंथ हा नागर संस्कृतीचें प्रतीक बनला. वैष्णव देवालयें अतिशय मातब्बर आहेत व तेथें होणारें अन्न, वस्त्र व अलंकार यांचें प्रदर्शन डोळे दिपविणारें असतें. देवालयांतील मूर्तीपर्यन्त कोणासच जातां येत नाहीं. गुरूंचींहि पीठें आहेत व तींहि मातब्बर असून गुरु राजविलासांत रहातात. पण गुजरातेंत वैष्णवांचें शिवाशीं भांडण नाहीं. शिव हा आजहि बहुजनसमाजाचा देव आहे. त्याचप्रमाणें गुजरातेंतील क्षत्रिय जे रजपूत त्यांचाहि तो देव आहे. शिवाप्रमाणेंच मातेचीं मंदिरेंहि प्रसिद्ध आहेत. शिवपंथी मठ किंवा गुरु प्रसिद्ध नाहींत. कांहीं बोवा असतात, पण त्यांचें महत्त्व स्थानिक असतें.

कर्नाटकांतील इतिहास फारच निराळा आहे. कर्नाटकांतील पहिले चालुक्य जरी वैष्णव होते तरी त्यांनीं व त्यांच्या राण्यांनीं शिवमंदिरें बांधलीं हें आपण पाहिलेंच. राष्ट्रकूट शिवभक्त होते, तसेंच त्यांच्यांतलि कांहीं जैन होते. चालुक्य घराणें पुन्हां गादीवर आलें तेंहि जैनांना आश्रय देत. चालुक्यांना मारून त्यांच्या गादीवर बसणाऱ्या कलचुर्य बिज्जलाच्याच वेळीं वीर बसवानें लिंगायत शैव धर्माची पुनः जोरानें प्रतिष्ठापना केली. ह्यावेळीं लिंगायत धर्मानें मुख्यत्वें जैन धर्माला उत्तर कर्नाटकांतून हुसकून लावलें. पूर्वीचे जैन वाणीच आजचे लिंगायत वाणी असावेत असें वाटतें, व पिंडानें उत्तरेकडील बृहन्मस्तकीयांत त्यांचें स्थान आहे अशी शंका येते. जैन धर्मांतले आचार लिंगायतांतहि दिसून येतात. त्यांतहि मांस-भक्षणाचा निषेध हें अंग मूळचें शैवसंप्रदायांतील नसून तें जैनांपासून उचललेलें दिसतें. लिंगायत लोक शंकराचें प्रतीक जें लिंग तेवढयाचीच पूजा करतात. मूर्तिपूजा त्यांना मान्य नाहीं. त्याचप्रमाणें लिंगायत धर्माचें व आचाराचें स्वरूप कायम ठेवण्यासाठीं त्यांच्या गुरूंचे मठहि ठिकठिकाणीं आहेत. ह्या गुरूंचें उत्पन्न मोठें असतें. त्यांना लिंगायत धर्मांत वजनाहि खूप असतें व हल्लींच्या युगांत शिक्षणसंस्था उभारणें, गरीब विद्यार्थ्यांना वसतिगृहें काढून फुकट जेवण्याची सोय करणें वगैरे पुष्कळ समाजोपयोगी कार्यें त्यांच्या हातून झालीं आहेत. पण हिंदूंचा जुना अनेकदैवतवाद पार लोपला असून सांप्रदायिक भावना कडवी व आचारपालन ( उदा. लिंगधारण ) कडक

असें आहे. याच कर्नाटकांत रामानुज व माध्व यांनीं मध्ययुगाच्या शेवटीं अगदीं अलीकडे दोन निरनिराळ्या वैष्णवपंथांची स्थापना केली. ह्या पंथांचीं गुरुपीठेंहि आहेत व तेही गुजरातेंतील गुरूंप्रमाणें मातबर आहेत. होयसळांनीं बांधलेलीं हाळेबीड व बेलूर येथील सुंदर मंदिरें ह्याच पंथाचीं आहेत. ह्या पंथाचा मुख्य प्रसार ब्राह्मणांत झालेला आहे व ह्या पंथांतील कट्टरपणामुळें कर्नाटकांत शैव व वैष्णवांचें व वैष्णवांच्या निरनिराळ्या पंथांचें तात्त्विक व खरोखरीचें चांगलेंच भांडण आहे. हीं रणें केवळ शाब्दिकच नसतात. “ प्रतिवादि भयंकर मठ ” अशा नांवामध्येंच फक्त न रहातां त्यांत डोकींहि चांगलींच फुटतात व सामाजिक तेढहि त्यामुळें भयंकर वाढलेली आहे. एकमेकांच्या दैवतांना तुच्छ लेखणें, त्यांची चेष्टा करणें, शिवरात्रीच्या दिवशीं मुद्दाम पुरणपोळीचें जेवण जेवून विडा खाणें, एक ना दोन, शैव व वैष्णव म्हणून एकमेकांना डिवचण्याचे जेवढे प्रकार होणें शक्य आहे तेवढे होतात. ब्राह्मण अब्राह्मणांचें भांडण केवळ आर्थिक जीवनांत न रहातां धार्मिक तेढीचीहि त्यांत भर पडली आहे. एकेश्वरी पंथाच्या प्रसाराचीं बरींवाईट सर्व साधनें प्रत्येक पंथाचे लोक वापरतात. ब्राह्मणांच्या सोवळ्याची परिसीमा व लिंगायतांचा ब्राह्मणद्वेष पाहिला म्हणजे मनाला फार विषाद वाटतो. दक्षिणेंतहि ब्राह्मण आपली वेदशाखा न सांगतां मठाचें नांव सांगतात किंवा वैष्णव, श्रीवैष्णव, असें सांगतात व ह्याहि बाबतींत जुनी पद्धत फक्त महाराष्ट्रांतच राहिली आहे असें दिसतें. ब्राह्मणांचे किंवा वैष्णवांचे गुरु प्रगमनशील दिसत नाहींत. स्वतःच्या उत्पन्नाकडे व बडेजावाकडे त्यांचें जितकें लक्ष आहे तितकें समाजहिताकडे नाहीं. संस्कृत भाषेचा अभ्यास परंपरागत होतो. अर्वाचीन दृष्टिकोन त्यांत नाहीं. वैष्णव-शैव वाद तुटलाच तर कांहीं प्रगमनशील लिंगायतांकडूनच तुटेल असें वाटतें.

ही परिस्थिति पाहिली म्हणजे महाराष्ट्रांत अनेकदैवतवादाची जुनी परंपरा अविच्छिन्न आहे हें उघड होतें. शिव व देवी हीं आजहि बहुसंख्य महाराष्ट्रीयांचीं कुलदैवतें आहेत. गुरुपरंपरा असूनहि सबंध समाजच्या समाज अमक्या एका पीठाचा अशी अवस्था अजून झाली नाहीं व

कोणतींहि मंदिरें गुजरात-कर्नाटकाप्रमाणें गुरुपीठांचीं नसल्यामुळें त्यांना बहुजनसमाजाला विन्मुख होऊन चालणार नाहीं. ब्राह्मण-अब्राह्मणांचें भांडण तुटण्याची व सबंध महाराष्ट्र एकसंघ होण्याची शक्यता अजूनहि आहे. बाकीच्या सांस्कृतिक वैशिष्ट्यांप्रमाणें महाराष्ट्राचा वारकरी पंथ ही अब्राह्मणांची निर्मिति आहे व वारकरी पंथाची आजतागायतची जोपासनाहि त्यांनींच केलेली आहे. ज्ञानेश्वरीवर प्रवचनें व तुकारामाचे चारित्रग्रंथ ब्राह्मणांनीं केलीं—लिहिलीं असतील पण ह्या संतकवींची जीवन-परंपरा अब्राह्मण वारकऱ्यांतच शिल्लक आहे. आपल्याला सुशिक्षित म्हणवणारा ब्राह्मणसमाज व इतर नागरजाती ह्यांच्या तोंडीं हें वाङ्मय खेळत नाहीं, त्यांच्या रोजच्या व्यवहारांत त्याचा उपयोग होत नाहीं. पण वारकऱ्यांचें तसें नाहीं. त्यांना तुकाराम व ज्ञानदेव ग्रंथांतर्गत नसून कंठांतर्गत आहेत.

## महाराष्ट्रांतील कला

महाराष्ट्रांतील कलेची परंपरा स्वतंत्रपणें अभ्यासण्यासारखी आहे. संस्कृतीचें वैशिष्ट्य व संस्कृतीचा मिलाफ कलांच्या क्षेत्रांत जितका दिसून येतो तितका इतर अंगांतून क्वचितच दिसतो. कलेचें एक अंग बुद्धिगम्य असलें तरी तिचा आविष्कार वस्तु किंवा द्रव्यावर फार अवलंबून असतो. आणि इतर सांस्कृतिक अंगांप्रमाणें वस्तु व कलात्मक भावना ह्यांचा एकमेकांवर परिणाम होत असतो. संघ-वादनाचा विलायतेंतील इतिहास पाहिला म्हणजे असें दिसून येईल कीं, संघ-वादन या प्रकाराची उत्पत्ति व वाढ एका विशिष्ट समाजांत झाली व ती संघ-वादनास उपयुक्त अशा वाद्यांचा विकास व यंत्रयुगीन समाजाच्या गरजा ह्यांवर अवलंबून आहे. ग्रीकांचें हार्प हें वाद्य, व्हायोलिन किंवा फिडल हीं वाद्यें, लहानशा समाजाला वाजवून दाखविण्यास पुरेशीं आहेत. वृंदवादनास निरनिराळीं बरींचशीं वाद्यें एकत्र करून वाजवावयाचीं असतात. प्रत्येकानें काय वाजवावयाचें व कधीं वाजवावयाचें तें कागदावर लिहून वाजवणाऱ्यांच्या पुढें असावें लागतें व सर्वांना ताल दर्शविणें, थांबण्याची जागा दाखविणें व नीट मिलाफांत ठेवणें हीं कृत्यें करण्यास एक गणनायक लागतो. ह्या

वादनांत वाद्यावर हुकमत व वृंदाशीं मिळवून घ्यावयाची कला मुख्यत्वें लागते. स्वतंत्र आविष्कारास फारसा वाव नसतो. फूर्टवेंग्लर सारखा गणनायक नुसता ताल दाखविणें व मिलाफांत ठेवणें एवढेंच कृत्य करून रहात नाहीं तर सबंध मिळून जें वादन असेल त्याच्या प्रत्येक वाद्यानें वाजवावयाच्या तुकड्यांत सबंध प्रबंधाचा आत्मा ओतीत असतो, तुकडे तुकडे न राहूं देतां त्यांना प्रबंधाच्या व्यक्तिमत्वांत स्थान देतो व त्यामुळें सौंदर्याचा आविष्कार होतो व प्रचीति येते. आपल्याकडे गायन व वादन या दोन्ही कला पहिल्यापासून व्यक्तिगतच राहिल्या आहेत. गायनामध्यें वा वादनामध्यें बांधून दिलेलें असें थोडें असतें व व्यक्तीची कुशलता व सौंदर्याची अनुभूति यांना अतिशय वाव असतो. सौंदर्याची प्रचीति व तिचा आविष्कार हीं दोन्ही अश्मयुगापासून आतांपर्यंत मनुष्याचे खास हक्क आहेत. सौंदर्याची प्रचीति स्वतंत्र अशी फारशी नसते. इतर सामाजिक मूल्यांप्रमाणें ती परंपरेच्या द्वारें नव्या पिढीला पोचते. त्याचप्रमाणें आविष्काराचे मार्गहि सामाजिक परंपरेनें ठरलेले असतात, सामाजिक संकेतानें बांधलेले असतात. संस्कृतीचें संक्रमण होत असतां संगम झाला म्हणजे, किंवा संघर्ष होत असतां नवीं मूल्यें, नव्या अनुभूति व नवनवे आविष्काराचे मार्ग निर्माण होतात व लौकरच त्यांना स्थायी स्वरूप येतें. परंपरा शब्दाचें कित्येकांना वावडें आहे. पण परंपरा हाच संस्कृतीच्या संक्रांतीचा एकमेव मार्ग आहे. परंपरेच्या धमनींतूनच संस्कृतीचा प्रवाह वाहत असतो. फक्त त्या धमन्यांचा लवचिकपणा कायम ठेवायचा, हें प्रत्येक पिढीचें कार्य आहे. नाहीं तर त्या कठीण होऊन हळुंहळूं प्रवाहाला अडथळा होईल व सांस्कृतिक जीवनच संपुष्टांत येईल. परंपरा आणि नाविन्य ह्यांची:क्रिया व प्रतिक्रिया, त्यांचा अनंतस्वरूपी आविष्कार, अवगत करून घेणें ह्यांतच संस्कृतीच्या अभ्यासाची अवीट गोडी सामावलेली आहे.

गायनांत बुद्धिविलासाला जास्त वाव आहे. महाराष्ट्रांत नामांकित गवयांची परंपरा फार जुनी नाहीं. महाराष्ट्रीय गायन उत्तरेच्या पद्धतीचें आहे, पण नामवंत घराणीं कर्नाटकाच्या सीमेवरचीं असल्यामुळें दाक्षिणात्यांच्या गायनपद्धतीची म्हणण्यापेक्षां दाक्षिणात्यांच्या रागांगांची कांहीं थोड्याशा

गाण्यांत चुणूक दिसते. पण गाण्याचा आत्मा उत्तरेकडचाच आहे. अर्वाचीन काळांत मराठ्यांच्या गायनाची परंपरा फार अभिमानास्पद आहे. पंजाब, युक्तप्रांत व बिहार यांमध्यें शुद्ध भारतीय गाण्याची पुनः स्थापना पलुस्करबुवांच्या हातून झाली. अजूनहि बुवांचें नांव त्या प्रांतांतून अत्यादरानें उच्चारलें जातें व बुवांच्या परंपरेंतील गायकांना असामान्य मान आहे. गुजरातेंत तर अगदीं परवां परवांपर्यंत गायन शिक्षक म्हटला म्हणजे तो मराठी असावयाचा असा नियम असे. दक्षिणेंतील गाण्याची परंपरा फार निराळी आहे. तेथें उत्तरेकडच्या पद्धतीचा शिरकाव होत आहे, पण दाक्षिणात्यांना आपल्या पद्धतीचा फार अभिमान आहे व ते आपली पद्धति टिकवतील असें वाटतें. गायनाच्या बाबतींत महाराष्ट्राची परंपरा दक्षिणेशीं मिळती नाहीं. गायनांत स्त्रियांनीं जें असामान्य यश मिळविलें आहे व पुरुषांशीं जी बरोबरी केली आहे ती मात्र दक्षिणी संस्कृतीच्या मिलाफामुळें झालेल्या समाजरचनेचें फळ आहे. वादनांत महाराष्ट्राचें स्थान उच्च नाहीं. सतार, सरस्वती वीणा, व रुद्र वीणा या तीनहि भारतीय वाद्यांत दाक्षिणात्य सर्व हिंदुस्थानांत अग्रेसर आहेत. दाक्षिणात्यांचें संगीत वाद्यांत जितकें खुलतें व हृदयाला जाऊन भिडतें तितकें तें गायनांत प्रभावी ठरत नाहीं. नृत्याच्या बाबतींत तर दाक्षिणात्यांचें अखिल भारतीय स्थान जगाला ठाऊक आहे. महाराष्ट्रांत नृत्याची परंपराच नाहींशी वाटते. मुलींचे मंगळागौरीचे फुगडी, झिम्मा वगैरे खेळ हे लोकनृत्याचे प्रकार शिल्लक आहेत. तसेंच कोंकणांत शिमग्याला व कृष्णाष्टमीला पुरुष नाचतात. पण एक कलाप्रकार म्हणून महाराष्ट्रांत नृत्याचें चीज झालें नाहीं. बेलूरच्या चन्नकेशवाच्या मंदिरांत एक सुंदर काळीभोर रंगशिला चारखांबी मंडपांत बसवलेली आहे. खांबाच्या टोकावर सरस्वती वीणाधारी कोरलेली आहे व छतावर अप्रतिम कोरीव काम आहे. ह्या काळ्याभोर रंगशिळेवर होयसळांची राणी देवासमोर नृत्य करीत असे असें म्हणतात. गायन व नृत्य हीं दोन्हीहि देवाच्या उपासनेचीं अंगें म्हणून दक्षिणेस अजूनहि समजलीं जातात. महाराष्ट्रांत ह्या उच्च नृत्यप्रकाराचा लोप झाला असें दिसत नाहीं. ती कला महाराष्ट्रांत रुजलीच

नाहींशी दिसते. पंढरपूरच्या विठ्ठलासमोर रंगशिळा आहे व त्यावर नाचावें व भजनांत मग्न व्हावें असा तुकारामबुवांचा अभंग पण आहे. पण हें नृत्य परंपरागत आलेली, परिश्रमपूर्वक शिकलेली कला नसून आनंदाच्या नैसर्गिक उमाळ्याबरोबर स्फुरलेली शरिराची हालचाल, यापलीकडे कांहीं दिसत नाहीं. आतां तर विठ्ठलाचें दर्शन घेतलें कीं भाविक लोक दोन्ही कान हातांत धरून रंगशिळेवर दोनतीन उड्या मारतात, स्वतःच्या गालांत मारून घेतात व बाजूला सरतात. होयसळांच्या राणीचें नृत्य व ह्या माकडउड्या एकाच वैष्णवी भक्तीचे दोन प्रकार आहेत.

नृत्य, कला म्हणून नाहीं, पण लोकसंस्कृतींत म्हणून मात्र महाराष्ट्रांत जिवंत आहे. वर लोकनृत्याचे कांहीं प्रकार सांगितले, त्यांतील लेजीम हा एक प्रकार आहे. नवऱ्या मुलाच्या मिरवणुकीपुढें, गणपतीपुढें, दिवाळींत म्हशींची मिरवणूक निघते तिच्यापुढें, पोळ्याच्या मिरवणुकींत, मराठे पुरुष व जवान पोरें न दमतां ढोलाच्या तालांत लेजीम खेळत मैलमैल जातात. तें नृत्य किती पाहिलें तरी पुरें वाटत नाहीं. त्याचप्रमाणें वारकरी झिम्मा नाचत, टाळी देत, अभंग म्हणतात. तेंहि मोठें गमतीदार वाटतें. लौकिक व धार्मिक व्यवहाराची गुंफण किती बेमालूम झाली आहे ह्या प्रकारांत ! हे सर्व नृत्यप्रकार व मुलींचे नाना खेळ ह्यांचें नीट वर्णन व चित्रण होणें आवश्यक आहे. त्यामुळें संस्कृतीच्या तुलनात्मक अभ्यासाला मदत मिळेल.*

नाट्यकला फार प्राचीन काळापासून भारतांत संवर्धित झाली आहे. नागरांची कला म्हणून मधल्या काळांत तिचा लोप झाला तरी लोकनाट्य ललित, तमाशे, दशावतार ह्या रूपानें महाराष्ट्रांत, कथाकलीच्या व यक्षगानाच्या रूपानें दक्षिणेंत व रामलीलेच्या रूपानें उत्तरेंत जिवंत होतें. मराठी नाट्य अर्वाचीन काळांत फार झपाट्यानें प्रगल्भ झालें व गेलीं कांहीं वर्षें निद्रितावस्थेंत आहे. मला वाटतें हा दोष मराठी साहित्यिकांचा

* मुंबई युनिव्हर्सिटीच्या सोशॉलजी शाखेतर्फे नुकतेंच ह्या विषयावर Folk Dance of Maharashtra ह्या नांवाचें एक पुस्तक श्री. अगरकर ह्यांनीं प्रसिद्धिलें आहे.

नाहीं. मराठी नाट्य ज्या संकटांत सांपडलें आहे तें एक जागतिक संकट आहे. सिनेमा, चित्रपट न राहतां बोलपट झाला, तेव्हांच सर्व जगभर नाटकांवर गंडांतर आलें व रंगभूमी टिकवावी कशी हा प्रश्न सर्वत्र उत्पन्न झाला. अति उत्तम नट असेल तरच मोठमोठ्या शहरीं कांहीं नाट्यगृहें चालूं शकतात. पूर्वी बऱ्याच मध्यम व भिकार कंपन्या गांवोगांव नाट्य करीत. त्यांत बऱ्याच नव्या नटनटींना प्रवेश मिळे, व अभिनयाची पारख झाली कीं मोठ्या शहरांतून कामें करण्यासाठीं त्यांची निवड होई. हल्लीं नाट्याला ही प्रयोगशाळा बंदच करावी लागत आहे. मोठमोठ्या शहरांतून नगरपालिकेनें केवळ नाट्यासाठीं म्हणून नाट्यगृहें बांधावयाचीं व तेथें कायम पगारी नटवर्ग ठेवावयाचा व त्यांनीं एका वर्षांत इतकीं नाटकें करावयाचीं असा प्रघात जर्मनींत होता. तसा कांहीं प्रयोग करून पाहिल्यास मराठी रंगभूमी परत उर्जितावस्थेंत येईलसें वाटतें. नाटक पहाणें जोंपर्यंत फार महागांत पडतें तोंपर्यंत गरीब महाराष्ट्रांत नाटकाला लागणारे सर्व गुण प्रकर्षानें असूनहि ह्या कलेची जोपासना करणें कठीण आहे.

नव्या युगांत सिनेमाच्या द्वारें कलेच्या आविष्काराला एक नवीनच संधि मिळाली आहे. चित्रपटांत गोष्ट, अभिनय, संगीत व तंत्र अशीं चार अंगें आहेत. व अभिमानाची गोष्ट अशी कीं, हिंदुस्थानांत मराठी चित्रपटनिर्मात्यांनीं फार वरच्या श्रेणीचे चित्रपट काढलेले आहेत. पाश्चात्य चित्रपटाचें साडी–धोतरांतील रूपांतर, किंवा केवळ शृंगारिक गझलें आणि गोडगोड प्रेमकथा मराठी चित्रपटकर्त्यांनीं निर्माण केल्या नाहींत. मराठी चित्रपटांत कांहींतरी नवीन सांगण्याची धडपड दिसून येते. जे चित्रपट पडले, फारसे गाजले नाहींत, त्यांतहि हाच गुण प्रामुख्यानें दिसतो. लेखकाला जें सांगावयाचें होतें त्याच्या तोडीची गोष्ट वा अभिनय निर्माण झाला नाहीं म्हणून ते चित्रपट पडले, टाकाऊ म्हणून नव्हे. जे चित्रपट लोकप्रिय ठरले ते मराठी सांस्कृतिक जीवन दर्शविणारे म्हणून लोकप्रिय झाले. संत चित्रपट पुष्कळ झाले. पण 'संत तुकाराम' इतका निर्दोष व कलारम्य चित्रपट दुसरा झाला नाहीं. 'ज्ञानेश्वरां'त निवडलेल्या ओव्यांची निवड फार मार्मिकतेनें झाली. ग्रामीण जीवनाचे व ऐतिहासिक

चित्रपट कोल्हापूरला निर्माण झाले व त्यांचें जें स्वागत महाराष्ट्रांत झालें त्यावरून मराठी इतिहास इतिहासजमा नसून आज प्रत्येकाच्या मनांत जिवंत आहे ह्याची साक्ष पटते. जी अभिजात प्रौढता व संस्कृतीची पकड वाङ्मयांत व रंगभूमीच्या इतिहासांत दिसते तीच महाराष्ट्रीय चित्रपटांतहि दिसून येते. चित्रपटाच्या धंद्याचें भांडवल जरी परकीयांच्या हातीं असलें तरी ह्या दर्जाचे चित्रपट निर्माण होतात हें महाराष्ट्रीयांच्या ध्येयनिष्ठेचें द्योतक आहे. वाङ्मयाप्रमाणें चित्रपटाच्या धंद्यांत केवळ तांत्रिक विभागांतच नव्हे तर कथालेखकांतहि सर्व जाती दिसून येतात.

रंगभूमीच्या बाबतींत मात्र नाटककार व नट यांमध्यें मुख्यत्वें ब्राह्मणांचें व तत्सम पांढरपेशा जातींचें प्राबल्य दिसून येतें. देवल, किर्लोस्कर, खाडिलकर, कोल्हटकर, वरेरकर, अत्रे वगैरे लेखक निरनिराळया जातीचे ब्राह्मण आहेत. बाकीच्या जातींत नाट्यलेखन होणार नाहीं असें नव्हे. शिक्षणांत त्या पुढारल्या म्हणजे तें खात्रीनें होईल. पण आजतागायत तरी नाट्यलेखन हें ब्राह्मणांचें वैशिष्ट्य दिसतें.

शिल्पकलेचा व स्थापत्यकलेचा महाराष्ट्रांतील इतिहास मोठा मनोरंजक आहे. खिस्ताब्दापूर्वी ३०० वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत कांहीं नामांकित शिल्प असल्यास आज तरी तें मुळींच शिल्लक नाहीं. त्यानंतर खिस्ताब्द ३०० वर्षांपूर्वीपासून खिस्ती शक ५०० पर्यंत महाराष्ट्रांत एकच तऱ्हेचें शिल्प दिसतें. तें म्हणजे कोरीव लेणीं. ही कला बौद्धांनीं महाराष्ट्रांत आणली. कारण प्राचीनतम लेणीं बौद्धांचींच आहेत. ह्या लेण्यांच्या बांधणीवरून तीं लांकडी बुद्ध मंदिराच्या प्रतिकृति आहेत हें स्पष्ट होतें. कोरीव लेण्याचा आकार, लेण्यापुढली तिकोनी गोलसर खिडकी वगैरे दगडांत उठवलेली वासे व झांप ह्यांनीं बांधलेल्या घरांची प्रतिकृति आहे. ह्यानंतरच्या पिढीला आपल्या द्रव्याचें यथार्थ ज्ञानहि झालें व आत्मविश्वास उत्पन्न होऊन दगडाला शोभेसें खोदीव व कोरीव काम होऊं लागलें. बौद्धांच्या मागून हिंदूंनीं लेणीं कोरण्यास आरंभ केला व त्यांच्या लेण्यांचा विकास हिंदू मंदिरांच्या शिल्पाच्या विकासाच्या अभ्यासाशिवाय कळणार नाहीं. लेण्यांचें स्वरूप म्हणजे एक मोठा लांबच लांब मंडप व

शेवटीं चैत्य असें असतें. त्याभोंवतीं विहार असतात. पहिलीं हिंदु लेणीं ऐहोळे येथें बदामीजवळ सांपडतात. त्यांत एक मंडप व मागच्या भिंतीशीं मूर्तीचें शिल्प अशीच बुद्ध लेण्यांप्रमाणें रचना आढळते. याच सुमारास घडीव मंदिरेंहि ऐहोळे व बदामी येथें बांधण्यास सुरुवात झाली. पहिलीं मंदिरेंहि अशींच आहेत. त्यानंतर मूर्ति पुढें सरकून तिच्याभोंवतीं प्रदक्षिणामार्ग निर्माण झाला. त्याच्याहि पुढें मंदिराचे तीन भाग झाले. त्यांत सर्वांत पुढ नंदीमंडप, मध्यें मुख्य मंडप, व मागच्या बाजूस देवगृह असें झालें व लेण्यांनाहि तेंच स्वरूप प्राप्त झालें. पुण्यांतलें पाताळेश्वराचें लेणें व घारापुरीचीं व कान्हेरीचीं कांहीं लेणीं या स्वरूपाचीं आहेत. त्यानंतर पट्टदकलला विरूपाक्ष, विजयेश्वर, त्रैलोक्येश्वर, वगैरे मोठमोठीं मंदिरें चालुक्यांच्याच कारकीर्दींत झालीं. ह्या मंदिरांत गर्भगृह, सभामंडपाचाच भाग न राहतां सर्वस्वीं स्वतंत्र झालें. एवढेंच नव्हे तर त्यावर मंदिराचा कळस उभारला गेला व प्रदक्षिणामार्ग सबंध गर्भगृहाबाहेरून गेला. राष्ट्रकूट राजे चालुक्यांचे मांडलिक होते ते पट्टदकलला कितीदां गेले असतील व तेथील अप्रतिम शिवमंदिरें त्यांना चांगलींच परिचित असणार. त्यांनीं चालुक्यांचें राजकीय वर्चस्व झुगारून दिलें तरी सांस्कृतिक परंपरा झुगारली नाहीं. राष्ट्रकूटांचीं वेरूळचीं लेणीं म्हणजे चालुक्यांच्या दगडी बांधीव मंदिराच्या प्रतिकृति आहेत. त्यांतल्या त्यांत वेरूळचें जगप्रसिद्ध कैलास लेणें म्हणजे तर पट्टदकलच्या विरूपाक्ष मंदिराची प्रतिकृति आहे. लांकडाची दगडांत प्रतिकृति करतांना लांकडी वाशांना येणारा बांक सांचीं येथील स्तूपाच्या तोरणांत दगडांत दाखविला आहे. कारल्याच्या लेण्यांत लाकडाच्या तुळया वरच्या छतांत कोरल्या आहेत. कारागिरांपुढें जो कित्ता असे तो ते गिरवीत. तोच प्रकार याहि प्रतिकृतींत दिसतो. दगडांत गुहा कोरावयाची म्हणजे तिची एकच पुढची बाजू उघडी असते. दगड खोदतांना मनुष्य पुढच्या बाजूनें सुरुवात करून आंत आंत जातो. ह्याउलट मंदिर प्रशस्त प्रांगणांत सर्व बाजूंनीं खुलें असतें. तें तसें दाखवावें म्हणून कैलास लेणें पुढून मागें न खोदतां वरून खालीं खोदीत नेलें आहे. ज्या दगडाचें देऊळ कोरावयाचें तो डोंगरांतून चारी बाजूनें अलग करून मग त्यांत मंदिर खोदलें आहे व तें मंदिर म्हणजे नंदीमंडप, ध्वज-

स्तंभ, सभामंडप, गर्भगृह व त्यांवरील विमान ह्या सर्वांसह संपूर्ण आहे. मंदिराच्या चारी बाजूंना प्रांगण आहे, पण प्रांगणाच्या भिंती वरपर्यंत उंच पोचलेल्या आहेत व त्यामुळें सबंध कोरीव लेणें खोलांत गेल्यासारखें वाटतें. हें अद्भुत मंदिर म्हणजे परंपरेनें द्रव्यावर मिळविलेला विजय होय. दगडाच्या डोंगरांतून चारी बाजूनें सुटें मंदिर खोदावयाचें म्हणजे केवढी कल्पनेची भरारी! असें पाहतांक्षणीं वाटतें. पण लेण्यांच्या विकासाचा इतिहास ध्यानांत धरला म्हणजे ही स्वतंत्र कल्पनेची भरारी नसून परंपरेनें दृढ केलेले आकार दुसऱ्या तऱ्हेच्या द्रव्यांत उतरविण्याची ही अचाट खटपट आहे असें कळतें. त्याचप्रमाणें दुसऱ्या बाजूनें पहातांहि परंपरेचा बळकट-पणा दिसतो. कर्नाटकांत व तामिळ प्रदेशांत बांधीव मंदिरें होत होतीं. पण महाराष्ट्रानें मात्र दहाव्या शतकापर्यंत डोंगर खोदण्याचा आपला नाद सोडला नाहीं. हीं प्राचीन कोरीव लेणीं म्हणजे महाराष्ट्राच्या अभिजात संस्कृतीचीं मानचिन्हें आहेत. तीं महाराष्ट्राचें वैशिष्ट्य आहेत. सबंध हिंदुस्थानांत जेवढीं लेणीं आहेत त्याच्या चारपंचमांश लेणीं एकट्या महाराष्ट्रांत आहेत. कांहीं इतिहासकार महाराष्ट्राच्या काळ्या कातळाच्या दगडामुळें हीं लेणीं घडलीं असें म्हणतात. अर्थात ज्वालामुखीच्या रसा-पासून झालेले हे काळे पहाड असल्याशिवाय लेणीं खोदतां आलीं नसतीं खरीं, पण ते आहेत म्हणून लेणीं खोदलीं हें म्हणणें बरोबर नाहीं. महाराष्ट्राच्या उत्तरेला विंध्य पर्वतांत असे पहाड आहेत. पण लेणीं थोडींच खोदलेलीं आहेत. इजिप्तमध्यें पहाडाच्या उंच कड्यांत खोदाई करून प्राचीन राजांचे मृतावशेष ठेवलेले आहेत व शेजारींच त्या कड्याखालीं सुंदर चिरेबंदी बांधीव मंदिरें आहेत. कडेखोदाई अवगत असूनहि कड्यां-तून लेणीं कोरलेलीं नाहींत. ही लेण्यांची कल्पना पहिल्यानें उत्तरेंत उदयास आली. पण तिचा प्रकर्ष महाराष्ट्रांत झाला. महाराष्ट्रांत लेणीं खोदण्याला योग्य पर्वत होते, तसेंच चिरेबंदी देवळें बांधावयास लागणारा दगडहि होता. तरी पण शेजारचे देश चिरेबंदी मंदिरें बांधीत असतांहि महाराष्ट्र आपला लेणींच खोदीत राहिला. कां बरें? हा प्रश्न विचारण्यास सोपा आहे, चटदिशीं सुचतोच. उत्तर देणें मात्र तितकेसें सोपें नाहीं.

धर्म, संप्रदाय व तत्वज्ञान ह्यांचें विवेचन करतांना जुन्या परंपरेला

महाराष्ट्र किती बळकटपणें चिकटून आहे, तें आपण पाहिलें. सर्वच हिंदुस्थान ह्याप्रमाणें रूढीप्रिय आहे. पण त्यांतहि एकदां आपला मार्ग धरला म्हणजे तो धरून बसावयाचा हें मराठी स्वभावाचें वैशिष्ट्य कदाचित लेणीं खोदीत बसण्याच्या अट्टाहासांत प्रतिबिंबित झालें असेल.

महाराष्ट्रांतील मंदिरें दहाव्या-अकराव्या शतकापुढचीं आहेत. कांहीं थोडीं महाराष्ट्रांतील मंदिरें सुंदरहि आहेत. पण सौन्दर्य व संख्या या दोनहि बाबतींत कर्नाटक, तामिळनाड, बुंदेलखंड, ओरिसा व गुजरात येथील देवळें निःसंशय वरचढ आहेत. देवळाच्या शिल्पाबाबत महाराष्ट्रीय अशी एक विशिष्ट कळसाची रचना आहे व ती गुजरातेंतील देवळांवरून उचललेली दिसते.

महाराष्ट्राच्या मंदिरांतील एक वैशिष्ट्य म्हणजे बऱ्याच मंदिरांतून गर्भगृहांत जातांना सभामंडपांतून पायऱ्या उतरून जावें लागतें. कैलासचें सबंध मंदिरच खोलांत आहेसें वाटतें. पण आंत शिरतांना मनुष्य बाहेरच्या भुईवरून सरळ आंत जातो. पाताळेश्वराचा सबंध फत्तर जमिनींत खोलांत आहे व मंदिरांत पायऱ्या उतरून जावें लागतें. अशी खोल भुईत खोदलेलीं मंदिरें, कोठडीवजा एका खोलीचीं मंदिरें, महाराष्ट्रांत बरींच आहेत. त्यांच्यावरून तर मुख्य गर्भगृह खोल बांधण्याची पद्धत निघाली नाहीं ना? अशी शंका मनांत येते. राष्ट्रकूटांच्या एका सेनापतीचें नांव खोलेश्वर असें शिलालेखांत सांपडतें. हें नांव ह्या खोल खोदलेल्या शिवालयांवरून तर नाहीं ना पडलें? खोलेश्वर हें पाताळेश्वराचेंच प्राकृत रूप आहे.

मराठी राजे व मराठी कारागीर चिरेबंदी बांधकाम करीत नव्हते असेंहि नाहीं. त्यांनीं जरी इतर प्रांतांच्या तोडीचीं मंदिरें बांधलीं नाहींत, तरी त्यांचें दगडी बांधकाम डोळ्यांत भरण्यासारखें व इतर प्रांतांना सर्वस्वीं मागें टाकणारें असें आहे. हें बांधकाम म्हणजे महाराष्ट्रांतील किल्ले.

जी गोष्ट लेण्यांची तीच किल्ल्यांची. महाराष्ट्रांत जेवढे किल्ले आहेत तेवढे भारतांत इतर कोठेंहि नाहींत. पश्चिम पट्टींत तर असें एकहि गांव नसेल कीं जिथून एक तरी किल्ला दिसणार नाहीं. हे किल्ले बहुतेक मध्ययुगांतील आहेत. पण कांहीं, विशेषतः बुद्ध लेण्यांच्या जवळचे, जुने

असावेत असें वाटतें. नाशिकजवळ चांदूर ( चंद्रादित्यपूर ) हा किल्ला फार जुना आहे. तो दृढप्रहार यादवानें बांधला असावा. मार्तंड गड चांदूर पर्वतश्रेणींतच आहे. तेथून काढलेल्या सन ८०८ मधल्या ताम्रपटांत त्याचा उल्लेख मयूरखंडी असा तिसरा गोविंद राष्ट्रकूट यानें केला आहे. सातव्या शतकाच्या आरंभीं पुलकेशी चालुक्यानें कोंकणच्या मौर्यांची पुरी ही राजधानी काबीज केली. पुरी म्हणजे मुंबईशेजारील घारापुरी. येथील जुन्या तटबंदीचे अवशेषहि आतां आढळत नाहींत. पण ती असावी असें स्वारीच्या वर्णनावरून वाटतें. राष्ट्रकूट व यादव यांची राजधानी जें पैठण शहर तेथून जवळच मोठा अजिंक्य किल्ला आहे. तो सिंघण यादवानें इ. स. १०५० त बांधला. चालुक्यांची राजधानी बदामी येथें डोंगरावर उध्वस्त केलेला किल्ला दिसतो. हा सर्वांत जुना किल्ला समजतात. वर मयूरखंडी व चांदूरचा उल्लेख आलेला आहेच. मराठ्यांनीं किल्ले बांधण्याची प्रथा नवी पाडलेली नाहीं. तर महाराष्ट्राच्या प्राचीनतम राजांनीं जें केलें तेंच पुढें चालू ठेवलें. मध्ययुगांत शिलाहारांनीं केंजळ, चंदन, नंदगिरी, पन्हाळा ( पन्नालदुर्ग ), पांडवगड, पावनगड, बावडा, भुदरगड, रांगणा, वसंतगड, विराटगड, विशाळगड, नंदन, सातारा, व सामनगड असे पंधरा किल्ले बांधले असें समजतात. औरंगजेबाशीं लढण्याची सिद्धता त्यानें पुढच्या पिढीसाठीं करून दिली, असें ह्या किल्ल्यांचीं नांवें वाचतांना कळून येईल. कोल्हापूर, सातारा, कऱ्हाड, वाई ह्या प्रदेशांत ह्या किल्ल्यावरून त्या किल्ल्यावर ह्याप्रमाणें शत्रूला हुलकावण्या देत लढणें शिवरायांना शक्य झालें तें ह्या किल्ल्यांमुळेंच. पश्चिमेकडील डोंगरी किल्ले व पूर्वेकडील देवगिरीसारखे किल्ले यांच्या बांधणींत फार फरक आहे. अंकाई, टंकाई वगैरे किल्ले देवगिरीप्रमाणें आहेत. विस्तीर्ण मैदानावर एकच एक उभा असलेला पर्वत पाहून त्याच्या भिंती छिन्नींनीं दोनशें दोनशें फूट छाटून उभ्या सुळक्यासारख्या करतात. किल्ल्या-भोंवतीं मोठा तट व भोंवतीं खंदक असून आंत शिरण्यास एकमेव दरवाजा असतो. दरवाज्याच्या आंत किल्ला चढण्यास वेड्यावांकड्या भुयारांतून जावें लागे. तेथेंहि ठिकठिकाणीं आग लावून देण्याची व्यवस्था असे. पुरेसें खाण्याचें असेल तर असा किल्ला शत्रूच्या हातीं कधींहि

लागणें शक्य नाहीं. पण अंतःकरणाचा किल्लाच जर शत्रूनें काबीज केला तर कठीणांतल्या कठीण दगडाच्या किल्लयाचा काय पाड ? पश्चिमेकडील किल्ले स्वभावतःच चढण्यास कठीण अशा उंच डोंगरावर बांधलेले व भोंवतालून तटबंदी केलेले असे आहेत. दगड छिनून काढलेला त्यांत आढळत नाहीं. सबंध पहाड कैलास लेण्यासाठीं ज्यांनीं वरून खालीं खोदला त्यांना शेजारींच देवगिरीचा पहाड छिन्नीनें कापून काढणें काय जड वाटणार ? पश्चिमेकडील किल्लयावर जाण्यास बहुधा एकच किंवा दोन वाटा असतात व तेथें मुख्य संरक्षण असे. किल्लयाच्या डोंगराच्या मध्यावर मेटीं वसवलेलीं असतात. सबंध डोंगराभोंवतीं अशीं मेटीं असतात व तीं संभाळण्याचें व त्याच्या पहाऱ्याचें काम मुख्यत्वें कोळ्यांकडे असे. ह्या किल्लयांचीं नांवें कांहीं जुनीं व कांहीं नवीं आहेत. हीं जुनीं व शिवशाहींत मिळालेलीं नवीन नांवें इतकीं सुंदर आहेत कीं नुसतीं ऐकलीं तरी मनाला हुरहूर लागते व परत तो काळ जगावा असें वाटतें. देवगिरी, श्रीवर्धन, मनरंजन, विशाळगड, गगनबावडा, सिंहगड, पुरंदर, वज्रगड, शिवनेरी, हरिश्चंद्रगड, प्रचंडगड, तुंग, संग्रामदुर्ग, विश्रामगड, चंदनवंदन, कमळगड, मकरंदगड, राजगड, तोरणा, प्रतापगड, रायगड, सिंधुदुर्ग, विजयदुर्ग, किती म्हणून नांवें सांगावीं ? अस्सल मराठेशाहींतलीं हीं नांवें आपल्या संस्कृतोद्भव भाषेची, तिच्या नादमाधुर्याची, तिच्या ओजाची व वैदर्भी रीतीची साक्ष देत आहेत.*

* श्री. स. आ. जोगळेकर ह्यांनीं 'प्रसाद' मासिकाच्या १९५०च्या ऑगस्ट, सप्टेंबर व ऑक्टोबर ह्या तीन अंकांत महाराष्ट्रांतील किल्ल्यांसंबंधीं तीन अतिशय माहितीपूर्ण व उद्बोधक लेख लिहिले आहेत. वरील माहिती त्या लेखांवरूनच घेतलेली आहे. ती फार त्रोटक आहे. जिज्ञासूंनीं मूळ लेख अवश्य पहावे.

त्याचप्रमाणें महाराष्ट्रांतील लेणीं व देवळें यांचें उत्कृष्ट विवेचन व देवळांचे व लेण्यांचे नकाशे श्री. श्री. वि. नाईक ह्यांनीं डेक्कन कॉलेजांत लिहिलेल्या Archaeology of the Deccan ह्या प्रबंधांत आहे

किल्ले व लेणीं ह्याखेरीज इतर बांधकामांतहि संस्कृतीचें वैशिष्टय दिसून येतें, पण तशा तऱ्हेचा अभ्यास भारतांत अजून झाला नाहीं. महाराष्ट्रांत घरें बांधण्याच्या पद्धति मुख्यत्वेंकरून दोन तऱ्हेच्या आहेत. एक कोंकणांतील झापांचीं घरें व दुसरीं देशावरील धाब्याचीं घरें. हवामान व भोंवतालच्या सृष्टींत मिळणाऱ्या वस्तू ह्यांवर घरांची बांधणी बऱ्याच अंशानें अवलंबून असते. पण हें अवलंबन नेहमीं दिसून येतें असें नाहीं व तें सकृत्दर्शनीं जितकें वाटतें तितकेंहि बहुधा नसतें. देशावर, विशेषतः महाराष्ट्राच्या पूर्वपट्टींत, जंगल नसल्यामुळें लांकूड लांबून आणावें लागतें व फार महाग पडतें. म्हणून गरीबगुरिबांच्या घरांत शक्य तितकें कमी लांकूड असतें, पण मोठमोठ्या वाड्यांच्या बांधकामाला लांकूड, विटा व चिरे सर्व उपयोगितात. गरिबांचीं घरें कच्च्या विटांच्या भिंतींचीं किंवा चिखलाचे गोळे एकमेकांवर रचून केलेल्या भिंतींचीं असतात. भिंतीवर तुळया घालून, वर लांकडें अगर विटा रचून त्यावर माती घालून सपाट, किंवा थोडा एकाच बाजूला उतार असलेलें छप्पर असतें. श्रीमंत लोक आपल्या वाड्यावर चुनेगच्ची करीत. कोंकणपट्टींत व नागपूरच्या जंगल विभागांत घराचीं छपरें सपाट नसून मध्यभागीं उंच आढें असून दोन्हीकडे छप्पर उतरत जातें. अशीं घरें महाराष्ट्राच्याच पश्चिम पट्टींत नव्हे तर हिंदुस्थानांत जेथें जेथें डोंगराळ प्रदेश व पुष्कळ पाऊस आहे, तेथें दिसतात. कांहीं वन्य जमातींचीं व अतिशय गरीब वस्तींतलीं घरें भिंतीशिवायच असतात. मधल्या तुळईवरून छप्पर जवळ जवळ भुईपर्यंत येऊन पोंचतें किंवा मध्यें एक मेढ ठेऊन त्याच्याभोंवतीं गोल छप्पर घालून तें भुईपर्यंत पोंचवलेलें असतें. ह्या मूळ छपराचीच पुढची पायरी म्हणजे मातीच्या किंवा कुडाच्या किंवा लांकडाच्या भिंती करून छप्पर घालणें ही होय. कच्च्या किंवा पक्क्या विटेचें सपाट छपराचें ऊर्फ धाब्याचें घर ही सांस्कृतिक दृष्ट्या वरची पायरी आहे. विटा घडवण्याची क्रिया माहीत झाल्यावर अशीं घरें बांधण्याची पद्धत सुरू झाली. इजिप्त, बाबेरू वगैरे देशांतून अशीं घरें फार प्राचीन काळापासूनचीं सांपडलीं आहेत. समृद्ध शेतीच्या, पण फारसा पाऊस व झाडी नसलेल्या प्रदेशांतून अशीं घरें मुख्यत्वें दिसतात. ह्याच घरांचें प्रगत स्वरूप म्हणजे चौसोपी चिरेबंदी

किंवा पक्क्या विटांचे बांधलेले चुनेगच्ची वाडे. उतरतें छप्पर असलेल्या घराची रचना त्या घराच्या बांधणीमुळें ठरल्यासारखी असते. आधीं गोल किंवा दोन पाख्याचें छप्पर, त्यामध्यें भिंती घातल्या कीं मध्यें उंच व बाजूंनीं उतरती अशी चौकोनी अगर खोल खोली मध्यें होते. गोल घरें गैरसोयीचीं म्हणून फारशीं आढळत नाहींत. अशीं घरें हिंदुस्थानांत कांहीं वन्य जमाती, कांहीं अस्पृश्य वस्ती यांत व आफ्रिकेंत कांहीं ठिकाणीं आढळतात. पण इतर छप्परी झोपड्या चौकोनीच असतात. ह्या मधल्या खोलीच्या भिंतींवरून छप्पर बाहेरच्या बाजूस बरेंच खालीं आलेलें असतें. इतकें कीं निवाऱ्यासाठीं वळचणीखालीं उभे रहातां येतें. मागच्या पुढच्या वळचणीखालीं खांब दिले कीं सोपा किंवा पडवी होऊं शकते व पुढचा सोपा, माजघर व मागची पडवी असे घराचे स्वभावतःच तीन भाग होतात. पुढचा मागचा सोपा उघडाच असतो. मधघराला पुढचें मागचें दार, क्वचितच एकादी लहानशी खिडकी असते. घरांत आणखी खोल्या वाढवावयाच्या त्या माजघरांत भिंती किंवा बहुतांशीं शेणमातीनें लिंपलेलीं कुडें घालून तयार होतात. या उलट विटेच्या किंवा मातीच्या घराचा सर्वांत लहान नमुना म्हणजे एक चौकोनी खोली तयार होते. तिला सोपा, पडवी, वळचण असें कांहींच नसतें. घर वाढवावयाचें तर शेजारीं दुसरी खोली बांधून लांबच लांब वाढवावें लागेल. पण एका खोलीला सर्व बाजूनें खोल्या चिकटवल्या तर मध्यें व इतर खोल्यांतहि अंधार होईल म्हणून साधारणपणें मध्यें अंगण किंवा चौक व भोंवतीं खोल्या अशी आपल्याला परिचित अशी वाड्याची रचना होते. आंत शिरायचा फक्त एक दरवाजा, क्वचित् लहानसें मागचें दार असतें. इतर खोल्या चौकांत उघडतात. बाहेरच्या अंगाला क्वचित् एखाद दुसरी लहानशी खिडकी असते. शेजारीं शेजारीं दोन खोल्या बांधल्या तरी भोंवतीं पुष्कळदा भिंत घालण्याचा प्रघात दिसतो. बहुतेकपणें साध्या घराचें किंवा वाड्याचें दार अगदीं रस्त्यावर असतें व घराशीं घर लागलेलें असतें. ह्या उलट कोंकणांतील घरांना पुढें मागें अंगण व वई असते व घरें एकमेकांपासून दूर दूर असतात. देशावरचे कांहीं कांहीं वाडे म्हणजे लहानसे किल्लेच असतात. तीनचार फूट रुंद भिंती, वर चुनेगच्ची व पुढचें एक वळकट

दार असें घर एकदां दार बंद केलें कीं वेळ पडल्यास लढवतां येई. त्याचप्रमाणें देशावरचीं घरें शेजारीं शेजारीं बांधलेलीं असतात व बऱ्याच गावांत भोंवतीं भिंत असे. अशी नागर रचना कोंकणांत आढळत नाहीं. देशावरल्यासारखे मोठाले वाडेहि कोंकणांत दिसत नाहींत. घराची बांधणी व आंतली रचना व गांवाची मांडणी ह्याबाबतींत महाराष्ट्राचें असें कांहीं वैशिष्ट्य आहे कीं काय तें सांगतां येत नाहीं. कारण मंदिरांबद्दल जसें संशोधन झालें आहे तसें या रोजच्या व्यवहारांतील गोष्टींबद्दल झालेलें नाहीं. महाराष्ट्रांतल्या महाराष्ट्रांत जो प्रादेशिक फरक आहे तेवढा मात्र वर सूचित केला आहे. देशावर गवंडी व पाथरवट हे महत्त्वाचे कारागीर आहेत. ह्याउलट कोंकणी सुतार कुशलतेबद्दल प्रसिद्ध आहेत. देशावरच्या गवंडी व पाथरवटांत बरेच लोक परदेशी, गुजराती व काठेवाडी आहेत, हेंहि चिंतनीय आहे.

## इतर कांहीं वैशिष्ट्यें

नित्योपयोगी वस्तूंतहि राष्ट्राची कला जाणवते. विशेषतः वस्त्रप्रावरणांच्या बाबतींत विणकर, शिलाई, कापडाचे रंग वगैरेंत ह्या कलांचा विशेषेंकरून आविष्कार होतो. स्त्रीपुरुषांच्या वस्त्रांच्या बाबतींत हिंदुस्थानचे साधारणपणें दोन भाग पडतात. बंगाल, बिहार, ओरिसा, तेलंगण, केरळ व तामिळनाड एका भागांत येतात व गुजरात, काठेवाड, राजपुताना, मध्यभारत, दिल्ली व पंजाब दुसऱ्या भागांत येतात. पहिल्या भागांत लोक अति थोडीं वस्त्रें लेतात. पुरुषांचें धोतर व पांघरायला एखादी उत्तरीय किंवा बंडी असा पोशाख असे व स्त्रिया एकवस्त्रा—लुगडें गुंडाळलेल्या—असतात. चोळी घालण्याचा प्रघात दिसत नाहीं. आंध्र, दक्षिण कर्नाटक, तामिळनाड व मलबार ह्या प्रांतांतून सध्यां चोळी घालतात, पण तो प्रघात पूर्वीपासून असावा असें वाटत नाहीं. उत्तर कर्नाटक व महाराष्ट्रांत पुढच्या गांठीची चोळी असे असें दिसतें. लीलाबई काव्यांत चोळी शब्द येतो; तसेंच हालाच्या सप्तशतींत कंचुइ ( कंचुळि ) असा शब्द येतो. त्यावरून चोळी जुनी असावी असें दिसतें. चोळी हा शब्द कांचोळी शब्दापासून आलेला दिसतो. चोळी

उर्फ कंचुळी दोन तऱ्हेनें बांधण्याचा प्रघात आहे. महाराष्ट्रांत व उत्तर कर्नाटकांत पुढच्या गांठीची चोळी असते. गुजरात, काठेवाड, राजपुताना इकडे मागें बंदाची चोळी असते. ह्या कांचोळया पुढून निरनिराळे रंगीबेरंगी तुकडे शिवून त्यांना स्तनाचा आकार देऊन व बाह्या जोडून शिवलेल्या असतात. मागच्या बाजूनें पाठ उघडी असते. फक्त पुढच्या चोळीचे बंद—एक जोडी स्तनाखालच्या बंदांची व एक जोडी खांद्यावरच्या बंदांची—मागें बांधलेले असतात. वंजारी स्त्रियांची कांचोळी पुढून बरीच लांब म्हणजे बेंबीखालीं आलेली असते. वर बंद असतात व स्तनांखालील भाग नुसताच मोकळा असतो. वंजारी स्त्रिया कांचोळीवर कशिदा काढतात, लहान लहान भिंगें बसवतात व रंगीबेरंगी तुकड्यांची शिवतात. उत्तरेकडील स्त्रियांच्या कांचोळींत शिवण, कशिदा व कापड ह्यांच्या बाबतींत मोठी सौंदर्यदृष्टि व कौशल्य जरी दिसून आलें तरी कांचोळीला कापड म्हणून विशिष्ट प्रकारची विणण्याची घाटणी दिसून येत नाहीं. ती कर्नाटकमहाराष्ट्रांत दिसून येते. ह्या कापडाला खण किंवा चोळखण म्हणतात व कर्नाटकांतील कांहीं केंद्रे केवळ चोळखणाचीच विणकर करतात. हालाच्या सतसईमध्यें कंचुळिआ हा शब्द आला आहे. तो पुढच्या गांठीच्या चोळीलाच असावा असें खालील गाथा व तिच्यावरील टीकेवरून वाटतें.

> दो अंगुलअ कवालअ पिणद्ध सविसेस नील कंचुइआ ।
> दावेइ थणश्थल वण्णिअम् व तरुणी जुअजणाणम् ॥

दोन अंगळ रुंदीची फट असलेल्या, पाखयांनीं बांधलेल्या काळ्या ( निळ्या ? ) चोळींतून तरुणी युवकांना थोडा स्तनप्रदेश नमुना म्हणून जणुं दाखवते.

दो अंगुलअ कवालअ वगैरे शब्दांचा अर्थ टीकाकार असा देतो—"द्व्यांगुलपरिमितसंधिबंधस्थले कपाटवत् पार्श्वद्वये यद् भवति तत् कपाटः" बांधण्याच्या ठिकाणीं दोन बोटें जागा रहाते तें स्थल, कपाट म्हणजे पार्श्वद्वय असतें तें. पार्श्व हाच शब्द आजहि मराठींत चोळीच्या पुढच्या दोन तुकड्याबद्दल 'पाख' ह्या प्राकृत रूपांत आढळतो. चोळी बेततांना आधीं पाठ व पखे बेततात. पाठ (पृष्ठ) एक व पखे दोन (पार्श्वद्वय) असतात.

गांठीची चोळी बांधली म्हणजे दोन पख्यांत दोन अंगळाचें अंतर रहातें त्याला उद्देशून वरची गाथा आहे. वण्णिअम् ( संस्कृत वार्णिक ) म्हणजे मराठी बानगी उर्फ नमुना. कदाचित् चोळी हें वस्त्र कांचोळीचेंच एक स्वरूप असेल. तसें असेल तर चोळी ऊर्फ कांचोळी उत्तरेकडल्या, विशेषतः वायव्येकडून आलेल्या लोकांबरोबर आलेली दिसते.

हिंदुस्थानच्या वर सांगितलेल्या दुसऱ्या विभागांत पुरुष व बायका बरींच वस्त्रें वापरतात व त्यांतील बरींच बेतून शिवलेलीं असतात. पुरुष तुमान व बंडी घालतात व डोक्याला रुमाल बांधतात. बायका खूप चुण्यांचा परकर (घागरा) व कांचोळी घालतात आणि तिसरें वस्त्र पदर म्हणून डोक्यावरून घेतात. बायकांच्या वस्त्रांत रंग व कशिदा भरपूर असतो. महाराष्ट्रांत पुरुष डोक्याला रुमाल बांधतात. उत्तर कर्नाटकांतहि रुमाल बांधतात. द्राविड देशांत फक्त ब्राह्मण डोक्याला रुमाल बांधतात व तोहि अंग पांढरें व लहान कांठ असा असतो. रंगीबेरंगी रुमाल उत्तर कर्नाटक, महाराष्ट्रांत, काठेवाड व राजपुतान्यांत दिसतात. काठेवाड व राजपुताना आणि सिंध येथील बायका कशिदा काढतात. तो कशिदा इराणच्या काशिद्या-बरहुकूम असतो. आपल्याकडे कर्नाटकांतील कशिदा विशेष प्रसिद्ध आहे. तसा काशिदा जगांत दुसरीकडे आहे कीं काय हें अजून माहीत नाहीं. महाराष्ट्राला ही कला माहीत नाहीं. स्त्रियांचें लक्ष शिवण टिपणा-कडे विशेष दिसत नाहीं. निरनिराळे रंगीत तुकडे शिवून गोधडी तयार करतात किंवा जुनीं वस्त्रें एकावर एक घालून मध्यें टाके मारून गोधडी करतात. पण ती करणारे लोक फिरते कारागीर असतात व ते सुगीच्या वेळीं येऊन खेड्यापाड्यांतून गोधड्या शिवून देतात. हे लोक गुजरातेंतून आलेले असतात. महाराष्ट्रांत विणण्याबद्दल बरींच गांवें प्रसिद्ध आहेत, पण बरेच विणकर लोक आंध्र, कानडी किंवा मूळचे उत्तरेकडील असावेत असें दिसतें. स्वतःला स्वकुळ साळी किंवा सूतसाळी म्हणवणारा वर्ग मराठी असेल, पण साळी नांवाचे विणकर कर्नाटकांत हजारोंनीं आहेत. तेव्हां मूळ विणकर महाराष्ट्रांतील कीं बाहेरून आलेले तें कळत नाहीं. शिवणाची कला देशावर तरी मुळींच नाहीं. व चोळी शिंप्याकडून

शिवून आणण्याचा सर्रास प्रघात आहे. चोळीसाठीं लागणाऱ्या कापडाला खण किंवा चोळखण हा शब्द आणि बायकांच्या ओव्यांत त्याचा येणारा बारंवार उल्लेख पाहिला म्हणजे चोळी महाराष्ट्र–कर्नाटकाचें वस्त्र आहे असें वाटतें.

रुसली रुक्मीण, सये जेवीना दूध पोळी ।
विठू जनीची शिवी चोळी ॥

ह्या ओवींत सांगितल्याप्रमाणें बायकोची चोळी शिवणारा कुणबी लेखिकेनें स्वतः पाहिला आहे.

विठ्ठल चोळी शिवी, रुक्मिणी गेली पहायाला ।
अशी जडावाची पाठ, हिरे जोडीले बाहीला ॥

ह्या ओवींत विठ्ठल स्वतः चोळी शिवतो कां शिंप्याकडे शिवायला टाकतो तें कळत नाहीं. काठेवाडच्या कृष्णाला शिवणकला अवगत होती तर महाराष्ट्रांतील वैदर्भी रुक्मिणी नुसती चोळी कशी काय होते हें पहायला गेली हें योग्यच वाटतें.

कशिद्याचे उल्लेखहि तेलंगी, तिलंगी वा कानडी असे आहेत. "काळ्या चोळीवर कशिदा 'तिलंगीचा' (?) । तुला प्रसाद गंगेचा ॥ ". देव नुसते चोळीच शिवीत नसत तर चोळीवर नक्षीहि काढीत असें दिसतें. रुक्मिणीच्या चोळीवर अभंग झाले दाट । देवा विठ्ठलानें लिहिला हरिपाट ॥ रुक्मिणीच्या चोळीवर अभंगाला नाहीं जागा । देवा विठ्ठलानीं लिहिली चंद्रभागा ॥ अभंग लिहिणें किंवा चंद्रभागा लिहिणें म्हणजे काय तें नीटसें कळत नाहीं. "केरे मोरे लिहिणें किंवा काढणें" हा शब्दप्रयोग रांगोळी काढण्यासाठीं किंवा भिंतीवर वल्लिका–पक्षादि काढण्यासाठीं नेहमीं ऐकूं येतो. तसाच वरचा प्रयोग असेल तर अभंगाची खडी चोळीवर काढीत कीं काय असें मनांत येतें. पंढरपूरच्या प्रसादाचे खण रंगीबेरंगी खडीचे किंवा कशिद्याचे असतात. त्यांतलेच हे असतील. महाराष्ट्रांतील बायकांना शिवणटिपण विशेष माहीत नाहीं हें मात्र वरील ओव्यांवरून सिद्ध होतें. आजहि शिवण्याटिपण्याच्या बाबतींत प्रभु, सारस्वत वगैरे मुंबईच्या जाती जितक्या हुशार आहेत तितक्या देशावरच्या नाहींत.

कोंकणांतील कुणबी बाया स्वतःची चोळी शिवतात. देशावरच्या बाया शिंप्याकडून शिवून घेतात. स्त्रियांच्या गाण्यांत शिंपीदादा व चोळी बारंबार डोकावतात. नामदेव शिंपी ही महाराष्ट्रांतील एक महत्त्वाची जात आहे.*

रोजच्या व्यवहारांतील वस्तुरूप संस्कृतीबद्दल संशोधन फार थोडें झालेलें आहे. त्यावरूनहि निरनिराळ्या प्रादेशिक संस्कृतींचे परस्पर संबंध कळून येतात. कांहीं दोन चार वस्तूंबद्दलच इथें उल्लेख करतें. त्यावरून संशोधनाची दिशा कळेल एवढेंच.

कमावलेलें कातडें व त्याचे जिन्नस उत्तरेकडे जितके आढळतात तसे दक्षिणेकडे आढळत नाहींत. उपानह=वहाण; पादत्राण=पायतण हा जिन्नस उत्तरेकडचा दिसतो. दक्षिणेकडे पायतण घालण्याची प्रथा अगदीं नवीन आहे. उत्तरेकडे सर्व प्रदेशांत चर्मकार=चांभार म्हणून जात आहे तशी दक्षिणेंत नाहीं. जेथें आहे तेथें उत्तरेकडील चर्मकार शब्दापासून निघालेलेच शब्द आढळतात. त्याचप्रमाणें गोपाळ = ग्वाल = गवळी ह्या धंद्यालाहि दक्षिणेंत शब्द नाहीं. जो आहे तो गोपाळ शब्दापासून साधलेला आहे.

घोड्यालाहि शब्द मूळ द्राविड भाषेंत नाहीं. मराठी मुलखांत महाराच्या अनेक कामांपैकीं पडेल जनावर ओढून नेणें हें एक काम असतें. त्यावरून महार शब्दाची मृतहर=मढ+हर=महार अशी एक व्युत्पत्ति देतात. पशुपालन व शेती करणाऱ्या लोकांत महार कामगाराला जागा आहे, त्याचप्रमाणें चर्मकारहि आवश्यक आहे. द्राविड लोकांत मूळ अशा तऱ्हेचें समाजजीवन नसावेसें दिसतें. महाराष्ट्रांत पीठ दळण्याचें जातें व बायकांची जात्यावरचीं गाणीं प्रसिद्ध आहेत. उत्तर कर्नाटकांतहि सर्वत्र जातें माहीत आहे. पण द्राविड भाषेंत जात्याला शब्द संस्कृतोद्भवच आहे. बऱ्याच मोठ्या प्रदेशांत जातें माहीत नाहीं व ज्यांच्याकडे माहीत आहे त्यांच्या-

* हिंदुस्थानांतील पोषाखाचा तुलनात्मक अभ्यास डॉ. घुर्ये ह्यांच्या Indian Costumes ह्या पुस्तकांत केला आहे. तो ग्रंथ जिज्ञासूंनीं अवश्य पहावा.

कडेहि त्याचा उपयोग आपल्याकडल्यासारखा नेहमींचा नाहीं. ह्याला कारण म्हणजे रोजच्या अन्नांत असणारें भिन्नत्व. महाराष्ट्र ( देशविभाग ), गुजरात, पंजाब, मध्यप्रदेश व उत्तरप्रदेश ह्या सर्व ठिकाणीं जोंधळा व बाजरीची भाकरी किंवा गव्हाची रोटी वा चपाती हें मुख्य खाणें आहे. त्यासाठीं जोंधळा, बाजरी व गहूं हीं धान्यें कोरडीं दळून त्यांचें पीठ करण्यासाठीं चक्की उर्फ जातें वापरतात. ह्याउलट दक्षिण कर्नाटक, पश्चिम कर्नाटक, मलबार, तामिळनाड वगैरे प्रदेशांत मुख्य खाणें तांदुळाचें आहे. तांदूळ शिजवून भात करतात. तांदुळाचे इतर पदार्थ उकडलेले ( इडली, सांदण वगैरे ), किंवा तव्यावर धिरडयासारखे करतात व ते करण्यासाठीं पहिल्यानें तांदूळ भिजत घालून मग पाट्यावर वरवंट्यानें वाटतात किंवा घाटबायनांत घालून घाटतात. धान्याचें पीठ करण्याची ही तऱ्हा सर्व जगभर होती व ती जुनी तऱ्हा आहे. चक्की किंवा जातें हें त्या मानानें आधुनिक आहे व तें हिंदुस्थानांत पहिल्यानें वायव्येकडून आलें असें दिसतें.

आणखीहि एका बाबतींत दक्षिण व उत्तर हिंदुस्थानांत फरक दिसून येतो. उत्तर हिंदुस्थानांत आपल्या स्वयंपाकघरांतली रोजची विळी दिसत नाहीं. जें कांहीं कापायचें असेल तें सुरीनें कापतात. हीच कापण्याची रीत युरोपांतहि दिसून येते. सुरी—छुरी हा शब्द क्षुर् ह्या संस्कृत धातूपासून आलेला आहे. विळी हा शब्द व वस्तु द्रविडांच्या दिसतात व तीं दोन्ही महाराष्ट्रानें आत्मसात् केलेलीं दिसतात. विळी उत्तर महाराष्ट्रांतहि सर्रास वापरतात कीं काय हें पहावयास पाहिजे.

अशा तऱ्हेचें संशोधन अजून पुष्कळ व्हावयास पाहिजे.

महाराष्ट्र शेतकऱ्यांचा देश. सर्व शेती पावसाच्या पाण्यावरची. म्हणून म्हणा, किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें म्हणा, ते लढवय्येहि आहेत. कारागीर वर्गापैकीं बराचसा बाहेरून आलेला दिसतो. नागर जीवनांतील व्यवहारोपयोगी कलांचा विकास महाराष्ट्रांत झालेला दिसत नाहीं. त्याचप्रमाणें नागरजीवनाचें एक महत्वाचें अंग जो व्यापार तोहि महाराष्ट्राला अवगत नाहीं. महाराष्ट्रांतील व्यापारी अशी एकच जात आहे व ती म्हणजे कोंकणच्या वैश्यवाण्यांची. ती मुख्यत्वें कोंकणांत ( मुंबईत ) सांपडते.

तीहि हळूहळू व्यापार उदीम सोडून किंवा गुजराती वैश्यांपुढें टिकाव न लागल्यामुळें म्हणा इतर धंद्यांत शिरू लागली आहे. सध्यां महाराष्ट्रांत असें एकहि गांव नसेल कीं जेथें वाणी, मारवाडी, किंवा परदेशी नाहीं. पूर्वी कांहीं व्यापार व सावकारी माध्यंदिन व इतर देशस्थ ब्राह्मण करीत असत. नागपूरची बाजारपेठ एकाकाळीं माध्यंदिनांची होती. त्याचप्रमाणें मराठवाड्यांत “ नगरशेट ” म्हणून ब्राह्मण होते व क्वचित् अजूनहि आहेत. पण आज हा धंदा साफ बुडाला आहे. गिऱ्हाइकाला खूष करून, त्याच्याशीं गोड बोलून, नेहमीं नमतें घेऊन आपला माल खपवायला लागणारे गुण मराठी जातींत नाहींत हेंच खरें. मराठी दुकानदार घासाघीस घालणाऱ्या गिऱ्हाइकाला कंटाळतात; माल न घेतां माल पाहून चिकित्सा करणाऱ्या गिऱ्हाइकांवर रागावतात. गिऱ्हाइकाचें हंसतमुखानें स्वागत करीत नाहींत. तयार मालाच्या देवघेवीची कला जरी मराठी लोकांना नसली तरी माल तयार करण्याला लागणारी कल्पकता व चिकाटी त्यांचे अंगीं आहे असें प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ ध. रा. गाडगीळ यांचें मत आहे. पैशाच्या व्यवहाराच्या अज्ञानामुळें, जाहिरातीच्या अभावीं व भांडवल नसल्यामुळें हे प्रयत्न पुष्कळदां फुकट जातात, हा मराठी लोकांचा दोष असें म्हणतां यावयाचें नाहीं. निराळ्या सामाजिक व विशेषतः राजकीय परिस्थितींत ह्या गुणांचें चीज होण्याची शक्यता आहे. व्यक्ति काय किंवा समाज काय गुण आणि दोष असे निरनिराळे नसतातच. एकच गुण प्रसंगपरत्वें सद्गुण अगर दुर्गुण ठरतो.

कारागीर नसलेल्या व मूळ शेतकरीहि नसलेल्या अशा दोन जाती महाराष्ट्रांत आहेत; त्या म्हणजे ब्राह्मण व कायस्थ. ब्राह्मण हिंदूंचे सर्व धार्मिक संस्कार करणारे म्हणून, यज्ञयाग करण्यासाठीं व स्मृतींप्रमाणें न्याय देण्यासाठीं, देवळांतून पूजा करण्यासाठीं व इतर नित्य व नैमित्तिक गृहकृत्यें करण्यासाठीं निरानिराळ्या राजांनीं निरानिराळ्या प्रदेशांत आणून वसवल्याचे जुने उल्लेख आहेत. बऱ्याच ब्राह्मणांना दानें दिल्याचेंहि शिलालेख व ताम्रपट आढळतात. ह्या ताम्रपटांच्या अभ्यासावरून व ब्राह्मणांच्या पोटजाती व त्यांच्या वेदशाखा ह्याबद्दलच्या संशोधनावरून दिसून येतें कीं

दक्षिण हिंदुस्थानांत मुख्यत्वें कृष्णयजुर्वेदी व ऋग्वेदी ब्राह्मणांची वस्ती आहे. शुक्ल यजुर्वेदीयांपैकीं प्रथम शाखा ऊर्फ काण्व शाखा दक्षिणेकडे तुरळक तुरळक बरीच खोलवर गेली आहे, पण माध्यंदिन शाखेचा प्रसार मुख्यत्वें महाराष्ट्रांतच--विशेषतः गोदा खोऱ्यांत आहे. वैशंपायनाचा शिष्य जो याज्ञवल्क्य त्यानें स्थापिलेल्या वेदाची ही शाखा आहे. आज उत्तर-हिंदुस्थानांत तिचेंच प्राबल्य दिसतें. दक्षिणेकडे कृष्णयजुः व ऋक् ह्या दोन जुन्या शाखांचें अस्तित्व पाहिलें म्हणजे दक्षिणेकडील ब्राह्मण वसती फार जुनी असावी असें दिसतें. महाभारतकालीं शुक्ल यजुर्वेदाची स्थापना झाली. कुरुपांचाल देशांत त्याला पहिल्यानें प्रतिष्ठा मिळाली नाहीं. याज्ञवल्क्यानें विदेहाच्या दरबारांत सर्व पण्डितांना वादांत जिंकलें अशी कथा आहे. त्यावरून असें दिसतें कीं, मिथिला व मगध ह्या प्रदेशांत पहिल्यानें त्या शाखेचा प्रसार झाला व मग ती हळुहळू हिंदुस्थानभर पसरली. शुक्ल यजुर्वेदी खिस्ताब्दाच्या थोडे अलिकडे पलिकडे दक्षिणेकडे आले असें दिसतें. मगधांतील बौद्ध प्रसारामुळें ते कदाचित् दक्षिणेकडे आले असण्याचा संभव आहे. आठव्या शतकांत त्यांचा प्रसार वऱ्हाडांत झाला होता असें त्रिविक्रिमभट्टाच्या राधामाधवविलासचंपूवरून दिसतें. त्या ब्राह्मणांची मापें मराठ्यांना जवळचीं आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ब्राह्मणांची परंपरा जरी विद्वत्तेची होती तरी ती लिहिण्याची नव्हती. त्यांची सर्व विद्वत्ता मुखोद्गत असे. स्वतः हातानें लिहिणें हें थोडेंसें कमीपणाचेंच लक्षण समजलें जाई. मुद्राराक्षस नाटकांत चाणक्याच्या तोंडीं "श्रोत्रियाक्षराणि प्रयत्नलिखितान्यपि नियतमस्फुटानि भवंति" विद्वान ब्राम्हणाचें अक्षर वाचावयास दुर्बोध असतें असें वाक्य घातलें आहे. पेशव्यांनीं गुरुपदीं मानलेले अग्निहोत्री कायगांवचे दीक्षित ह्यांचें अक्षर कागदपत्रांत आहे तेंहि अगदीं वाईट वळणाचें व दुर्बोध आहे. ब्राम्हणाचें शिकणें म्हणजे 'म्हणणें' असे, 'लिहिणें' नसे. मागून ब्राम्हण लेखणी हातीं घेऊन कुळकरण करीत असत.

मुद्राराक्षस नाटकांत धंदेवाईक लेखनिक म्हणून 'कायस्थाचें' नांव आलें आहे. शिलालेख, ताम्रपट व इतर कागदपत्रीं लिखाण 'कायस्थ'च

करीत. ही जात मूळ कुठची तें समजत नाहीं पण ती पहिल्यापासूनच नागर जात आहे, इतकेंच नव्हे तर राजदरबारीं वावरणारी जात आहे. कायस्थ किंवा ‘ करण ’ ही जात सर्व हिंदुस्थानभर पसरलेली आहे व सर्व जुन्या राजांचें दप्तर ह्या जमातीच्याच हातीं असे. लिहितां न येणारे ब्राम्हण व अशिक्षित क्षत्रिय व शेतकरी ह्यांच्या मुलखांत लिहितां येणाऱ्या जमातीचें वर्चस्व किती असेल तें सांगणें नको. कायस्थांचा संबंध राजाशीं असल्यामुळें ते राजसेवकच म्हणावयास हरकत नाहीं. मुद्राराक्षसांत एकनिष्ठ राजसेवक चंदनदासाचें चित्र फारच उठून दिसतें. तीच राजनिष्ठा कायस्थांनीं निरनिराळ्या राजघराण्याबद्दल दाखवलेली आहे. हैद्राबाद संस्थानचे एकनिष्ठ हिंदू सेवक व राज्याचे हिंदू आधारस्तंभ महाराजा किशनप्रसाद व त्यांचे पूर्वज हे सर्व कायस्थ होते. त्याचप्रमाणें मराठी राजांचे एकनिष्ठ सेवक बाजी प्रभू, खंडो बल्लाळ व सखाराम बापू हे हि कायस्थच होते. हें पाहिलें म्हणजे धन्याची निष्ठा हा कायस्थ जमातीचा गेलीं १५०० वर्षें गाजलेला गुण आहे हें दिसून येतें. ही जात हिंदुस्थानांतील पुढारलेल्या जातींत प्रमुख आहे. पश्चिमेकडील वैश्य, ब्राम्हण, पाठारे वगैरे जातींत ही मिसळून जाते हें मागें सांगितलेंच आहे.

महार ही जातहि शेती न करणारी आहे व ती महाराष्ट्रांत सर्वत्र पसरलेली आहे. हिची परिस्थिति फार अनुकंपनीय होती पण ह्या जातींतील लोकांनीं उद्योग व शिक्षण ह्यांचे द्वारें इंग्रजी राज्याचा फायदा घेऊन आपल्या जातीचा दर्जा वाढवला. खेडेगांवांत जमीन कमी व निकृष्ट प्रतीची ह्यांच्या वांट्यास बलुतदार म्हणून यावयाची. सर्व गांवचीं कामें करूनहि पोटाला पुरतें मिळावयाचें नाहीं व वर अस्पृश्य म्हणून सर्वांनीं हडहड करावयाचें. अशा स्थितींत खेड्यांतून मोठ्या संख्येनें बाहेर पडून गिरण्या व कारखाने ह्यांत हे लोक नोकरी करून आहेत व हळुहळू सर्वस्वीं नागर बनत आहेत. कायदे कितीहि चांगले झाले तरी अजूनहि खेडेगांवांतील शेतकरी थोड्याशा कारणावरून त्यांना मारहाण करतात व त्यामुळें ही जात पूर्णतया शहराकडे वळण्याचा संभव आहे. डॉ. आंबेडकर खेडेगांवांना ‘ सांचलेल्या पाण्याचीं घाण डबकीं ’ अशी संज्ञा देतात.

निरानिराळ्या कारणानें खेडेगांवांत मराठ्यांनीं जर संख्येच्या जोरावर कोणी ब्राम्हण म्हणून, कोणी वाणी म्हणून, कोणी महार म्हणून त्यांना मारून झोडून हांकलून लावलें तर परस्परावलंबी सहजीवन व विविधतेंत उत्पन्न होणारी संपन्न संस्कृति नाहींशी होऊन खेड्यांचीं 'सांस्कृतिक डबकीं' व्हावयास वेळ लागणार नाहीं.

महाराष्ट्रांतील मराठा ही एक बहुसंख्य जात आहे. ही जात पावसाळी शेती करणाऱ्या शेतकऱ्यांची व लढवय्यांची आहे. त्यांच्याच पुढारीपणा-खालीं महाराष्ट्र सतत पंचवीस वर्षे मोगल सत्तेशीं झगडला. ह्या जातीची कुटुंबसंस्था, दैवतें, संप्रदाय व गुणावगुण यांचा महाराष्ट्राचें सांस्कृतिक व सामाजिक जीवन या दोन्हींवरहि परिणाम झालेला आहे. मराठ्यांचे दोन गुण प्रामुख्यानें सांगतां येतील. जमिनीची प्रीति व कुळीचा अभिमान. स्वतः मराठा म्हणवणारी जमात बऱ्याच कुळांची मिळून झालेली आहे. मराठे हे महाराष्ट्रांतील शेतकरी. कांहीं दशकांपूर्वीं शेतकऱ्यांत मुख्य दोन वर्ग सांगितले जात. एक मराठा व दुसरा कुणबी. मराठ्यांचा कुणब्यांशीं बेटीव्यवहार होत नसे व अजूनहि सहसा होत नाहीं. मराठ्यांमराठ्यांतहि कांहीं खालच्या प्रतीचे व कांहीं वरच्या प्रतीचे असे भेद आहेत. वरच्या प्रतीचे खालच्यांच्या मुली करीत पण आपल्या मुली खालच्यांना देत नसत. मराटा समाजांत कित्येक कुळें आहेत व त्यांतून पंचकुळीचे मराठे, सातकुळीचे मराठे, शहाण्णव कुळीचे मराठे व इतर मराठे अशा श्रेणी आहेत. पांच कुळीचे मराठे शक्यतर आपल्या आपल्यांत लग्न करतात. पुरेसा हुंडा मिळाला तर आपल्या खालच्या श्रेणीची मुलगी करतात. मराठे व कुणबी यांच्यांतला दुसरा फरक म्हणजे कुळीच्या मराठ्यांची कुठल्या ना कुठल्या तरी गांवची पाटीलकी तरी असते. मराठ्यांना पाटीलकी वतनाचा अतोनात अभिमान असतो व तें वतन मिळविण्यासाठीं व टिकाविण्यासाठीं ते वाटेल तें करावयास मागेंपुढें पहात नसत. वतनाची जमीन व कुळीचा अभिमान हीं मराठा समाजाचीं वैशिष्ट्यें म्हणतां येतील. मराठ्यांच्या इतिहासांत ह्या दोनहि वैशिष्ट्यांचें दर्शन वारंवार होतें. जमिनीसाठीं, विशेषतः देशमुखी वतनासाठीं मराठे काय करीत याचें उत्तम

उदाहरण मसूरच्या महजराच्या हकीकतींत आहे. शहाजी राजे विजापूर दरबारचे मोठे सरदार असले तरी त्यांना देशमुखी वतन नव्हतें. मसूरची देशमुखी दुसऱ्या मराठे घराण्यांत होती. पण तेथील कर्ता पुरुष मेला व शहाजीनें ती देशमुखी आपल्या नांवावर करून घेतली. अज्ञान मुलाच्या वतीनें गाऱ्हाणें शिवाजीराजांकडे आलें असतां हा अज्ञान मुलगा आलाच कुठून असा प्रश्न उपस्थित झाला व बाई व मुलगा ह्यांनीं शक्यतों दरबारांतून पळून लांब जावें असा बाईला सल्ला मिळाला. पुढें अशी आख्यायिका आहे कीं, कांहीं कागदपत्रावर सही करण्याचा प्रसंग आला असतां छत्रपति शाहू महाराजांनीं मराठ्यांचे राजे छत्रपति म्हणून सही करण्याची नाकारून मसूरकर देशमुख म्हणून सही केली. राजेपणापेक्षांहि देशमुखी मराठ्यांना जास्त महत्त्वाची वाटे. मसूरच्या महजरासारखीं कितीतरी आणखी उदाहरणें आहेत. पाटील आणि देशमुख आपल्या गांवचे राजे असत. शेजारच्या पाटलाशीं किंवा देशमुखांशीं संबंध नेहमीं भांडणाचे व मारामारीचे. कोणीहि कोणापेक्षां कमी नाहीं व वरचढ नाहीं. म्हणून कुळी व देशमुखी ह्या द्वंद्वांत राजकारण नेहमीं कुजत असावयाचें. लग्नसंबंध केल्यामुळें हीं भांडणें तुटण्याऐवजीं वाढतच जात. शहाजी राजांना सासऱ्याच्या वैरामुळें रानोमाळ हिंडावें लागलें हें मागें सांगितलेंच आहे. भोसल्यांचें कुळ पंचकुळींत नाहीं ही गोष्ट मराठे सरदार परत परत अट्टाहासानें ठासून सांगत व घोरपडे, मोरे वगैरे घराणीं त्यामुळें त्यांचें वर्चस्व कबूल करावयास तयार नव्हतीं. मसूरच्या देशमुखीची खटपट ही केवळ जमीन मिळवावयाची खटपट नव्हती, तर देशमुखी वतनानें आपली कुळी उजवायची खटपट होती असें दिसतें. हा कुळीचा अभिमान रजपुतांतहि दिसून येतो. राजपदापेक्षांहि मोठ्या कुळाला मान होता हें अतिप्राचीन काळच्या भारतीय इतिहासावरून दिसून येतें. मुद्राराक्षस नाटकांत चंद्रगुप्त व चाणक्य अशी जोडी आढळते. त्यांत चाणक्याच्या मागें आर्य हें उपपद आहे. तर चंद्रगुप्त महाराज असूनहि चाणक्य दरवेळीं त्यास वृषल असें संबोधून त्याच्या हीन कुळीची आठवण त्याला करून देई. भारतीय इतिहास पाहिला तर ब्राम्हणांत कुळीचा अभिमान असे असें दिसून येत नाहीं. उलट क्षत्रियांत मात्र

क्षत्रियत्वाचा अभिमान जाज्वल्य असे. बौद्धधर्म जातिधर्माविरुद्ध होता, असा साधारण समज आहे. पण बुद्ध स्वतः व त्याचे अनुयायी बुद्धाचे क्षात्रियत्व व इक्ष्वाकु कुल कधींहि विसरले नाहींत. कोसलाचा राजा पसेनदी व बुद्धकुलांतील महानाम शाक्य यांची प्राचीन कथा फार उद्बोधक आहे व तिचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. पसेनदी हा बुद्धाचा परमभक्त होता. त्याचे मांडलिक उत्तरेचे लिच्छवी यांच्या कुळींतला बुद्ध होता व त्या कुळीची मुलगी आपण केल्यास बुद्धाला जवळचें होऊं ह्या विचारानें पसेनदीनें तशी मागणी केली; तेव्हां क्षात्रिय कुलाभिमानी लिच्छ-वींच्या महानाम नांवाच्या मुख्यानें नागमुंडा नांवाच्या दासीपासून झालेली आपली वासभखत्तीया नांवाची मुलगी स्वतःची मुलगी म्हणून पसेनदीला दिली. तिला विडूडभ म्हणून मुलगा झाला. तो आपल्या आजोळीं म्हणून वैशालीला गेला असतांना त्याला हें कपट कळलें व त्यानें लिच्छवींवर स्वारी करून त्यांना व त्यांच्या बायकापोरांना कापून काढलें.

कुळीचा अभिमान व एकमेकांचा मत्सर ह्यांमुळें मराठा समाज इतका विस्काळित होता कीं, ह्या हट्टी व अहंमन्य लोकांना एकत्र आणून शिवाजी राजांनीं जें अपूर्व कार्य केलें तें युगपुरुषाच्या हातूनच घडणें शक्य होतें हें पटतें. घोरपडे व जाधव ह्यांचें भांडण, मोरे–भोसल्यांचें वैर, जाधव–बांदल यांची अखंड मारामारी, ह्यांत समाजधारणा होणार कशी? कुलाभिमान व देशमुखी या दोहींत देशप्रेम कोठें बसणार? ज्या पिसाळानें फितुरी करून येसूबाई व बाळराजांना औरंगजेबाचे स्वाधीन केलें त्याच पिसाळांचे घराण्यांत शाहू महाराजांनीं आपली मुलगी दिली. ही ऐतिहासिक घटना पाहिली- म्हणजे कुळी व देशमुखीच्या मोठेपणापुढें फितुरीसारखे अपराध जुजबी स्वरूपाचे ठरतात हें दिसून येतें मराठ्यांना फोडावयाचें व आपलें राजकारण साधावयाचें हा डाव औरंजेबापासून आतांपर्यंत सर्व सत्ताधारी यशस्वी रीत्या खेळले आहेत. ही कुळी–देश-मुखीची कोंडी फोडून मराठा समाज एकसंध व एकजिनसी करण्याचे प्रयत्न अनेक थोर पुढाऱ्यांनीं केले. मराठ्यांना शिक्षण दिलें म्हणजे ही प्रथा मोडेल अशा आशेनें मराठ्यांच्या शिक्षणासाठीं कोल्हापूरच्या शाहू

महाराजांनीं व बडोद्याच्या सयाजी महाराजांनीं आपापल्या संस्थानांतून शिक्षणाची पाणपोई उघडली; पण ह्या समाजाच्या दुर्दैवानें ह्या लोकोत्तर पुढाऱ्यांच्या प्रयत्नाला यावें तसें यश आलें नाहीं. कागदोपत्रीं कुणबी शब्द जाऊन त्या ऐवजीं मराठा शब्द रूढ झाला आहे. पण लग्नसंबंध आला म्हणजे मराठा व कुणबी एवढाच फरक न पडतां कुळीचा प्रश्न प्रामुख्यानें पुढें येतो. मोठमोठ्या सभांतून बोलतांना जे पुढारी बहुजनसमाजाच्या वतीनें बोलतात, तेच लग्नाचा प्रश्न आला कीं पहिल्यानें कुळीची चौकशी करतात. कुळीची चौकशी म्हणजे कुलशीलाची चौकशी नव्हे, तर अमका मनुष्य कोणत्या आडनावाच्या घराण्यांत जन्मला याची चौकशी. कुळीचा मोठे-पणा श्रीमंतीवर किंवा चारित्र्यावर अवलंबून नसून पारंपरिक व वंशपरंपरा आलेला असतो. ह्यामुळें मराठा समाज आंतून विभागलेला व फुटलेला आहे. इतर जातींविरुद्ध किंवा औरंगजेबासारख्या बाहेरच्या शत्रूविरुद्ध त्यांच्यांत तात्पुरती एकजूट होते. पण शांततेच्या काळीं परस्परसहकार्य व परसहिष्णुता त्यांच्यांत दिसून येत नाहीं. एकेकाळीं महाराष्ट्राचें पुढारी-पण ह्या जमातीकडे होतें. भावी कालांतहि पुढारीपण त्यांचेकडेच राहणार. ह्यामुळें ह्या जातीचे गुणावगुण त्या जातीलाच नव्हे, तर राष्ट्रालाहि तारक किंवा मारक ठरणारे आहेत.

कुळीच्या अभिमानामुळें व वतनादारीच्या अभिमानामुळें स्वयंसिद्धता व स्वातंत्र्यप्रियता हे दोनहि गुण मराठ्यांत व त्यांच्या अनुकरणानें इतर मराठी जातींत दिसून येतात. प्रत्येक पाटील स्वतंत्र व आपल्या गांवचा राजा. त्याला शहाणपण कोण शिकवणार ? तोच कित्ता इतर जातींनीं उचललेला आहे. ब्राह्मणांतहि हा गुण वा दुर्गुण दिसून येतो. एकांडी शिलेदारी महाराष्ट्रांत जितकी दिसते तितकी इतर कोठें दिसत नाहीं. आपल्याकडील एकाद्या लहानशा गांवचा पाटील ज्या रुबाबांत वागतो तो ताठरपणा इतर प्रांतांतील श्रीमंत जमीनदारांतहि दिसून येत नाहीं. आपल्यापेक्षां वरचढ असेल त्यापुढें नमावयाचेंच हें बाळकडू इतर प्रांतांतील बहुजन समाजाला मिळालेलें दिसतें. याउलट नमायला पाहिजे तेथेंहि ताठ रहावयाचें ही वृत्ति सर्व मराठी जातींत दिसून येते. ह्यामुळेंच शेतकरी जमाती, कारू जमाती,

महार वगैरे अस्पृश्य जमाती व ब्राह्मण जमाती या सर्वच स्वतःला फार शहाण्या समजतात व त्याप्रमाणें वर्तन करतात. ह्यामुळेंच मराठी संस्कृतींतील अंगोपांगांत ह्या सर्वांचें कार्य दृष्टीस पडतें. या संस्कृतीची निर्मिति कोणच्या एका जमातीची नसून सर्वांची आहे व तिची जोपासना करायची असल्यास सर्वांनीं एक झालें पाहिजे.

मराठी संस्कृतीचें परिशीलन करतांना आपल्याला कळलें असेल कीं संस्कृतीच्या विभागांत अब्राह्मण समाज पुढारी आहे. संस्कृतीचें रूप ते ठरवतात, व वळणहि ते देतात. त्यांची कुटुंबपद्धति ब्राह्मण उचलीत आहेत. वारकरी संप्रदाय त्यांनीं स्थापिला; ब्राह्मण मागून आले. त्यांची साहित्यनिर्मिति ब्राह्मणांपेक्षां तसूभरहि कमी दर्जाची नाहीं. लेणीं खोदणारे असामान्य शिल्पकार खासच ब्राह्मण नव्हते. असें असतांना केवळ गेल्या एकदोन शतकांच्या इतिहासामुळें अब्राह्मण समाजाला बावरून जाण्याचें कारण काय? सध्यांचा वैराग्नि हें मराठ्यांच्या दैन्याचें लक्षण आहे. खरोखर हें दैन्य वाटण्याचें त्यांना कारण नाहीं. मराठ्यांना एकत्र व्हावयाचें ते कोणातरी विरुद्ध लढाई असेल तरच ते एकत्र होतात, ही परिस्थिति बदलली पाहिजे व स्वतःच्या उच्चतेची वाच्यता न करतां व काल्पनिक नीचतेच्या दैन्याचें शल्य मनांत न धरतां नव्यानें समाजाची एकसंध फळी उभारली पाहिजे. ज्या समाजांतील शेतकरीवर्गाचें सांस्कृतिक कार्य इतकें उज्ज्वल आहे, तेथें ब्राह्मण, अब्राह्मण हा भेद न ठेवतां सरसकट रक्ताची सरळमिसळ झाली पाहिजे हें ब्राह्मणांनीं उमजलें पाहिजे. आपण एका राष्ट्राचे व एका संस्कृतीचे लोक अशी भावना बाळगून, कुळीचा अभिमान, जातीचा दुरभिमान, स्वयंसिद्धता हीं बाजूला ठेवून सहजीवन व सांस्कृतिक सहकार्य करण्यास सिद्ध झालों तर अजूनहि महाराष्ट्र खरोखरच मोठा होईल व आजपर्यंत भारतीय संस्कृतीचें ज्या वैभवानें वर्धन केलें तसेंच पुढेंहि केलें जाईल.

● ● ●

## शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | ७ | शरार | शारीर |
| १६ | ४ | जातीचें करतां | जातीचें कार्य करतां |
| २७ | २६ | इरत | इतर |
| ३२ | १३ | संबध | संबंध |
| ५३ | १८ | दार | दारू |
| ६० | १६ | ट्रूप | ट्रॅूप |
| ११७ | १७ | लग्र | लग्न |
| ११९ | ६ | इतिहाससंशोधक | भारत इतिहाससंशोधक |
| १२६ | १७ | मुंवई | मुंबई |
| १३८ (आडवें) | क्रमांकाची ओळ | ६ | ३६ |
| १९० | १४ | जांवई सावकार | उभे जांवई सावकार |
| २०३ | ९ | कृयांत | कृत्यांत |
| २५६ | ८ | उत्कृट | उत्कट |
| २७९ | २७ | वगर | वगैरे |
| जातींचा नकाशा | | दैवदन्य | दैवज्ञ |